( *Patronized by the Dakshiṇa Prize Committee.* )

THE

# LIFE AND POEMS

OF

# EKANÂTH,

## THE GREAT SAINT, POET & PHILOSOPHER

OF

## PAIṬHAN,



BY

**DHONDO BÂLKRIS'HNA SAHASRABUDDHÉ,**

ASSISTANT MASTER, POONA HIGH SCHOOL.

BOMBAY:

PRINTED AT JAVJI DADAJI'S "NIRNAYA-SAGAR" PRESS.



1895.

*Price 12 Annas.*

(दक्षिणा प्राइझ् कमिटीनें पसंत करून ग्रंथकर्त्यास बक्षिस दिलेलें)

पैठण येथील

प्रसिद्ध साधु, कवि व तत्ववेत्ते

# श्रीएकनाथ महाराज

## यांचें चरित्र.

व

त्यांची वेदांतपर आणि नीतिपर कविता.

**पूर्वार्ध व उत्तरार्ध.**



हा ग्रंथ


**धोंडो बाळकृष्ण सहस्रबुद्धे**

असिस्टंट् मास्तर, हायस्कूल, पुणें,


यांनीं रचिला.

तो


**जावजी दादाजी यांच्या**

“ निर्णयसागर ” छापखान्याचे मालक **तुकाराम**

**जावजी** यांनीं छापून प्रसिद्ध केला.

आवृत्ति २ री.





१८९५

किंमत १२ आणे.

कैलासवासी

तीर्थस्वरूप

रा. रा. गणेश बाळकृष्ण सहस्रबुद्धे

यांच्या आंगचे

कित्येक गुण स्मरून

हें पुस्तक

त्यांच्या स्मरणार्थ

त्यांस

कृतज्ञतापूर्वक अर्पण केलें आहे.

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना.



प्रापंचिक गोष्टींविषयीं निरंतर विचार करणें इतकेंच मनुष्यमात्राचें कर्तव्य नसून पारमार्थिक गोष्टींविषयीं विचार करणें हेंच त्याचें खरें व महत्वाचें कर्तव्य होय. अशा पारलौकिक गोष्टींविषयीं विचार करणें ह्मणजे ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम इत्यादि जे महात्मे आत्मज्ञानाविषयीं, परोपकाराविषयीं व नीतीविषयीं, आजपर्यंत दुनियेंत गाजून गेले, अशा सत्पुरुषांचीं चरित्रचित्रें अवलोकन करणें व त्यांनीं उपदेशिलेल्या मार्गाचें अवलंबन करणें हें होय. प्रस्तुत चरित्राचा नायक जो एकनाथ तोही अशाच प्रकारचा एक अद्वितीय पुरुष असून त्याच्या साधुत्वाची व कवित्वाची कीर्ति आज सर्वत्र पसरलेली आहे. ह्या महात्म्याच्या संबंधानें लिहिलेल्या या पुढील ग्रंथाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग केले असून पूर्वार्धांत ह्या सत्पुरुषाचें चरित्र सुरस रीतीनें वर्णन केलें आहे व उत्तरार्धांत त्याचे ग्रंथ व त्याची वेदांत आणि नीतीसंबंधीं कविता यांविषयीं निबंधरूपानें विवेचन केलें आहे. सदर्हु ग्रंथ भाविक भक्तांच्या अत्यंत उपयोगी असून तो दक्षिणा प्राइझ् कमिटीनें पसंत केला असल्यामुळें मार्मिक व रसिक अशा आलीकडील विद्वानांच्या सुद्धां पसंतीला पडण्यासारखी त्याची रचना आहे हें येथें निराळें सांगणें नकोच.

ह्या ग्रंथाच्या शेवटीं पैठणच्या उत्पन्नाची हकीकत दिली असून नाथांची वंशावळ संस्थानच्या दप्तरांतील अस्सल वंशावळीवरून घेऊन ती शेवटीं जोडली आहे. शिवाय आजपर्यंत छापून प्रसिद्ध न झालेले असे कित्येक नाथांचे वेदांतपर अभंग मोठ्या सायासानें मिळवून तेही ग्रंथांत मधूनमधून घातले आहेत.

## पूर्वार्ध.

### नाथचरित्र.



## उत्तरार्ध.

### एकनाथांचे ग्रंथ आणि त्यांचे धर्मसंबंधी व नीतिसंबंधी विचार.

## ज्या ज्या ग्रंथांच्या आधारानें हा निबंध रचिला त्यांचीं नांवें.

१ भक्तलीलामृत ( छापील प्रत ).

२ भक्तलीलामृत ( हस्तलिखित प्रत जुनी ).

३ भक्तविजय.

४ हिंदुस्थानचा अर्वाचीन कोश.

५ काव्येतिहाससंग्रह.

6 Johnson's Lives of the Poets, Vols I.II.III.

७ भावार्थरामायण.

८ एकनाथी भागवत.

९ स्वात्मसुख.

१० रुक्मिणीस्वयंवर.

११ चतुःश्लोकी भागवत टीका.

१२ भगवद्गीता.

१३ तुकारामाची गाथा.

१४ एकनाथांचे हस्तलिखित अभंग व त्यांचा बाड.

१५ नाथांच्या शिष्यांकडून मिळालेलें एकनाथांचें कृत्य इत्यादि.

१६ पैठणसंस्थानाच्या दप्तरांतून मिळालेली वंशावळ, व उत्पन्नाची हकीकत वगैरे.

# श्रीनाथचरित्र.



## पूर्वार्ध.

### भाग पहिला.

### कुलवृत्त, बाल्यावस्था आणि शिक्षण.

**प्रसादचिन्हानि पुरःफलानि ।**

( रघुवंश. )

सुमारें चारशें वर्षांपूर्वी प्रतिष्ठान (पैठण) नगरींत **भानुदास** नांवाचा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण रहात असे. हा सदाचारसंपन्न असून परम भक्तिमान् होता. ह्याची प्रथम फारशी प्रसिद्धि नव्हती; परंतु एके प्रसंगीं आपल्या निस्सीम भक्तीच्या योगानें, विजयानगरच्या राजानें नेलेली पांडुरंगाची मूर्ति, या पुरुषश्रेष्ठानें परत पंढरपुरास आणिली; तेव्हांपासून भानुदासाची कीर्ति चोहोंकडे पसरली.

भानुदासाला पुढें चक्रपाणी या नांवाचा मुलगा झाला. तोही परम विष्णुभक्त असून नीतिमान् असे. चक्रपाणीस सूर्यनारायण नांवाचा पुत्र झाला. हाच प्रकृत चरित्रनायकाचा पिता होय.

**एकनाथ** इ० स० १५४८ ह्म० शके १४७० ह्या वर्षी पैठण येथें जन्मला. एकनाथाचीं मातापितरें त्याच्या बाल्यावस्थेंतच निवर्तल्यामुळें, नाथाचें संगोपन करण्यास वृद्ध आजा व आजी हीं मात्र राहिलीं.

एकनाथाचा स्वभाव शांत होता. "प्रसादचिन्हानि पुरःफलानि"[1] याप्रमाणें मनुष्याच्या भावी स्थितीचीं चिन्हें बाल्यदशेंतच दिसूं लागतात! ड्रायडन् कवीला डोळाभर पहाण्याविषयीं व त्याचा ग्रंथ मोठ्या हौसेनें वाचण्याविषयीं, कौमार्यावस्थेंतच उत्पन्न झालेली पो-

---

१ पुढें होणा[illegible]र्थांचीं चिन्हें पूर्वीच दिसूं लागतात.

पकवीची अत्यंत इच्छा, जशी त्याच्या भावि काव्यशौंडत्वाची सूचक होय, त्याप्रमाणेंच एकनाथाची बाल्यावस्थेंतील शांतवृत्ति, हीं त्याच्या भावी साधुवृत्तीचीं पूर्वचिन्हें होतीं.

बाल्यावस्थेंत अत्यंत प्रिय वाटणारे खेळ एकनाथास अप्रिय असत. सर्वदां त्याचें चित्त कोणत्या तरी महत्त्वाच्या विषयांत गढलेलें असे. ज्या वेळेस पैठणांतील मुलांचा समुदाय हिकडे तिकडे वाळवंटावर क्रीडा करीत असे, त्याच वेळेस गोदातीरचे पाषाण आणून त्यांचीं एकांत स्थलीं स्थापना, पाषाणरूप पुष्पांनीं त्यांची अर्चना, बोबड्या अस्पष्ट शब्दांनीं त्यांची स्तुति, व पळीचा वीणा खांद्यावर आडवा टाकून हरिदासांचें अनुकरण करणें, ह्यांत एकनाथाचें चित्त रंगून गेलेलें असे.

सहनशीलता व समाधानवृति हे दोन गुण एकनाथाच्या ठिकाणीं लहानपणापासूनच होते. आजाला नातवाची समजूत घालण्याचा किंवा हट्ट पुरविण्याचा प्रसंग कधींच आला नाहीं. ह्या त्याच्या अप्रतिम गुणामुळें, वृद्ध आजास व आजीस तो प्राणाहून प्रिय वाटे. त्याचें सौजन्य पाहून त्यांनीं धन्यधन्य करावी. नातवाच्या तोंडाकडे पाहून पुत्रशोक विसरून जावा. त्याला पोटाशीं धरून मुलाची आठवण होऊन कधींकधीं त्यास दुःखाश्रूंनीं न्हाणावें, व एकनाथानें अल्पवयांत सुद्धां समाधानाच्या गोष्टी सांगून वृद्धांचें शांतवन करावें. समजूतदार व सद्गुणी पुत्राची किती चहा असते, व तो मातापितरांस किती प्यारा असतो, हें या एकनाथाच्या गोष्टीवरून मुलांनीं लक्षांत ठेवावें.

धुळाक्षर, लेखनवाचन, व व्यावहारिक हिशोब, चक्रपाणीनें एकनाथास घरींच शिकविले. एकनाथाची बुद्धि इतकी तीव्र असे कीं, त्यास एकदां पाठ दिला ह्मणजे पुरे; तो त्यानें लागलाच घडघडीत ह्मणून दाखवावा.

एकनाथाची बुद्धि तीव्र जाणून ह्यास वेदाक्षर त्वरित येईल, ह्मणून त्याच्या सहाव्या वर्षीच चक्रपाणीनें त्याचें मौंजीबंधन केलें. मुंज झाल्यावर एकनाथाकडून वेदाध्ययन करविलें. वेदाध्ययनाचे

वेळीं गुरूनें एकनाथाच्या शीघ्रग्राहकत्वाची नेहमीं तारीफ करावी. दगड मांडून लटकी भातुकलींतली पूजा न करितां, मुंज झाल्यावर मोठ्या भक्तीनें खऱ्या देवांची पूजा षोडशोपचारें एकनाथ करीत असे. वेदाध्ययनाचा किंवा पूजेअर्चेचा कंटाळा कधींच त्याला आला नाहीं. ह्या दोन्ही गोष्टी त्यानें मोठ्या उल्हासानें व आवडीनें कराव्या.

कथा किंवा पुराणश्रवण करण्याचीही एकनाथास अत्यंत हौस असे. साधूंचीं रसाळ चरित्रें, त्यांच्या अद्भुत लीला, योगसाधनाचे निरनिराळे मार्ग, व ब्रह्मज्ञानविषयक वादविवाद, ह्या गोष्टी तो नेहमीं चित्त लावून ऐकत असे.

सभाधीटपणा हा त्याचा एक स्वाभाविकच गुण असून, शंकासमाधानाची त्याला लहानपणापासूनच अतोनात हौस असे. पुराणास गेला ह्मणजे कोणाचा उपमर्द न करितां, श्रोत्यांच्या समुदायांत त्यानें अशी कांहीं सयुक्तिक शंका काढावी कीं, तिचें समाधान करण्याची मोठ्या विद्वानांसही पंचाईत पडावी. अल्पवयस्क असून अत्यंत बुद्धिमान् असल्याकारणानें पैठणामध्यें आबालवृद्धांस एकनाथ प्रिय असे. त्याची अद्वितीय शांतवृत्ति, व त्याची विलक्षण बुद्धि पाहून, शास्त्रीपंडितांनीं आश्चर्य करीत रहावें. केवळ पुराणश्रवणानेंच त्यास नानाविध कथानकें मुखोद्गत असत. त्याची सहनशीलता इतकी जागृत असे, कीं समवयस्क इष्टमित्रांनीं त्याची कितीही थट्टामस्करी केली, किंवा त्याला कितीही त्रास दिला, तथापि एकनाथास राग आलेला कधींच कोणीं पाहिला नाहीं.

एकनाथानें आजाची आज्ञा कधींच उल्लंघन केली नाहीं. वृद्ध आजाची व आजीची सेवा करून त्यांस संतुष्ट राखण्यांतच तो तत्पर असे. चक्रपाणीसही आपल्या वार्धक्यावस्थेंत असा सुशील, आज्ञाधारक, व बुद्धिमान् नातू असल्यामुळें, पराकाष्ठेचें समाधान वाटे. ज्याच्या त्याच्या मुखानें नातवाच्या गुणांची व बुद्धीची प्रशंसा ऐकून, ह्मातान्याच्या अंतःकरणांत आनंदाच्या उकळ्या फुटत; व नाथास दृष्ट पडेल या भीतीनें त्यानें वारंवार त्याजवरून मीठमोहऱ्या ओंवाळून टाकाव्या.

बाल्यावस्थेंतच मातापितरें निवर्तल्यामुळें, पोरकें पोर सैरावैरा हिकडेतिकडे धांवून बहकून जावयाचें, परंतु तसें न होतां संसार-सुखानें तृप्त झालेल्या वयोवृद्धांसही जी प्रसन्नता व ज्या मनोवृत्ति कष्टसाध्य, ती प्रसन्नता व त्या वृत्ति एकनाथाच्या ठिकाणीं अल्पवयांतच तरतरीत होत्या, ही महदाश्चर्याची गोष्ट होय.

गांवाबाहेरील एकांत देवालयांत बसून पुराणांत ऐकलेल्या गोष्टींविषयीं एकाग्रचित्तानें विचार करण्याचा एकनाथाचा परिपाठ असे. भक्तांचे हेतु पूर्ण करण्यासाठीं परमेश्वरानें निरनिराळे अवतार कसे धारण केले, अशाश्वत जगताचें खरें स्वरूप जाणून संसारी असूनही कित्येक महात्मे परमार्थी कसे बनले, ध्रुवासारख्या अर्भकासही एका दृढ निश्चयाच्या योगानें परमात्म्याची भेट कशी झाली, ह्या महत्त्वाच्या गोष्टी त्याचे मनांत निरंतर घोळत असून त्या मनांत आल्यावरोबर अंगांत चमत्कारिक आवेशाचें वारें शिरे, बाहु स्फुरण पावत व कांहीं महत्कार्य करण्यासाठीं सिद्ध झालें पाहिजे, अशी त्याची मनोवृत्ति होई.

या शुभ चिन्हांच्या फलप्राप्तीचें सुरस वर्णन पुढील भागांत दिलें आहे.

---

## भाग दुसरा.

### आकाशवाणी[1].

**चिकीर्षिते कर्मणि चक्रपाणेर्नापेक्ष्यते तत्र सहायसंपत्[2] ।**

एकनाथाचे चित्तरंजनास ऐहिक आणि नश्वर वस्तूंचें सौंदर्य कारणीभूत न होतां, त्याचे मनाची धांव कांहीं निराळी असे. परमे-

---

१ 'आकाशवाणी'सारख्या असंभाव्य वाटणाऱ्या गोष्टींचें वर्णन, ह्या निबंधांत देण्याचीं खरीं साधकबाधक कारणें काय आहेत, तीं ह्याच निबंधाच्या १० व्या भागाच्या प्रारंभीं स्पष्ट रीतीनें सांगितलीं आहेत तीं कारणें वाचलीं म्हणजे 'अद्भुतवर्णना'चा दोष ग्रंथकर्त्याकडे मुळींच नसून, हें वर्णन दिल्यानें, ग्रंथकर्त्यानें आपलें खरें कर्तव्य बजावलें असेंच वाचकांस आढळून येईल.

२ देवाच्या मनांत एखादी गोष्ट करावयाची आली, म्हणजे मग त्याला कसलीच जरूर लागत नाहीं.

श्वराचें प्रत्यक्ष दर्शन कोणत्या उपायानें होईल, ब्रह्मज्ञानाच्या परम गुह्य भांडाराच्या किल्ल्या कोणत्या सत्पुरुषाच्या कनवटीस असतील, परमार्थ साधण्यासाठीं आपण काय केलें पाहिजे, इत्यादि विचारांचे तरंग त्याच्या अंतःकरणांत निरंतर उठत, व त्याविषयीं कांहीं उपाय न सांपडल्यामुळें तो कधींकधीं अत्यंत कष्टी होत असे.

अशा प्रकारच्या विचारांत चूर होऊन एके दिवशीं एका शिवालयाच्या गाभाऱ्यांत तो चिंताग्रस्त बसला असतां, सिंहनादाप्रमाणें अकस्मात् गंभीर आकाशवाणी झाली कीं, "**देवगडावर जनार्दनपंत नामें सत्पुरुष, यवन पादशहाच्या पदरीं आहे, त्यास गुरु कर, ह्मणजे इष्टहेतु सिद्धीस जाईल.**"

हा अश्रुतपूर्व ध्वनि श्रवण करून एकनाथ खडबडून उठला, व त्या निर्जन प्रदेशीं मनुष्याचा किंवा श्वापदाचा वाराही नसून हा प्रचंड ध्वनि कोणीकडून आला, ह्मणून शिवालयाच्या आंतबाहेर पहातो तों कोठेंच कोणी दृष्टीस पडेना. तेव्हां हा काय अजब चमत्कार आहे, ह्मणून किंचित् विस्मय करतो आहे, इतक्यांत पुराणांतरीं ऐकलेल्या देववाणीचें व आकाशवाणीचें त्यास स्मरण झालें. तेव्हां आपल्या अंतःकरणांतील चिंतारूप तमाचा नाश करणारी, ही वाणीरूप विद्युल्लता मेघडंबरांत उज्वलित झाली, हें जाणून एकनाथास अवर्णनीय हर्ष झाला. मग तेथील बिल्ववृक्षाच्या ओल्या सालींवर बेलाच्याच कांट्यानें, ऐकलेलीं सर्व अक्षरें स्पष्ट लिहून त्यांचें पुनःपुनः उच्चारण करूं लागला. कांहीं वेळ गेल्यावर, आज आपल्याला अपूर्व वस्तूची जोड मिळाली, ह्मणून मोठ्या आनंदानें नाथ परत घरीं आला.

आकाशवाणीची वार्ता एकनाथानें कोणालाच सांगितली नाहीं. त्या दिवसापासून त्यानें वारंवार त्या शिवालयांत येऊन झाडावरील वाक्याची आवृत्ति करावी, व देवगडास जाण्याचे बेत करावे. आपल्या इष्टमित्रांस विचारून पैठणाहून देवगड किती लांब आहे, जावयाचा रस्ता कोणता, मार्गांत खेडींपाडीं कोणतीं लागतात, वगैरे गोष्टींचें एक लहानसें टिपण करून तें तो निरंतर आपल्याजवळ बाळगी.

पैठण सोडण्याचा विचार मनांत आला ह्मणजे एकनाथास कधीं कधीं अत्यंत वाईट वाटे. चक्रपाणीचें वार्धक्य, त्याची आपण गेलों असतां होणारी दीनवाणी दशा, त्याचें अवर्णनीय प्रेम व अपरिमित ममता, आदिकरून गोष्टी मनांत आल्या ह्मणजे एकनाथाचा कंठ दाटून त्यास गहिंवर येई, अंगास कंप सुटे, व तो ओक्साबोक्शीं रडावयास लागे. परंतु विवेकानें लागलाच मनाला आळा घालून त्यानें समाधान करून घ्यावें, व जगाची क्षणभंगुरता, ब्रह्मज्ञानापासून होणारा आनंद, आणि कर्णरंध्रांत दुमदुमणारा गंभीरध्वनि, ह्यांची आठवण होऊन त्यानें दुःखाश्रूंचें परिमार्जन करावें, करगोटा वर सारावा व देवगडास जाण्याची तयारी करावी.

याप्रमाणें बेत करितां करितां, एके दिवशीं पहांटच्या सुमारास या वामनमूर्तीनें खरोखरीच कोणास न कळूं देतां, प्रतिष्ठानपुरीहून पोबारा केला. जाण्याचे पूर्वी कांहीं दिवस, घरच्या माणसांस काळजी न लागावी ह्मणून, एका पुराणिकाजवळ सहज, जाण्याविषयीं, एकनाथानें गोष्ट काढिली होती. हा पुराणीक फार सज्जन असून एकनाथावर त्याचें फार प्रेम जडलें होतें. त्यानें नाथाचा जाण्याचा बेत ऐकून त्याला पराकाष्ठेचें समाधान वाटलें. ह्या पुराणिकाकडून एकनाथ आपल्या शंकांचें समाधान करून घेत असे. ह्यामुळें ह्या परस्परांचें अत्यंत प्रेम असून पुराणिकाचें हेंच सांगणें असे कीं, "योग्य गुरुमुखाशिवाय ब्रह्मज्ञान प्राप्त होणें नाहीं."

एकनाथ पहांटेस उठला, तो त्यानें देवगडचा थेट रस्ता धरिला. घरचीं माणसें किंवा इष्टमित्र भेटले तर जाण्यास प्रतिबंध करितील, ह्मणून शहरांतून एकसारखी धुम्म ठोकिली, व वेशीबाहेर येऊन कांहीं वेळ विश्रांति घेतल्यावर त्यानें मार्गक्रमणास सुरवात केली.

एकनाथास चालण्याचा कधींच परिपाठ नसे. आधींच अष्टवर्षांची सुकुमार मूर्ति, तशांत तो सर्व भानुदासवंशाचा एक[1] तंतु अस-

[1] सर्व भानुदासवंशाला एकनाथच काय तो पुढें वंश चालविणारा राहिल्यामुळें, चक्रपाणी व घरांतील माणसें त्याला "एक्या" असें संबोधीत असत. (हिंदुस्थानचा अर्वाचीन कोश "एकनाथ".)

त्याकारणानें, त्याला कोठें ठेवूं व कोठें न ठेवूं असें चक्रपाणीस व त्याच्या सुशील पत्नीस होत असे; तेव्हां त्या बालकास प्रवासाची, व चालण्याची, संवय कोठून असणार ? ग्रीष्मऋतूंतील सूर्याचें प्रखर ऊन लागून अंगांतून घामाच्या धारा चालल्या आहेत, उष्णनिवारणार्थ अंगांतील आंगरख्यानें तप्त मस्तक आच्छादित केलें आहे, पायांत कांटे शिरून त्यांतून रक्ताच्या चिळकांड्या उडत आहेत, उन्हाच्या तिरमिरीनें वारंवार तो मूर्छित होऊन पडत आहे! अशा रीतीनें अत्यंत हाल सोसून एकनाथानें दिवसभर मार्ग क्रमावा व रात्रीचे सुमारास कोणी परिचित मनुष्य भेटेल या भीतीस्तव गांवांत न शिरतां त्यानें रानांत झाडाखालींच रात्र काढावी.

हिकडे एकनाथाच्या घरीं प्रातःकालीं नाथाला जागें करण्याकरितां आजी हाका मारूं लागली, परंतु हाकेसरसा ओ देणारा एकनाथ बऱ्याच हाका मारिल्या तथापि जागा होत नाहीं, हें पाहून चक्रपाणीच्या बायकोस आश्चर्य वाटलें, व एकनाथ बिछान्यावर नाहीं असें पाहून तिच्या पोटांत धस्स झालें. नंतर चक्रपाणीस जागें करून तीं उभयतां घरांत एकनाथाची पुस्तापास्त करूं लागलीं. इतक्यांत पहातात तों दरवाजाला कडी नसून अडसरही ओढलेला नाहीं. तेव्हां एकनाथ खचीत कोठें तरी पहांटचाच बाहेर निघून गेला, अशी सर्वांची खात्री झाली.

शेजारींपाजारीं व आळीमध्यें शोध करण्याकरितां चक्रपाणी व घरचीं सर्व माणसें धांवलीं. जो कोणी भेटे, त्यास केविलवाण्या व घाबरलेल्या स्वरानें चक्रपाणीनें विचारावें कीं, "माझ्या नाथास कोणीं पाहिलें काय ? एक्या कोणाच्या दृष्टीस पडला काय ?" परंतु ज्यांना एकनाथाच्या प्रयाणाची वार्ताही माहीत नव्हती ते लोक त्याच्याविषयीं काय सांगणार ! !

एकनाथ एकाएकीं नाहींसा झाला, ही बातमी पैठणभर हां हां ह्मणतां पसरली. भानुदासाचें घराणें प्रसिद्ध होतेंच, तशांत एकनाथाची विलक्षण बुद्धि, अल्पवयांतच प्रसिद्धीस आलेले त्याचे अलौकिक गुण, व त्याची समाधानवृत्ति, ह्यांच्या योगानें तर पैठणामध्यें

आबालवृद्धांस एकनाथ माहीत होता. सर्वजण आपआपल्या प्रकारें शोध करूं लागले. कोणीं गोदावरींत कोळी घातले. कोणीं सर्व वाळवंट पालथें घातलें, कित्येकांनीं गांवांतील विहिरींत पानबुड्ये उतरविले. याप्रमाणें चोहोंकडे शोध चालविला. परंतु सर्व व्यर्थ. कांहींच पत्ता लागेना.

एकनाथास दूरदूरच्या एकांत देवालयांत बसण्याची हौस असे, ह्मणून गांवांतील व बाहेरील जुनाट देवालयें, भयप्रद दरी, गुहा, व भुयारें हीं सर्व धुंडिलीं; नाथाच्या स्नेह्यांस व सहाध्यायांस विचारिलें; गांवोगांव शोधार्थ जासूद रवाना केले; परंतु एकनाथाची कोणीच कांहीं बातमी सांगेना.

ज्या पुराणिकाला[1] आपला जाण्याचा बेत एकनाथानें कळविला होता, व ज्याच्याकडून नाथाच्या जाण्याची थोडी बहुत माहिती मिळण्याचा संभव होता, तो पुराणीकही याच वेळेस काकतालीय न्यायानें पैठणांत अदृश्य झाला. हा पुराणीक पैठणामध्यें नेहमीं रहात असून, ज्या दिवशीं प्रातःकालीं एकनाथ निघून गेला, त्याच दिवसाच्या पूर्वरात्रीं अकल्पित बेत ठरून कांहीं निकडीच्या कामाकरितां तो परगांवीं निघून गेला. याप्रमाणें नाथाचें कुशलवृत्त कळून बिचाऱ्या चक्रपाणीची काळजी दूर होण्यास कांहींच साधन नव्हतें.

एकनाथाची कांहींच वार्ता कळत नाहीं, हें पाहून चक्रपाणीची कंबर खचली. त्याच्या वृद्ध पत्नीनें मोठ्यानें हंबरडा फोडून धाडकन् अंग टाकून दिलें! चक्रपाणीसही मूर्छा येऊन तो जमिनीवर निचेष्ट पडला! सर्व घरांत एकच कल्होळ होऊन मोठा आकांत माजला! त्या वृद्धांचा दारुण शोक पाहून जमलेला जनसमूह दुःखांत चूर होऊन गेला. नाथाच्या जाण्याविषयीं कोणाचाच कांहीं तर्क चालेना. इतका आज्ञाधारक, सुशील, व शांत स्वभावाचा मुलगा रागावून कोठें पळून जाईल, किंवा एखादी अविचाराची गोष्ट करील, अशी कल्पनाच करवेना.

---

१ कित्येक ठिकाणीं असेंही लिहिलें आहे कीं, हा पुराणीक लढाईमध्यें त्याच वेळीं अकल्पित गेला होता. (छापील प्रत भक्तलीलामृत अ. १५ ओ. ३१-४१.)

चक्रपाणीच्या डोळ्यांला पाणी लावून व त्यास वारा घालून जवळच्या मंडळींनीं वारंवार त्यास सावध करावें, व त्यास नानाप्रकारच्या गोष्टी सांगून दुःखाचा विसर पाडावा. परंतु पुत्रशोकानें आधींच विव्हळ झालेल्या अंतःकरणास पौत्रविरहाचा विसर कोठून पडणार? त्याचे नेत्र दुःखाश्रूंनीं भरून येऊन गळा दाटून येई. डोळ्यांपुढें अंधारी येऊन कांहीं दिसेनासें होई. मुलगा नाहीं तर नाहींच, परंतु नातवाच्या तोंडाकडे पाहून जो आज पुत्रशोकाचा विसर पडत होता, व वार्धक्यावस्थेंत आधारभूत होऊन ज्यानें आजपर्यंत सुख व समाधानच दिलें, त्या आधारभूत स्तंभाचें अस्तित्व अकस्मात् अनिश्चित झाल्यामुळें निराश्रित व निराधार होतसातीं तीं दोघें दुःखसागरांत बुडालीं.

एकनाथाच्या मार्गक्रमणाची मनोवेधक हकीकत, स्वामीजनार्दनाचें चटकदार चरित्र, व गुरुशिष्यांच्या भेटीचा मनोहर वृत्तांत, पुढील भागांत येईल.

---

## भाग तिसरा.

## जनार्दनस्वामी.

**सद्गुरुवांचोनी सांपडेना सोय ।**
**धरावे ते पाय आधीं त्याचे ॥**

(तुकाराम.)

हा सत्पुरुष फाल्गुन कृष्ण षष्ठीस अवतरला. **जनार्दनपंत** हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होता. ह्या पुरुषश्रेष्ठाचें राहण्याचें मूळ ठिकाण चाळिसगांव असून, याचेकडे तेथील देशपांडेपणाचें काम होतें. पुढें आपल्या विद्वत्तेच्या व सद्वर्तनाच्या जोरावर मोठमोठ्या हुद्याच्या जागा मिळवून, शेवटीं दौलताबाद येथील यवन पादशहाचा तो मुत्सद्दी होऊन बसला. जनार्दनपंत लेखणीचा बाका असून न्यायाची केवळ मूर्ति असल्यामुळें, लोकप्रिय होऊन पादशहाचीही त्याजवर मेहर नजर होती. दरबारांत त्याचा दरारा असून त्याच्या

अनुमताशिवाय कोणतीच गोष्ट होत नसे. शूरत्वाच्या संबंधानेंही जनार्दनपंताची लोकोत्तर कीर्ति होती. कसाही दुर्धर प्रसंग गुदरला, किंवा शत्रु कितीही बलाढ्य असला, तथापि शत्रूबरोबर झुंजण्याचा पहिला विडा जनोबांनीं उचलावा, व जयश्रीही निरंतर यासच अनुकूल होऊन त्याच्या शौर्याची दरबारांत नेहमीं वाहवा व्हावी.

योग्यांनाही अत्यंत कठिण, असा सेवाधर्म, समशेरकुराणवाल्या महमदीय मंडळींत जनार्दनपंत अप्रतिहत चालवीत असून, चमत्कार हा कीं, ह्या पुरुषाच्या ठिकाणीं स्वधर्मविमुखता यत्किंचित्‌ही नव्हती. जनार्दनपंत शांकरमताचा पूर्ण अनुयायी असून, गाणगापूर येथील प्रसिद्ध नृसिंहसरस्वतींचा पट्टशिष्य होता.

या महात्म्यानें आपल्या तपोबलाच्या योगानें केवळ हिंदूसच चकित न करितां परधर्मद्वेष्ट्या यवनांसही धर्माच्या अद्भुत प्रभावानें दिपवून टाकिलें, व याचमुळें प्रत्येक गुरुवारीं, जनार्दनपंतांची दत्तात्रेयाची पूजा निर्विघ्नपणें शेवटास जावी ह्मणून, मोंगलदरबार बंद असून गुरुवार हा सुटीचा दिवस मानला होता.

राजधुरेचें जबाबदारीचें काम, पातशहाचा करडा अम्मल, व समशेरकुराणाची द्दीन् द्दीन् शब्दध्वनित भयंकर गर्जना, इतकीं विघ्नें नियमभंग करण्यास मूर्तिमंत उभीं असूनही या पुण्यपुरुषाची स्नानसंध्या, समाधि व दत्तात्रेयमहापूजा, ह्यांत वालाग्रही अंतर कधीं पडलें नाहीं. ह्या पुरुषाची अध्यात्मज्ञानांत इतकी प्रवीणता असे, व त्याचें आचरण इतकें शुद्ध असे कीं, ब्रह्मस्वरूपीं लय लागून दत्तात्रेयाच्या प्रत्यक्ष[१] दर्शनाचाही अलभ्य लाभ या महापुरुषास होत असे.

सारांश.—परमार्थ संपादण्याकरितां जे पुरुष, देशत्याग व संसारत्याग करून अरण्यांत जाऊन अनेकविध क्रिया आचरतात, त्याप्रमाणेंच कित्येक कोत्या समजुतीचे लोक वैदिकधर्मातील रहस्यरत्नांची पारख नसल्यामुळें त्या धर्माची अवहेलना करतात, अशा उभयप्रकारच्या लोकांस, संसार साधूनही परमार्थ कसा साधितां

१ भक्तविजय अ. ४५ ओ. १४.

येतो, वैदिकधर्माचा प्रभाव किती अद्भुत आहे, "करणी करे सो नरका नारायण होय" ही उक्ति अक्षरशः कशी खरी आहे, इत्यादि गोष्टी सिद्ध करून दाखविणारें, जनार्दनपंत हें एक ढळढळीत उदाहरण आहे!!!

आतां हिकडे राजपुत्र ध्रुवाप्रमाणें, ईश्वराचा पत्ता लावणाऱ्या एकनाथाची अफाट अरण्यांत काय हवाल आहे ती पाहूं.

मागें सांगितल्याप्रमाणें एकनाथानें कोणी पाहील या भीतीस्तव नीट रस्ता सोडून आडमार्गानेंच जाण्याचा क्रम चालविला. प्रवास कसा असतो तो ठाऊक नसून गैरमाहीत असल्यामुळें वारंवार देवगडचा रस्ता चुकावा, क्षुधेनें व तृषेनें प्राण व्याकुळ होऊन त्याला पदोपदीं ग्लानी यावी, व झाडांखालीं पडलेल्या फळांनीं व कंदमूळांनीं कशी तरी जठराग्नीची शांति त्यानें करावी.

वाटेनें जात असतां निरनिराळे विचार त्याचे मनांत येऊन त्याची चित्तवृत्ति क्षणोक्षणीं पालटे. आपणास त्या पुण्यपुरुषाची भेट कशी होणार, माझ्या अल्प वयामुळें माझा धिक्कार होईल कीं काय, इत्यादि गोष्टींविषयीं विचार करीत वीस कोस जमीन पांच दिवसांत तुडवून, ही वामनमूर्ति देवगडावर पंतांच्या दाराशीं येऊन थडकली.

जनार्दनपंतांची भेट घेणें झाल्यास वाड्यांत जाणारास कधींच मनाई नसे. त्याप्रमाणें पंतांची भेट घेण्याविषयीं आपला मनोदय दर्शित केल्यावर ज्या दालनांत जनार्दनपंत कांहीं दरबारचे कागदपत्र पहात बसले होते त्या ठिकाणीं एकनाथास सेवक घेऊन गेला. जनार्दनपंत कामांत गुंतले आहेत असें पाहून वाटेच्या श्रमानें श्रांत झालेला व क्षुधेनें अत्यंत पीडित झालेला एकनाथ मुकाट्यानें कोंपऱ्यांत उभा राहिला.

इतक्यांत जनार्दनपंतांची दृष्टि सहज तिकडे गेली आणि पहातात तों अष्टवर्षांची चिमुकली मूर्ति, ब्रह्मचारीवेष धारण करून कोंपऱ्यांत उभी आहे. त्या बटूची तेजःपुंज कांति, त्याचे पाणीदार डोळे, उन्हानें झालेलें आरक्त शरीर, मुखावरील घर्मबिंदूंची मौक्तिकतुल्य शोभा, सुशोभित मृगचर्मयुक्त यज्ञोपवीत, व पीतवर्ण कौ-

पीन, हीं पाहून जनार्दनपंतांस मोठें कौतुक वाटलें, व ब्रह्मचारीवेष धारण करून बटूच्या वेषानें दर्शन देण्याकरितां ही दत्ताची स्वारीच आली कीं काय, असा भास झाला. एकनाथानें जनार्दनपंत आपल्याकडे पहातात असें पाहून मोठ्या नम्रतेनें साष्टांग प्रणिपात करून पंतांचे पाय घट्ट धरिले.

जनार्दनपंतांनीं एकनाथास उठविलें व त्यास आपले जवळ बसवून घेऊन 'तूं कोण? व येथें कशाकरितां आलास?' असें मोठ्या ममतेनें त्यास विचारिलें. जनार्दनपंतांची सौम्यमुद्रा, त्यांचें तेजःपुंज शरीर, व दयार्द्र भाषण ऐकून एकनाथास पराकाष्ठेचा धीर आला व त्यांजविषयींची पूज्यबुद्धि दृढतर होऊन आकाशवाणीचें प्रत्यंतर अनुभवास येऊं लागल्यामुळें, त्यास अपरिमित आनंद झाला. नंतर त्यानें आपलें इतिवृत्त फार नम्रपणानें सांगून, आपली पुराणश्रवणाची गोडी, ब्रह्मज्ञानसंपादनाची अत्युत्कट इच्छा, परमेश्वराच्या प्रत्यक्ष दर्शनाविषयीं दृढ संकल्प व तदनुसार शिवालयांत झालेली गंभीर देववाणी ह्या गोष्टी सुरस रीतीनें यथार्थ वर्णन केल्या.

एकनाथाचें मृदु भाषण, त्याचा मर्यादशीलपणा, ब्रह्मज्ञानसंपादनाची स्वभावसिद्ध स्फूर्ति व त्याचा दृढ निश्चय, हीं पाहून हा कसोटीस उतरेल असें पंतांस वाटलें व 'तुझ्या अंगीं पात्रता आली ह्मणजे तुला उपदेश करूं,' असें आश्वासन देऊन जनार्दनपंतांनीं जवळ रहाण्याची आज्ञा दिली, आणि त्यास किल्ल्यावर ठेवून घेतलें.

१ दत्तात्रेयाचा भास होण्याचें कारण हेंच कीं, त्या दिवशीं ध्यानस्थ असतां, ही चतुर्मूर्तीच जनार्दनपंतांच्या ध्यानांत येई, व त्या दिवशीं जनार्दनपंतांस शुभचिन्हें होत होतीं. (भक्तलीला० अ. १२ ओ. ६७–६८.)

२ ह्या निबंधाचा आदिनायक जो एकनाथ, त्याचा दौलताबाद आणि जनार्दनपंत ह्यांशीं निकटचा ऐतिहासिक संबंध असल्यामुळें, देवगड किल्ल्याच्या इतिहासप्रसिद्ध माहितीचें दिग्दर्शन करणें अवश्य आहे.

देवगड किल्ल्यावर प्रथम रामदेवराव राजा असून दौलताबाद ही अत्यंत मोठी व महत्वाची राजधानी होती. रामदेवरावाची व अल्लाउद्दीनाची ह्या किल्ल्यावर एक मोठी लढाई झाली. १३२५ मध्यें महमद तघलख यानें आपल्या लोकांस दिल्लीहून निघून देवगडावर जाऊन रहाण्यास सांगितलें व त्या किल्ल्याला 'देवगड' न ह्मणतां

# भाग चौथा.

## छात्रावस्था.

### चणे खावे लोखंडाचे। तेव्हां ब्रह्मपदीं नाचे ॥

स्वामीजनार्दनाची रहाण्याविषयीं आज्ञा होतांच एकनाथास मोठा हर्ष झाला. नंतर आपल्या आंगची नम्रता, आज्ञाधारकत्व, सहनशीलता, व ज्ञान हीं दाखवून एकनाथानें उत्तरोत्तर गुरूची पूर्ण मर्जी संपादन केली. कोणत्याही वेळीं किंवा कोणत्याही स्थलीं पहावें, तों गुरूची सेवा करण्यास व गुरूची आज्ञा पाळण्यास हा शिष्यवर उभा आहेच. अल्प वयास, सुकुमार तनूस, व मानापमानांस न जुमानतां स्वामीजनार्दनास संतुष्ट राखण्याकरितां अनेक प्रसंगीं ह्या सच्छिष्यानें आपला जीव धोक्यांत घालावा, अनेक प्रकारचें साहस आचरावें, व समयविशेषीं असह्य वेदना सोसाव्या, परंतु गुरुसेवेंत इतकें मुद्दां अंतर पाडूं नये.

स्वामिसेवेचें घोर तप आचरणाऱ्या ह्या तपस्व्यानें प्रात:कालीं उठावें. मुखमार्जनादि विधि झाल्यावर गुरुमार्ग, गुरुगृह व देवगृह हीं उत्तम रीतीनें झाडून स्वच्छ करावीं. जनार्दनपंतांची उठण्याची वेळ झाली ह्मणजे, गुरुद्वारीं मंजुळ व सुस्वर असें गुरुस्तुतिपर गीत गावें. स्वामी उठले ह्मणजे मुखमार्जनाची तयारी सुरेख रीतीनें करून ठेवावी. चांदीच्या फुल्यांचा शिस्वी पाट मांडून उष्णोदकानें

'दौलताबाद' ह्मणावें असा हुकूम फर्माविला. पुढें इस्माएल ऊर्फ नासरुद्दीन हा दौलताबादच्या तक्तावर बसला. नंतर अल्लाउद्दीन हुसेनकांगो ब्राह्मणी येऊन त्याचे वेळीं राज्यप्रकरणांत ब्राह्मण कारकुनांचा हात बराच शिरला होता. त्यानंतर महमदशहा ब्राह्मणी आला. ह्याच सुमारास ब्राह्मणी राज्य अवाढव्य झाल्याकारणानें त्याचे लहान लहान सुभे करून ते वांटून दिले. पुढें अहमदशहा ब्राह्मणी आला. ह्या वेळीं ब्राह्मणलोक मामलतीच्या, वसुलाच्या, व दुसऱ्या कित्येक राजकारभाराच्या कामावर असून, दादू नरसू काळे हा कारकून त्या वेळीं प्रसिद्ध होता. याप्रमाणेंच १५२६ त ब्राह्मणी राज्य बुडालें असतां मलिक आमेद ह्यास खाजेखानानें मुख्य केलें. यावरून मलिक आमेद हाच स्वामीजनार्दनाचा अधिपती किल्ल्यावर होता, असें ऐतिहासिकरीत्या दिसतें.

भरलेलीं पात्रें व दंतधावनाचें साहित्य सिद्ध करून ठेवावें. स्नानाची सर्व तयारी करून द्यावी. परिधान करण्याचीं वस्त्रें उत्तम रीतीनें चुणून ठेवावीं. पूजापात्रें स्वच्छ करून जेथल्या तेथें मांडून ठेवावीं. पंचामृतपूजेची सर्व सामुग्री सिद्ध करावी. चंदनाचें सुगंधि गंध उगाळून द्यावें. नानाप्रकारचीं रंगी बेरंगी सुवासिक पुष्पें घालून परड्या तयार ठेवाव्या. बेलाचे व तुळशींचे लक्ष निवडून मोजून ठेवावे, याप्रमाणें पूजेची सर्व तयारी करून पूजेअर्चेचा थाट व समाधीचा देखावा पाहून आनंदभरानें डुलत, हा जनार्दनशिष्य गुरुमुखांतील प्रत्येक शब्द झेलण्यास निरंतर तत्पर असे.

एकनाथाची शरीरसंपत्ति उत्तम असल्यामुळें व त्याची बुद्धि तीव्र असल्याकारणानें गुरुसेवेचें कडकडीत व्रत पाळण्यास, कालाचा किंवा स्थलाचा प्रतिबंध त्याला कधींच झाला नाहीं. स्वामीजनार्दन वाड्यांत असोत किंवा दरबारांत असोत, देवालयांत असोत किंवा यवनांच्या तर्फेनें रणभूमीवर झुंजत असोत, कोठें असले, तथापि या शिष्यश्रेष्ठानें यथाशक्ति गुरूस सहाय करून त्यांची प्रसन्नता व आपल्याविषयींचें त्यांचें प्रेम हीं वृद्धिंगत करावीं.

जनार्दनस्वामींनीं आपल्या शिष्याचा निग्रह किती आहे, त्याची श्रद्धा कितपत आहे, व त्याच्या अंगीं उपदेशग्रहणाची पात्रता आहे किंवा नाहीं, हें पाहण्याकरितां त्यास नानाप्रकारचीं अचाट कृत्यें करण्यास सांगितलीं, दुष्प्राप्य व महत्कष्टसाध्य वस्तु नियमित कालांत प्राप्त करून देण्याविषयीं आज्ञा केली, भयंकर व घनघोर अरण्यांत सुलिंभपर्वतासारख्या[1] अत्युच्च गिरि-शिखरावर तपश्चर्यादि करण्यास सांगितलें, तथापि इतक्याही संकटांस न जुमानतां, गुर्वाज्ञेप्रमाणें सर्व गोष्टी शेवटास नेऊन, हा विजयी एकाजनार्दन, जनार्दनशिष्यत्रयांत,[2] जनार्दनाचा पट्टशिष्य होऊन बसला; आणि

१ देवगडाच्या पाठीमागेंच एक मोठा पर्वत आहे. त्या ठिकाणीं एकनाथानें गुर्वाज्ञेवरून तपश्चर्या केली. ( भक्तलीलामृत अ० १४ ओ० २४-११४ ).

२ जनार्दनपंतांचे एकनाथाशिवाय रामाजनार्दन व जनीजनार्दन असे दोन शिष्य होते; ह्या सगळ्यांमध्यें एकनाथ मुख्य होता. ( हिंदुस्था० अर्वा० कोश. )

वेदविद्या, गुरुप्रसन्नता व आत्मज्ञान हीं संपादन करीत, गुरुसमागमानें आनंदांत काळ घालवूं लागला.

एकनाथास गुरूच्या समागमानें अनेक लाभ होऊं लागले. त्यानें आपल्या ज्ञानराशीची अभिवृद्धि करण्यास सुरवात केली, व जनार्दनपंतांस अध्यात्मविषयसंबंधी शंका आणि कोड्या विचारून त्यांचें तो यथास्थित समाधान करून घेऊं लागला. पंतांनींही मोठ्या संतोषानें एकनाथाबरोबर वेदांतविषयावर वादविवाद करावा, त्यास तो विषय नीट समजावून देऊन त्या विषयाची योग्यता पूर्णपणें त्याचे लक्षांत आणून द्यावी, आणि 'अमृतानुभव' व 'ज्ञानेश्वरी' ह्यांतील ब्रह्मरहस्य एकनाथाचे हृत्पटिकेवर उत्तम प्रकारानें रेखून द्यावें.

जो एकनाथ वृद्ध आजास व आजीस सोडून आठव्या वर्षीच ब्रह्मप्राप्तीसाठीं गुरुसेवेचें व्रत आचरूं लागला त्या एकनाथाच्या ठिकाणीं एक तपपर्यंत गुरूची सेवा एकनिष्ठपणें केल्यावर, व स्वामीजनार्दनासारख्या वेदांतविषयनिपुण पुरुषाकडून शंकासमाधान झाल्यावर ब्रह्मोपदेश करण्याची पात्रता येत चालली.

याप्रमाणें एकनाथाच्या गुरुभक्तीस व त्याच्या एकनिष्ठतेस उत्तमप्रकारचे कस लागूं लागल्यावर या गुरुशिष्यांचें परस्परांवरील प्रेम दृढ होत चाललें, व यास लवकरच उपदेश करावा असा जनार्दनपंतांचा निश्चय झाला.

जनार्दनपंतांच्या पट्टशिष्याची, गुरुभक्तीच्या संबंधानें व अध्यात्मज्ञानाविषयीं जशी लोकोत्तर कीर्ति होती तशीच त्याचें अलौकिक धारिष्ट, व अप्रतिम युद्धकौशल्य ह्यांविषयींही त्या वेळेस मोठी ख्याति होती. प्रख्यात तत्त्ववेत्ता व साधु जो सॉक्रेटिस्, हा ज्याप्रमाणें भयानक युद्धसंग्रामांत आपली कर्तबगारी दाखवी, त्याप्रमाणेंच एकनाथानेंही अनेक प्रसंगीं आपल्या गुरूची तरफ घेऊन समशेरबहादरी गाजवावी व आपल्या उपास्य देवाचा विजयध्वज चोहोंकडे उभारावा.

एकनाथाच्या शौर्याविषयीं[1] अशी एक चमत्कारिक आख्यायिका आहे कीं:—एके समयीं पातशहावर अकस्मात् परचक्र येऊन दौलताबाद शहराभोंवतीं शत्रूचा गराडा पडला. रणशूर जनार्दनपंतांसारखा धीराचा दुसरा कोणीच सरदार जवळ नांव घेण्यासारखा नसल्यामुळें 'शत्रूवर एकदम चाल करून जावें' असा पातशहाचा निरोप घेऊन त्वरेनें एक स्वार गडावर जनार्दनपंताकडे आला. पंतांची ती वेळ ध्यानस्थ बसण्याची होती. स्वार आला त्या वेळेस देवगृहाचें द्वार बंद असून आंत जनार्दनपंतांनीं समाधि लाविली होती, व दाराबाहेर एकनाथाचा खडा पहारा चालला होता. स्वाराचा निरोप ऐकून एकनाथ विचारांत पडला. त्यानें विचार केला कीं, 'या वेळेस स्वामी ध्यानस्थ असून राजाज्ञा विदित करावी तर समाधिभंग होतो, व न करावी तर विलंब लागून काय अरिष्ट गुदरेल कोण जाणे.' असा विचार करितो तों एकाएकीं तोफांचे भयंकर आवाज ऐकूं येऊन सर्वत्र अंधःकार व धूळ दिसूं लागली. तेव्हां ही वेळ विचार करण्याची नाहीं असें जाणून त्यानें लागलीच पायांत तुमान चढविली, अंगांत चिलखत व डोकीला मंदिल फडकाविला, चढाऊ जोडा पायांत चढवून पाठीशीं ढाल बांधिली, व एका हातांत तलवार व दुसऱ्या हातांत भाला घेऊन मनांत विचार करितो कीं, 'कांहीं होवो; यश येवो, किंवा अपयश येवो. दोहोंतही सारखाच लाभ होणार. यश प्राप्त झाल्यास सद्गुरूंचा यशोध्वज चोहोंकडे फडकेल, व रणभूमीवर धारातीर्थी मरण आल्यास, स्वामिकार्यार्थ ह्या जड देहाचा उपयोग होईल.' नंतर गुरुजींस दाराबाहेरूनच नमस्कार करून "जय स्वामीजनार्दन" ह्मणून तो दाराबाहेर पडला. किल्ल्याच्या खालीं येतो तों शत्रूकडील लोक रणवाद्यांचा भयंकर आवाज करीत तोफांनीं वेशी व शहराभोंवतालचा तट फो-

[1] नाथाचें शौर्य ( भक्तलीला० अ० १३ ओ० १०७–१३७ ) या आख्यायिकेवरून व कित्येक स्थळीं जे या लढाईच्या संबंधानें उल्लेख, या महिपतीच्या ग्रंथांत वाचण्यांत आले, त्यांवरून असें एक अनुमान निघतें कीं, ग्रीस, रोम, आदिकरून देशांत जशी सर्व प्रजा युद्धकुशल असे त्याप्रमाणें मोंगलाईंत, प्रत्येकानें सरकारास युद्धांत सहाय करावें असा तेथें नियम असे.

डीत आहेत ! शहरांत सर्वत्र अस्वस्थता होऊन पौरजन हवाल-
दील होऊन गेलेला आहे ! पातशहाचें सर्व सैन्य तयार असून से-
नानायकाच्या आज्ञेची वाट पहात आहे ! याप्रमाणें प्रकार पाहून
एकनाथानें शत्रूवर एकदम तुटून पडण्याचें सूचक शिंग फुंकिलें. व
आपणही वेशीचे दरवाजे उघडून सर्व सैन्यासहवर्तमान शत्रूचे
तोंडावर जाऊन पडला. एकनाथानें ह्या धाईच्या वेळेस लढाईचा
सर्व पोशाख जनार्दनपंतांचाच घातलेला होता. व ह्या गुरुशिष्यांचें
रूपसादृश्य कांहीं मौजेचें असल्यामुळें, ह्या प्रसंगीं वतावणी कर-
ण्यास स्वरूपाचा सारखेपणा एकनाथाच्या फारच उपयोगीं पडला.
'असल्या विकट प्रसंगीं आपल्या आज्ञेस न जुमानतां जनार्दनपंत
गेला नाहीं' ही वार्ता पातशहास कळली असतां त्याची मर्जी खप्पा
होईल, ह्या भीतीस्तव एकनाथास कृत्रिमजनार्दन होण्याखेरीज दुसरी
तोडच ह्या वेळीं निघण्यासारखी नव्हती.

स्वामिसेवा करण्याकरितां प्रसंगविशेषीं एकनाथ समरभूमीवरही
जात असे; त्यामुळें केवळ गुरुसाहचर्यानेंच निशाण मारणें, भाला
फेंकणें, भरधांव घोडा टाकणें, इत्यादि गोष्टींत तो निष्णात झाला
होता, व त्यास आपल्या गुरूचें युद्धकौशल्यही पूर्णपणें माहीत होतें.
वय तरुण स्वरूपांत सादृश्य, पोषाख खुद्द जनार्दनपंतांचा, व
युद्धकौशल्याची पूर्ण माहिती ह्या इतक्या गोष्टींमुळें, एकनाथाच्या
कृतींत, स्थितींत किंवा रूपांत यत्किंचित् सुद्धां विसंगतपणा दिसला
नाहीं; व हा आपला सेनानायक जनार्दनपंत आहे किंवा दुसरा
कोणी आहे, हें त्या धाईच्या वेळेस कोणासच ओळखितां आलें नाहीं.

पातशहाचें सैन्य बाहेर येतांच उभयपक्षांकडील सैन्य एकत्र हो-
ऊन भयंकर रणकंदन माजलें. एकनाथ आपल्या सैन्यास वारंवार
उत्तेजन देत व घोडा वाऱ्यासारखा फेंकीत, शत्रूंचीं शिरें भराभर
तोडूं लागला. एकनाथाचें हस्तकौशल्य पाहून उभयपक्षांकडील लोक
तोंडांत बोट घालून राहिले ! शत्रूकडील लोक अधिक असल्यामुळें
पातशहाचे लोकांनीं प्रथम थोडी माघार घेतली, परंतु लोक कडवे
असून त्यांस नाथासारखा मोहरा अधिपति मिळाल्यामुळें, पातशहाचे

लोक दीन् दीन् करीत शत्रूवर तुटून पडले! आणि शत्रुसैन्याची त्यांनीं दाणादाण करून त्यांस हाकलून लाविलें!!

याप्रमाणें हा कृत्रिमजनार्दन विजयी होऊन सैन्यासहवर्तमान नगरांत आला. हिकडे समाधिविसर्जन झाल्यावर जनार्दनपंत बाहेर येऊन पाहतात तों, एकनाथ तेथें नसून देवद्वारांत एक कागद मात्र पडलेला आहे. नंतर कागद हातांत घेऊन वाचतात तों त्यांत, पातशहावरील संकट, त्याची निकडीची आज्ञा, व निरुपायास्तव आपण केलेलें साहस याचें संक्षिप्त रीतीनें एकनाथानें वर्णन केलें आहे. तें वाचून व आपल्या शिष्याची समयसूचकता, स्वामिभक्ति, व धारिष्ट पाहून जनार्दनपंत थक्क होऊन गेले.

एकनाथ समरभूमीहून निघाला तो थेट किल्ल्यावर आला. सर्व शरीर रक्तानें व धुळीनें माखलें आहे, वार लागून त्यांतून रक्ताचे प्रवाह चालले आहेत, लढाईचा पोषाख अस्ताव्यस्त होऊन गेला आहे, अशा भयानक मुद्रेनें ही कृत्रिमजनार्दनाची स्वारी एका हातांत समशेर, व दुसऱ्या हातांत शत्रूकडील सैन्याधिपतीचें शिरकमळ घेऊन, गुरुदर्शनास आली. व साष्टांग नमस्कार घालून मोठ्या विनयानें उभी राहिली. जनार्दनपंतांनीं आपल्या विजयी शिष्याच्या अलौकिक शौर्याची फार तारीफ केली; व गुदरलेला प्रसंग मोठ्या शहाणपणानें पार पाडिल्यामुळें त्याची पाठ थोपटली.

सर्व शहरांत व दरबारांत जनार्दनपंतांच्या अद्वितीय शौर्याची फार वाहवा झाली, व पातशहाची मर्जी सुप्रसन्न होऊन मानाचीं वस्त्रें व पालखी जनोबांस आणण्याकरितां गडावर पाठविली.

कविवर्य मोरोपंताप्रमाणें एकनाथास लागलेली पावआण्याची प्रसिद्ध चूक व ब्रह्मविद्या, ह्यांचा सुरस कथाभाग पुढें दिलेला आहे.

---

# भाग पांचवा.

## ब्रह्मविद्या.

**ब्रह्मज्ञान नव्हे लेंकुराच्या गोष्टी।**
**तेथें व्हावा पोटीं अनुताप ॥** (तुकाराम.)

एकनाथ जसा इतर गुणांनीं मंडित होता, त्याप्रमाणेंच तो व्यवहारचतुर असून लेखणीचा बळकट असे. राजधुरेचीं मोठमोठीं कामें जनार्दनपंतांनीं एकनाथावर सोंपवावीं व तीं या कुशल पुरुषानें, निर्दोष शेवटास न्यावीं. कोणत्या प्रसंगीं कसें वागावें हें तो पूर्णपणें जाणत असून मनुष्यमात्राच्या अंतरंगाची त्यास चांगली पारख असे. सारांश जनार्दनपंतासारख्या दरबारी, व साधुश्रेष्ठ पुरुषाच्या साहचर्यानें एकनाथ इतका अष्टपैलू बनून गेला होता कीं, ज्या ज्या हुन्नरांत त्याची योजना करावी, त्या त्या हुन्नरांत त्यानें वहादरीच मिळवावी.

जनार्दनपंतांनीं दप्तरांत हिशेब राखण्याचें जबाबदारीचें काम एकनाथावर सोंपविलें होतें. एकनाथ हा बाका कारकून असून त्याचें अक्षर दिव्य असे. एके दिवशीं सायंकाळीं यजमानांनीं कारकुनांस सांगितलें कीं, "उदयीक दप्तराची तपासणी व्हावयाची आहे, तेव्हां हिशेब तयार करून ठेवावा." कारकुनांनीं "फार उत्तम आहे" ह्मणून सांगितलें.

नंतर नित्यनेमाप्रमाणें पादचूरणादि गुरुसेवा झाल्यावर रात्रीं अकरा वाजण्याच्या सुमारास, हिशोब तयार करण्यास एकनाथानें आरंभ केला. नाथाचें लिहिणें चोख असल्याकारणानें, भानगड मुदलींच नव्हती. सुमारें अर्धघटकेच्या आंत सर्व हिशेब तयार झाला. परंतु जमेचा व खर्चाचा मेळ बसण्यास पावआण्याचें अंतर पडूं लागलें. नंतर सर्व हिशेब पुनः पाहूं लागला. परंतु पावआण्याची चूक सांपडेना. पुनः तेरीज, पुन्हा बेरीज, पुन्हा ताळेबंद, याप्रमाणें बहुत वेळ करून पाहिलें; तथापि कोणत्या ठिकाणीं बेरीज चुकते हें कळेना.

इतक्यांत जनार्दनपंत अकस्मात् जागृत होऊन पहातात तों, एकनाथाच्या खोलींत दिवा असून कांहीं ध्वनि ऐकूं येत आहे!

मग नाथाच्या खोलीजवळ जाऊन अवलोकन करतात तों, खोलीचें दार उघडें असून आंत एकनाथ रुमालांचे मोठमोठे ढीग सोडून बसलेला आहे! मध्यरात्र उलटून तीन वाजण्याचा सुमार झालेला आहे! चोहोंकडे शांतता व सामसूम असून रात्रीचा मात्र किर्र् ध्वनि ऐकूं येत आहे! दिव्यांत पुन्हःपुन्हा तेलाचें भरण घालून एकनाथाचा बेरजेचा तडाका चालला आहे! तहान लागून घशाला कोरड पडली आहे! एकसारखें बसण्यानें पाठ ताटकळून नेत्र आरक्त झाले आहेत! असा हा प्रकार पाहून जनार्दनपंतांस परम आश्चर्य वाटलें, व खोलींत जाऊन नाथाच्या जवळ ते उभे राहिले.

एकनाथ इतका तल्लीन होऊन गेला होता कीं, आपल्याजवळ गुरुमूर्ति उभी आहे, याचें त्यास मुदलींच भान नव्हतें. पैशाची चूक न सांपडल्यामुळें अत्यंत खिन्न व भयभीत होत्साता विचार करतो कीं, "उदयीक हिशोब मागितला असतां काय उत्तर द्यावें? गुरुरायाची मजवर वक्रदृष्टि झाल्यास माझ्या कुदशेची परमावधि होणार नाहीं काय? माझ्या अभ्युदयाचा समय सन्निध आला असून ह्या चुकीच्या रूपानें माझें दुर्दैव तर ओढवलें नाहींना? कोट्यावधि रुपयांची उलाढाल माझे हातून झालेली असून, आजच एक पैशाची चूक माझ्या प्रामाणिकपणास व स्वामिसेवेस कालिमा लावणार काय?" याप्रमाणें आपल्या मनांत विचार करतो आहे, भयानें अंगास कंप सुटला आहे, दुःखाश्रूंनीं डोळे भरून येऊन गळा दाटून आला आहे, व हातांनीं वह्यांचीं पानें वारंवार चाळीत आहे, इतक्यांत हस्तदोषानें विपरित पडलेला आंकडा आढळून पावआण्याची चूक सांपडली. चूक सांपडतांच आपण आज कृतकृत्य आहोंत, असें वाटून आनंदभरांत एकनाथानें मोठ्या हर्षानें टाळ्या पिटिल्या व मोठ्यानें गदगदां हांसूं लागला.

जो एकनाथ हात जोडून निरंतर नम्रपणानें उभा असणार, तो आज हिकडेतिकडे न पाहतां आनंदभरानें टाळ्या पिटितो, तेव्हां

यास इतका परमानंद होण्याचें काय कारण आहे तें विचारावें, ह्मणून जनार्दनपंत खालीं बसले व त्यास प्रश्न केला.

आपल्याजवळ गुरुश्रेष्ठ बसले आहेत हें पाहून एकनाथ चपापला, व संभ्रमानें उभें राहून विनयानें ह्मणाला, "महाराज, आपल्या आज्ञेप्रमाणें हिशेब तयार करीत असतां एका पैशाची चूक सांपडेना. त्यामुळें चित्त उद्विग्न होऊन आपली अवकृपा झाली असतां माझी काय अवस्था होईल ह्याविषयीं विचार करीत होतों; इतक्यांत पावआण्याची चूक सांपडली; व तेणेंकरून पराकाष्ठेचा हर्ष वाटून मी आनंदभरांत टाळ्या पिटिल्या."

एकनाथाचें हें भाषण ऐकून जनार्दनपंतांस गहिंवर आला; एकनाथाचें आपणावरील अप्रतिम प्रेम, त्याचें शुद्ध व पवित्र आचरण, व उपदेश करण्याविषयीं त्यास दिलेलें अभिवचन, ह्यांचें स्मरण होऊन त्यांनीं त्याचा हात धरला व मोठ्या ममतेनें त्यास आपल्याजवळ बसविलें, आणि सद्गदित अंतःकरणानें ह्मणाले:—

"हे शिष्यश्रेष्ठा, तुझ्या भक्तीच्या योगानें मी फार संतुष्ट झालों. तुला ब्रह्मोपदेश करण्याविषयीं दिलेलें वचन पुरें करण्यास प्रस्तुत प्रसंग फारच उत्तम आहे, यास्तव तुला सांगतों ती गोष्ट चित्त देऊन ऐक. एकनाथा, एक पैशाची चूक शोधून काढण्याकरितां तुझें चित्त इतकें जर एकाग्र होऊन गेलें होतें कीं, मी एक तासपर्यंत तुझेजवळ उभा असून तुला यत्किंचित् सुद्धां कळलें नाहीं, तर ही मायारूप जी मोठी चूक ती शोधून काढण्यास चित्ताची एकाग्रता धारण कर. या चुकीनें आह्मी ब्रह्मानंदास आंचवून क्षणिक व भासमान संसारसुखाचे ठिकाणीं आसक्त झालों. याच मायेच्या योगानें आह्मी नानाविध नामरूपाचे अलंकारांचे ठिकाणीं सत्तासुवर्ण ओळखीत नाहीं. याच महामायेच्या प्रभावानें चित्ताची निर्विषयता राखणें महत् कष्टसाध्य आहे. हे शिष्यवरा, स्वप्नावस्थेंत असतांना जशा आपल्या नानाविध मनोवृत्ति होतात, ह्मणजे, राजपद प्राप्त झालें असतां गद्गदां हंसतों, चोरी केली असतां राजदंड भोगून आक्रंदन करतों, परंतु जागृतावस्था प्राप्त झाल्यावरोवर राजपदाची व पाठीवर ब-

सलेल्या फटक्यांची योग्यता सारखीच समजतों व स्वप्न मिथ्या मानतों, तद्वत् हें जें संसाररूप महास्वप्न त्यांतील सुखदुःखाची किंमतही सारखीच जाण. वस्त्राचे धागे पृथक् पृथक् केले असतां जशी "धोतर" ही संज्ञा नष्ट होऊन कापूस मात्र रहातो, किंवा "गोट, पाटल्या" आदिकरून सुवर्णाच्या आभरणांवर आघात केला तर "गोट, पाटल्या" ह्या संज्ञांचा नायनाट होऊन केवळ सोनें दिसावयास लागतें तद्वत् केवळ अज्ञानेंकरून भासणारें जें हें जगत् त्या ठिकाणीं अद्वैतदृष्टीनें पाहूं लागलें ह्मणजे ब्रह्माखेरीज दुसरा पदार्थ नाहीं असें स्पष्ट दिसून येईल.

परमार्थ साधण्याकरितां संसाराचा त्याग करण्याची किंवा पंचाग्निसाधनाप्रमाणें अरण्यांत बसून अघोर तप तपण्याची आवश्यकता नाहीं. पूज्य व पवित्र मातापितरांस वियोगजन्य दुःख दिल्याशिवाय प्रपंचांत राहून निराधार कच्चाबच्चांचें योग्य रीतीनें संरक्षण करूनही परमेश्वरप्राप्ति होते. आश्रमचतुष्टयापैकीं कोणत्याही आश्रमांत जीवन्मुक्त होण्यास प्रतिबंध नाहीं. गृहस्थाश्रमाची थोरवी ही आहे कीं, त्यांत प्रपंच व परमार्थ हीं दोन्ही साधितां येतात. कामक्रोधादि षड्रिपु जिंकण्याचे भयंकर प्रसंग जसे संसारांत येतात, तसे अरण्यांत येत नाहींत. ह्याकरितां गृहस्थाश्रमांत शमदमादि देवता जर षड्रिपूंचा पाडाव करतील, तर ती गोष्ट विशेष अभिनंदनीय होय. यथाशक्ति आर्तांचें दुःखविमोचन, व अज्ञजनांस सन्मार्गदर्शन, यांतच खरा पुरुषार्थ आहे. "परोपकारः पुण्याय." परोपकारासारखें पुण्य नाहीं. ह्याकरितां बा एकनाथा, एक तपपर्यंत ब्रह्मचर्य व्रत धारण करून आचरलेलें गुरुभक्तीचें तप आज समाप्त झालें. या तपाची सफलता जें दत्तदर्शन तेंही तुला लवकरच घडेल. तुझ्या आचरणावरून तूं असाधारण पुरुष आहेस यांत संदेह नाहीं. तुझ्या हातून पुढें महत्कार्यें होणार, अशी तुझी वृत्ति साक्ष देत आहे. तर या पावआण्याच्या चुकीची गोष्ट लक्षांत वागवून द्वैतभावाची घातुक चूक काढून टाक, ह्मणजे तादात्म्य पावून ब्रह्मानंदांत निमग्न होशील." असें ह्मणून जनार्दनस्वामींनीं एकनाथाच्या

कानांत ब्रह्मविद्येचा गुरुमंत्र सांगितला, व मस्तकीं हात ठेवून अनुग्रह दिला. याप्रमाणें हा ब्रह्मविद्येचा व अनुग्रहाचा प्रसंग फाल्गुन कृष्ण षष्ठीस घडला.

गुरुमुखांतून स्रवणाऱ्या मधुर उपदेशामृताचे घुटके कर्णरंध्रांनीं घटाघट घेत असतां, एकनाथाच्या पोटांत आनंदाच्या गुदगुल्या होत होत्या. पूर्ण अनुताप पावून, ब्रह्मविद्येच्या परम गुप्त भांडाराच्या किल्लया हातीं लागल्यामुळें त्यास कृतकृत्य झालों असें वाटलें; व उपास्यदेवास नमन करून सद्गदित होत्साता मोठ्या भक्तीनें, गुरुचरणावर लेखणी ठेवून ह्मणतो:—

ओंव्या.

नरदेह मुद्दल सालमजकुर ॥ गुदस्तां रुजूं पूर्वसंस्कार ॥ प्रेमपत्र हृदयीं अक्षर ॥ स्वधर्मे थोर खर्च केला ॥ १ ॥ फळ त्याग करितांची सकळ ॥ रुजूं पावलों स्वामीजवळ ॥ ब्रह्मार्पणीं तयेवेळ ॥ अर्पिलें नकळेंचि सर्वथा ॥ २ ॥ विचार हा सुरनीस नेमाचा ॥ सावधानपणें लिहितां साचा ॥ वरी मनसूर सद्गुरुकृपेचा ॥ हिशोब सकळाचा पुशिला ॥ ३ ॥ एवं नरदेह जमा झाडियासि आणुनी ॥ अज्ञानबाकी झाडा करुनि ॥ मी विनटलों तुमचे चरणीं ॥ व्यापार सांडोनी निजछंदें ॥ ४ ॥ त्रैलोक्याचे स्वामी आपण ॥ व्यापार झाला तुह्मांपासून ॥ ते वाचेसी आवडे कृष्णनाम ॥ कृपेकरूनि आपुल्या ॥ ५ सोहं दिधलें खुर्दखत ॥ तें मस्तकीं वंदिलें म्यां त्वरित ॥ प्रेमाचीं वस्त्रें अपरिमित ॥ पावलों निश्चित ये काळीं ॥ ६ ॥ निजमुक्तीचा लाधलों विडा ॥ तेणें वारिली भवरोगपीडा ॥ कैवल्यपुरासी जाउनि रोकडा ॥ चैतन्यहुडां बैसलों ॥ ७ ॥ स्वानुभवाची तहशील निकी ॥ रसद स्वामीस दीधली शेखीं ॥ संतसंगें वारून वसूलबाकी

**॥ हुजत नेटकी भक्तीची ॥ ८ ॥ पूर्वसुकृत होतें कांहीं ॥ मग रामनाम व्यापार लाधलों पाहीं ॥ अतएव मी ये समयीं ॥ घालितों पायीं दंडवत ॥ ९ ॥**
असें ह्मणून एकनाथानें गुरुचरणीं लोटांगण घातलें.

पर्वतावरील वृक्षांच्या गर्द छायेंत दत्तपूजेचा मनोरम देखावा, व दत्तात्रेय प्रगट होऊन त्यांनीं दिलेल्या प्रसादाचा अद्भुत प्रसंग पुढील भागांत वर्णिला आहे.

---

## भाग सहावा.

## दत्तात्रेयदर्शन.

[1]अहह महतां निःसीमानश्चरित्रविभूतयः

(भर्तृहरि.)

दौलताबादेपासून दोन कोसांवर एक पर्वत आहे. त्या ठिकाणीं प्रत्येक गुरुवारीं **दत्तात्रेयाची** पूजा करण्याकरितां जाण्याचा जनार्दनपंतांचा परिपाठ असे. ही जागा जनार्दनपंतांखेरीज कोणासच ठाऊक नसे. सच्छिष्य एकनाथास दत्तात्रेयदर्शन व्हावें ह्मणून एके गुरुवारीं गुरूंनीं शिष्यास बरोबर घेतलें. एकनाथ जात असतां वनशोभेचा मनोहर देखावा पाहून त्यास आल्हाद वाटला. तो समय पहांटचा असून पक्ष्यांचा अव्यक्त मधुर ध्वनि कानीं पडत होता. प्रभातकालच्या मंदसुगंध वायूनें उभयतांचें अंतःकरण गारेगार होऊन गेलें होतें. वनवृक्षांच्या सुवासिक पुष्पांचा परिमल सर्वत्र दरवळून गेला होता. फलभारानें वृक्षांच्या शाखा इतक्या लवल्या होत्या कीं, गुरुमूर्तीस पाहून त्या विनयपूर्वक नमनच करीत आहेत कीं काय असा भास होई. कोठेंकोठें स्फटिकतुल्य उदकाचा झुळ्झुळ् शब्द करणारा प्रवाह दृष्टिगोचर होऊन क्षणमात्रांत तृणांकुरांमध्यें नाहींसा होई. अशी ही वनशोभा मोठ्या कौतुकानें पहात पहात, व नाना तऱ्हेच्या फुलांनीं परड्या भरीत भरीत, ही गुरुशिष्यांची जोडी चालली.

---

१ अहाहा! महान् पुरुषांचीं चरित्रें कांहीं अगाध व अतर्क्य असतात!!

कांहीं वेळानें ते एका डोंगराच्या पायथ्याशीं आले. नंतर कांहीं अद्भुत चमत्कार दृष्टिगोचर झाल्यास न डगमगतां कोणत्या रीतीनें वर्तन करावें, ह्याविषयीं जनार्दनपंतांनीं एकनाथास सांगून, तो भयप्रद पहाड चढण्यास त्यांनीं प्रारंभ केला.

हा पर्वत महान् गगनचुंबित वृक्षांनीं आच्छादित होता. भयंकर श्वापदांची गर्जना, डोंगराच्या मोठमोठ्या कडा, व गर्द छायेंतील मिट्ट काळोख हीं पाहून एकनाथास केव्हां केव्हां अंमळ भीति वाटे. परंतु आपल्यापुढें आपला सद्गुरु चालत असून आज आपल्यास दत्तात्रेयाचें दर्शन होणार, हा विचार मनांत आला ह्मणजे त्यास धीर येई, व पराकाष्ठेचा हर्ष वाटे.

पर्वताचे अति उंच शिखरावर पोंचल्यावर तेथील हृदयवेधक देखावा पाहून एकनाथ चकित होऊन गेला. एक सुंदर सरोवर असून चोहोंकडे दाट झाडी लागून गेली आहे; सूर्याचीं बालकिरणें सरोवरांत प्रतिबिंबित होऊन त्यांच्या प्रतिभेनें तें रम्य स्थल प्रकाशित झालें आहे; गर्द छायेंत पानांच्या फटींतून दिसणाऱ्या नीलवर्ण आकाशानें कांहीं अवर्णनीय शोभा त्या एकांतस्थलास आलेली आहे; वृक्षसमूहांत सरोवराच्या कांठीं एक सुंदर औदुंबरवृक्ष असून त्याचे समोर कांहीं अंतरावर एक भव्य श्यामवर्ण शिला ठेविलेली आहे; औदुंबरवृक्षाच्या दोहों बाजूंस, लतावेष्टित आम्रवृक्षांच्या दोन पंक्ति थेट श्यामवर्ण शिलेपर्यंत लागून जाऊन उभय वृक्षशाखांच्या संमीलनानें एक कमानदार लतामंडप बनून गेला आहे; अग्रभागीं सरोवरांतील सुंदर जल खेळत असून, त्यांत प्रतिबिंबित झालेल्या सूर्यकिरणांनीं लतागृह उज्ज्वलित झालें आहे; वृक्षपंक्तीच्या पलीकडे दोहों बाजूंस दोन मोठमोठे पर्वताचे कडे असून, त्यांत धातूंचे रंगीबेरंगी थर प्रकाशित झाल्याकारणानें, हे काय चित्रविचित्र रंगाचे पडदेच आहेत कीं काय, असा भास होत आहे; औदुंबरवृक्षाखालीं एक शुभ्रवर्ण संगमरवरी दगडाचें उंच सिंहासन असून त्यावर स्फटिकाची सुंदर दत्तात्रेयाची मूर्ति विराजित झाली आहे; जवळच एक मोठी सहाण असून त्यावर चंदनाचें सुवासिक

खोड ठेविलेलें आहे; असें हें दत्तपूजेचें स्वभावसिद्ध साहित्य व सृष्टिसौंदर्याची अलौकिक शोभा पाहून एकनाथ आश्चर्यभरांत निमग्न होऊन गेला.

गुरुशिष्यांनीं सरोवरांत स्नान करून धूतवस्त्रें परिधान केलीं. एकनाथानें फुलांच्या परड्यांतील फुलें एका दगडाच्या शिलेवर ठेवून चंदनाचें गंध उगाळून दिलें. जनार्दनपंतांनीं वृक्षाच्या ढोलींतून नेहमींचें पूजासाहित्य काढिलें. दगडाचे वर्तुलाकृति चार डब्यांप्रमाणें पदार्थ असून त्यांत धूपदीपांचें सर्व साहित्य भरून ठेविलें होतें. एकनाथानें हें सर्व पूजासाहित्य जिथल्यातिथें मांडून पूजेची तयारी करून दिली.

जनार्दनपंतांनीं संध्यादि नित्यकृत्यें आटोपून स्फटिक दत्तमूर्तीची मनोभावानें षोडशोपचारें पूजा केली. नंतर सहस्र पार्थिवलिंगें करून त्यांची ही उत्साहपूर्वक त्यांनीं अर्चना केली; व एकनाथास जवळच्या एका झाडांच्या जाळींत बसावयास सांगून आपण समाधि लाविली.

एकनाथ जाळींत बसला असतां त्याच्या मनांत नानाप्रकारच्या कल्पना येऊं लागल्या. 'दत्तात्रेय उग्र स्वरूप धारण करितील किंवा त्यांची सौम्य मुद्रा असेल? स्वारी या सरोवरांत अवतरेल किंवा नभोमंडळांत दृष्टिगोचर होईल?' असे अनेक प्रकारचे तर्क करीत, आतां अमानुष चमत्कार दृष्टीस पडणार, ह्मणून आनंदभरित होत्साता तो सद्गुरुसमाधीकडे व दत्तमूर्तीकडे एकाग्रचित्तानें पाहूं लागला.

जनार्दनपंत समाधिस्थ असतांना देवगृहाचें दार निरंतर बंद असल्यामुळें सद्गुरुसमाधिअवलोकनाचा एकनाथास हा पहिलाच प्रसंग होता. दत्तपूजेचा विलक्षण समारंभ पाहून नाथास परम कौतुक वाटलें. भव्य शिलेवर स्वामिजनार्दन व्याघ्रांबर टाकून बसले आहेत; गळ्यांत स्फटिकांची माळ चमकत आहे! सर्व शरीर भस्मचर्चित असून मस्तक शिखाविस्तारानें आच्छादित झालें आहे; गळ्यांत व दंडांत रुद्राक्षांच्या माळा शोभत आहेत; प्राणयमन करून

ब्रह्मांडीं प्राण नेल्यामुळें श्वासोच्छ्वासासुद्धां हलनचलनादि सर्व व्यापार कुंठित झाले आहेत; सिंहासनापुढें नीरांजनाच्या सतेज ज्योतींची प्रतिभा सर्वत्र फांकून गेली आहे; अगरबत्त्यांचा घमघमाट लतामंडपांत दरवळून गेला आहे! सिंहासनावर सुंदर सुवासिक सुमनांची रचना सुरेख दिसत आहे; मूर्तिमुकुटावर चित्रविचित्र पुष्पराशि अद्वितीय शोभा देत आहे; सूर्यप्रकाश दत्तमूर्तीवर प्रतिबिंबित होऊन स्फटिकाचा तेजोराशि आपली दैदीप्यमान प्रभा सर्वत्र फेंकीत आहे; सहस्र पार्थिवलिंगांवरील कोंवळ्या बिल्वपत्रांच्या रमणीय शोभेनें पार्थिवपूजेचा रम्यसुरम्य देखावा प्रेक्षकाच्या अंतःकरणांत पवित्रता आणि गांभीर्य हीं उत्पन्न करीत आहे; अशी ही अवर्णनीय शोभा एकनाथ मोठ्या कौतुकानें पहात आहे, इतक्यांत मेघमंडळांत भयंकर कडकडाट होऊन औदुंबरवृक्षांतून रौद्ररूपी अशी एक मलंगमूर्ति प्रगट झाली!!! त्या मलंगाचें उग्र स्वरूप व त्याचा भयानक वेष पाहून एकनाथ भयचकित होऊन गेला. त्या मलंगाचे लालभडक डोळे, त्याचा काळा कुळकुळित केशकलाप, मोराच्या पिसाऱ्यांनीं सुशोभित असा मस्तकावरील टोप, काळ्याकभिन्न शरीरावर पडलेली नखांची व दंतपंक्तींची शोभा, एका हातांतील बिजलीसारखी चमकणारी नंगी तलवार, व दुसऱ्या हातांतील सज्ज केलेला तिरकमटा, आणि त्या मलंगाच्या खांद्यावर टाकिलेली झोळी, ह्या सर्व गोष्टी पाहून एकनाथ गर्भगलित होऊन गेला. हा काय चमत्कार आहे याजविषयीं त्यास कल्पनाच करितां येईना. त्याप्रमाणेंच मलंगाचे जवळ उभी असलेली भयंकर कुत्री पाहून तर त्याची पांचांवर धारण बसली. त्या कुत्रीचे इंगळासारिखे लाल डोळे, व तिची लळलळ हालणारी लांब जीभ पाहून नाथाच्या पोटांत विशेष धडकी भरली. परंतु किंचित् मनाला धीर आणतो इतक्यांत पर्वताच्या पायथ्याशीं जनार्दनस्वामींनीं केलेल्या उपदेशाचें स्मरण होऊन त्याचा जीव खालीं पडला. "दत्तमहाराज भिन्नभिन्न वेष धारण करून अवतरतात, ह्याकरितां रौद्ररूप दृष्टीस पडल्यास भितां कामा नये," ह्या गुरुरायाच्या सांगण्याप्रमाणें, श्री-

दत्तात्रेय मलंगाच्या रूपानेंच अवतरले आहेत, अशी एकनाथाची खात्री झाली.

गुरुरायाच्या सूचनेची आठवण होऊन एकनाथाच्या जिवांत जीव आला, आणि मग मोठ्या उत्कंठतेनें पहातो तों आपल्या गुरुश्रेष्ठांच्या व मलंगमूर्तीच्या प्रेमानें स्वात्मसुखाच्या गोष्टी चालल्या आहेत; दोघेही आनंदभरांत निमग्न होऊन त्यांच्या अंतःकरणांत हर्षाच्या व प्रेमाच्या उकळ्या फुटत आहेत; मलंगमूर्तीच्या आज्ञेवरून आपला स्वामिराज मोठ्या उल्हासानें त्या कुत्रीचें दूध काढीत आहे; दोहन झाल्यावर मलंग त्या दुधांत झोळींतील अन्न कुसकरून तें मिटक्या मारीत खात आहे !! याप्रमाणें हा देवभक्तांचा प्रेमाचा व ऐक्यभावाचा प्रकार पाहून एकनाथास आपल्या गुरूची धन्यता वाटली.

याप्रमाणें कांहीं वेळ गेल्यावर जनार्दनपंतांनीं पूर्वसंकेताप्रमाणें जाळीकडे इशारत केली. सूचना होण्याबरोबर दत्तदर्शनाविषयीं उतावीळ झालेला एकनाथ गुरुसमीप जाऊन उभा राहिला. परंतु मलंगाजवळ जाण्यास छाती होईना. आपल्या भयानक वेषानें हा भयभीत झाला आहे हें पाहून भगवंतांनीं मलंगाचें उग्र रूप टाकून सौम्य, शांत आणि सुंदर असें दत्तात्रेयाचें रूप धारण केलें !!!

मलंग अदृश्य होऊन दत्तात्रेय प्रगटले त्या वेळीं, हा एक विद्युल्लतेचाच तेजोराशि आहे असें एकनाथास वाटलें; व तेजाच्या आधिक्यानें त्याचे डोळे दिपून गेले. मग कांहीं वेळानें तिकडे पहातो, तों दत्तात्रेयाची सुंदर मूर्ति उभी असून तिच्या कांतीनें दशदिशा उज्ज्वलन पावल्या आहेत; मस्तक भयंकर सर्पवेष्टित असून मुखत्रयाला अनुपम्य शोभा आलेली आहे; नेत्र सतेज, भ्रुकुटी कमानदार, व अधरोष्ठ आरक्त असून मुखामध्यें दंतपंक्तींची कांति झकाकत आहे; कपाळीं कस्तूरीचें आडवें गंध तकाकत असून खांद्यावर मृगाजीन आडवें टाकून दिलेलें आहे; शरीराला सहा हातांनीं शोभा आणली आहे; एका हातांत त्रिशूल, दुसऱ्या हातांत कमंडलू आणि तिसऱ्या हातांत रामायणाची पोथी धारण केली

आहे; एके बाजूला लांब झोळी लोंबत असून दुसऱ्या बाजूस जवळच पूर्वीची भयंकर कुत्री कामधेनूचें सौम्य स्वरूप धारण करून उभी आहे; कौपीन परिधान केली असून दत्तांनीं पायांत सुंदर खडावा घातल्या आहेत; असें हें अद्भुत व मनोहर दत्तात्रेयांचें स्वरूप पाहून एकनाथ थक्क होऊन गेला, आणि असह्य दुःख भोगिल्याचें व गुरुसेवेचें आज सार्थक झालें असें त्यानें मानिलें.

नंतर एकनाथ जाऊन दत्तात्रेयाचे पायां पडणार तों, स्वामिजनार्दनांनींच आपल्या पट्टशिष्यास उचलून दत्तात्रेयांच्या पायीं घातलें !

दत्तात्रेयांनीं एकनाथास वर उचलिलें आणि मस्तकावर हात टेवून सुप्रसन्न वदनानें त्यास आशीर्वाद दिला कीं, " तूं असाधारण पुरुष होशील. तुझ्या वक्तृत्वाची व कवित्वाची लोकोत्तर कीर्ति पसरून भागवत रामायणावरील टीका तुझ्या हातून फार उत्तम प्रकारच्या होतील. तूं अनेक अद्भुत चमत्कार करून लोकरीति सुधारण्याचें यश संपादन करिशील. " याप्रमाणें वर देऊन व प्रसाद देऊन दत्तात्रेयांची स्वारी औदुंबरवृक्षांत अंतर्धान पावली !!!

सद्गुरूच्या कृपेनें दत्तदर्शन झाल्यामुळें एकनाथानें स्वामिजनार्दनाची स्तुति केली. नंतर ही गुरुशिष्यांची जोडी परत देवगडावर आली.

एकनाथानें गुरूजवळून सर्व प्रकारचें अध्यात्मज्ञान संपादन करून घेतलें. चित्ताची निर्विषयता कशी राखावी, ब्रह्मांडीं प्राण नेऊन प्राणयमन कसें करावें, कैक दिवस हलनचलनादि व्यापार कुंठित करून चित्स्वरूपीं लय लावून समाधि कशी साधावी, जप तप हीं कशीं आचरावीं, चित्ताची शुद्धि होण्याकरितां जीं जीं वेदप्रतिपाद्य कर्मे आहेत तीं आचरीत असतां ' एकमेवाद्वितीयम् ' हा भाव मनांत धरून निष्काम बुद्धीनें ईश्वरास तीं कर्मे कशीं अर्पण करावीं, ह्या सर्व गोष्टींचा उपदेश गुरुमुखानें एकनाथाच्या अंतःकरणांत बाणून गेला व त्या उपदेशाप्रमाणेंच वर्तन करून त्यांचा अनुभवही पूर्णपणें एकनाथास आला.

आतां पौत्रवियोगानें शोकाकुल झालेल्या चक्रपाणीच्या व एकनाथाच्या भेटीचें मनोवेधक कथानक पुढील भागांत येईल.

---

# भाग सातवा.

## पौत्रभेट.

### चक्रवत्परिवर्तंते दुःखानि च सुखानि च ।

ब्रह्मविद्या, दत्तात्रेयदर्शन व दत्तात्रेयप्रसाद ह्या तीन दुष्प्राप्य वस्तूंची जोड मिळाल्यावर, एकनाथाचें जनार्दनस्वामींच्या ठिकाणचें प्रेम अधिकच वाढलें. जनार्दनपंतही एकनाथाशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागून दत्तदर्शन झाल्यापासून नाथाची योग्यता विशेष मानूं लागले. नंतर आपल्या पट्टशिष्यास घेऊन जनार्दनपंत नाशिकत्र्यंबकाच्या यात्रेस गेले. मार्गांतच **चंद्रभट्ट** नांवाच्या विद्वान् ब्राह्मणाची गांठ पडून या गुरुशिष्यांचें सद्वर्तन, त्यांची विद्वत्ता व त्यांचें अध्यात्मज्ञाननैपुण्य हीं पाहून या चंद्रभट्टानें आपल्यास जनार्दनपंतांचा निरंतर समागम असावा अशी इच्छा दर्शविली. ब्राह्मण सत्वस्थ जाणून जनार्दनपंतांनीं त्याचे बोलण्यास रुकार दिला व त्यास नाशिकत्र्यंबकच्या यात्रेस बरोबर घेतलें.

चंद्रभट्ट हा विद्वान् ब्राह्मण असून पुराण सांगण्यांत त्याचा हात धरणारा त्या वेळीं त्या प्रांतांत कोणी नव्हता. 'भागवतावर पुराण असें चंद्रभट्टानेंच सांगावें' अशी त्याची ख्याति होति. त्याचे मनोवेधक पुराणश्रवणास श्रोत्यांच्या उड्या पडत. या पुराणपट्टु चंद्रभट्टाचा व आमच्या चरित्रनायकाचा बरेच दिवस सहवास असल्याकारणानेंच, आपल्या वक्तृत्वाच्या योगानें श्रोत्यांस तल्लीन करून सोडण्याचा अलौकिक गुण एकनाथाच्या ठिकाणीं होता असें वाटतें.

पैठण व दौलताबाद ह्यांखेरीज कोणतींच शहरें एकनाथानें पाहिलीं नव्हतीं, ह्यामुळें त्याला नाशिक क्षेत्र फारच रम्य वाटलें. गोदातीरचे मनोरम घाट, भव्य व सुंदर देवालयें, संध्यातर्पणादि ब्रह्मकर्मांत गुंतलेला विप्रसमुदाय हीं पाहून त्यास संतोष वाटला. त्या त्रिवर्गांनीं पंचवटींत राहून प्रसिद्ध देवांचीं दर्शनें घेतलीं, क्षेत्र-

स्थ सज्जनांच्या भेटी घेतल्या, तेथून त्रिंबकेश्वरास जाऊन कुशावर्त बिल्वकादि परमपवित्र तीर्थें अवलोकन केलीं, व मग ते परत पंचवटींत आले.

चंद्रभट्टानें पंचवटींत असतां भागवतावर सुरस पुराण सांगावें व त्याच्या वक्तृत्वाची जनार्दनपंतांनीं नेहमीं वाहवा करावी. भागवतासारखा महत्वाचा ग्रंथ संस्कृतांत असल्यामुळें त्यांतील रसाचा आस्वाद प्राकृत जनांस दुष्प्राप्य जाणून, चतुःश्लोकी भागवतावर प्राकृत टीका करण्यास जनार्दनपंतांनीं एकनाथास सांगितलें. गुर्वाज्ञेप्रमाणें एकनाथानें पंचवटींत असतां सुबोध व रसाळ अशी भागवतटीका तयार करून गुरूस अर्पण केली व त्यामुळें गुरुदक्षिणेचा पूर्वविधि संपादित केला.

एकनाथाच्या ग्रंथमालिकेंतील पहिला ग्रंथ याप्रमाणें पंचवटींत तयार झाल्यावर हें मूर्तित्रय परत दौलताबादेस आलें. पूर्वसंकल्पाप्रमाणें चंद्रभट्टही देवगडास येऊन सत्समागमानें आनंदांत काळ घालवूं लागला.

कांहीं दिवस साधुसमागमाचा उपभोग घेतल्यावर चंद्रभट्टानें आपला देह अकल्पित ठेविला. जनार्दनपंतांनीं चंद्रभट्टाची समाधि देवगडावरच बांधिली. या चंद्रभट्टाच्या समाधीची अशी मौज आहे कीं, हिंदुधर्मद्वेष्टया यवनांकडून समाधीचा उच्छेद न व्हावा, ह्याकरितां जनार्दनपंतांनीं त्या समाधीचा आकार **मदारी**सारखा केलेला आहे! ही मदारीसमाध प्रवाशांच्या अजून दृष्टीस पडते!

एके दिवशीं जनार्दनपंतांनीं एकनाथास सांगितलें कीं "प्रभुसत्तेनें तुझे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत. देववाणीप्रमाणें ब्रह्मविद्या व दत्तात्रेयदर्शन हीं दोन्ही तुला प्राप्त झालीं आहेत. तुझ्या निस्सीम

---

१ (मदारीसमाधीची हकीकत. भक्तलीलामृत. अ० १४ ओं० १७३–१७६. कित्येक मतीत असाही लेख सांपडतो कीं, चंद्रभट्टानें देहत्याग न करितां फक्त समाधि लावण्याचा उद्देश प्रदर्शित केला व त्यावरून स्वामींनीं मदारीसमाध बांधिली. तेथें अजूनही कांहीं चमत्कार घडतात.)

भक्तीच्या योगानें तुझी द्वादश वर्षपर्यंत केलेली तपश्चर्या निर्विघ्न शेवटास गेली आहे. तरी गुरूजवळ वेदाध्ययन केल्यावर तीर्थयात्रा करण्याचा जो सांप्रदाय आहे, त्या सांप्रदायाप्रमाणें तीर्थयात्रा करून नंतर पैठणास जा; वृद्ध आजाची सेवाचाकरी, हेंच तुझें कर्तव्य, तें नीट बजावून गृहस्थाश्रमी हो; व प्रपंच, परमार्थ, हीं दोन्ही साध."

गुरुमुखांतून हीं वाक्यें श्रवण करतांच एकनाथाचे डोळे अश्रुपूरित झाले. आतां आपणास गुरुवियोगाचें असह्य दुःख सोसावें लागणार ह्मणून तो अत्यंत दुःखी झाला. ज्या पुरुषानें आपलें अल्पवयांत लालनपालन केलें, ज्यानें आपल्यास ज्ञानामृत पाजून इतक्या योग्यतेस आणिलें, ज्याच्या प्रसादानें ईश्वराच्या प्रत्यक्ष दर्शनाचा अलभ्य लाभ प्राप्त झाला, त्या सत्पुरुषाचा समागम आतां नाहींसा होणार, त्या पुण्यपुरुषाच्या वाक्पीयूपास आपण मुकणार, हे विचार मनांत आणून एकनाथाचा कंठ दाटून आला. जनार्दनपंतांसही एकनाथ जाणार ह्मणून अत्यंत वाईट वाटलें. या गुरुशिष्यांचें परस्परांवरील प्रेम कांहीं अद्वितीय असल्यामुळें अत्यंत ममता करणाऱ्या पितापुत्रांचेंही प्रेम, या वात्सल्य प्रेमाच्या पासंगास लागण्यासारखें नव्हतें.

त्या उभयतांचे नेत्र भरून येऊन अंतःकरण सद्गदित झालें. गळा भरून आला. कोणाच्याच तोंडांतून शब्द निघेना. परस्परांकडे पाहून उभयतांनीं एकसमयावच्छेदेंकरून एकमेकांस दृढ आलिंगन दिलें.

गुर्वाज्ञा अक्षरशः पाळणारा एकनाथ नंतर यात्रा करण्यास सिद्ध झाला. वैराग्याचा वेष धारण करून स्वामिजनार्दनांस त्यानें साष्टांग नमस्कार केला व तो तीर्थयात्रा करण्याकरितां किल्ल्याबाहेर पडला.

आतां दौलताबाद सोडून कांहीं वेळ पैठणांतील हालहवाल कशी

---

१ तीर्थयात्रा करण्याचा सांप्रदाय फार प्राचीनकालापासून आहे. गुरूजवळून विद्या संपादन केल्यावर श्रीरामचंद्रही तीर्थयात्रेस गेले होते. यावरून हा परिपाठ आहे हें सिद्ध होतें. बालकांड अ० ७ ओ० १६–१८–१९. भावार्थरामायण.

काय आहे व पौत्रवियोगानें शोकाकुल झालेल्या बिचाऱ्या चक्रपाणीची काय वार्ता आहे ती पाहूं.

एकनाथाची कांहींच वार्ता समजत नाहीं हें पाहून चक्रपाणीची प्रकृति काळजीनें अधिकाधिक क्षीण होत चालली. पुराणिकाकडे एकनाथ नेहमीं जात असून त्याचा एकनाथावर अत्यंत लोभ होता हें चक्रपाणीस ठाऊक होतें. व ह्या कारणानें इतर ठिकाणीं शोध केला त्या वेळीं ह्या पुराणिकाचे घरींही नाथाचा शोध केला. परंतु पुराणीक पैठणांत नसून त्याच समयास कोठें बाहेरगांवीं निघून गेला, हें ऐकतांच चक्रपाणीच्या व इतर लोकांच्या पोटांत चर्र झालें. पुराणिकाचा व एकनाथाचा स्नेह, त्या दोघांची पैठणांत अदृश्य होण्याची एकच वेळ व कोणत्या ठिकाणीं ते गेले याविषयीं गैरमाहिती, ह्यांच्या योगानें नाथाच्या जाण्याचा पुराणिकाच्या जाण्याशीं निकट संबंध आहे, असा सर्वांचा तर्क झाला. पुराणिकाचा त्याच्या गांवीं पुष्कळ शोध केला परंतु त्याची कांहींच माहिती कोठें मिळेना. एकनाथाच्या सद्गुणामुळें त्याच्या जाण्याची जशी कांहीं भलती कल्पना करवेना, त्याप्रमाणेंच सदाचारसंपन्न, विद्वान्, व कुलीन पुराणिकाविषयींही कांहीं कुतर्क घेतां येईना. तथापि "कोणत्या वेळीं मनुष्यास कशी बुद्धि होईल ह्याचा कांहीं नेम नाहीं," ह्या न्यायानें पुराणिकानेंच कुबुद्धि धारण करून एकनाथास कोठें तरी फितलावून नेलें, असा चक्रपाणीचा ग्रह झाला. व ह्या त्याच्या ग्रहास तशीं कारणेंही चमत्कारिक रीतीनें घडून आलीं.

एकनाथाचा व पुराणिकाचा शोध न लागण्याचें कारण असें झालें कीं, पुराणीक स्वदेशीं न जातां दुसऱ्याच एका लांबच्या गांवीं[1] जरूरीच्या कामाकरितां जाऊन राहिला होता. तेथें अशी मौज झाली कीं, त्या कामाच्या संबंधानें बारा वर्षांत बाहेर पाऊल काढण्यास त्यास फुरसत नव्हती, व पैठणास त्याचें कांहीं निकडीचें

---

१ कोठें असेंही वर्णन आहे कीं हा पुराणीक सैन्याबरोबर लढाईंत गेला असून त्यानें आपलेबरोबर एकनाथ नेला, असा चक्रपाणीस संशय आला. भक्तलीला० अ० १५ ओ० ३१–४१

काम नसल्यामुळें चिटीचपाटी पाठविण्याचीही त्यास कधीं अवश्य-कता पडली नाहीं. इकडे एकनाथही जनार्दनपंतांजवळ देवगडकिल्ल्यावर द्वादश वर्षेपर्यंत गुरुसेवेंत एकांतीं असल्यामुळें, गडाखालीं उतरण्याचा त्याला फारच थोडा प्रसंग पडला. असा हा, दोघांच्या प्रयाणाचा अर्थाअर्थीं कांहींच संबंध नसून, ते दोघेही एकाच वेळीं नाहींसे झाल्यामुळें, व त्यांचें कुशलवृत्त फार दिवस न कळल्यामुळें, चक्रपाणीचें मन पुराणिकाविषयीं साशंक होऊन गेलें होतें.

चक्रपाणी आधींच वयातीत झालेला, तशांत पुत्रशोकानें होरपळून जाऊन एकनाथ नाहींसा झाल्यावर तर त्याचें मन संसाराविषयीं अगदींच विटलें. एकनाथ आज येईल, उद्यां येईल, कोणी तरी एक्याविषयीं खुशालीची वातमी सांगेल, पुराणिकाचा तरी कांहीं पत्ता लागेल, ह्या आशेनें वाटेकडे डोळे लावून अश्रु गाळीत त्या उभयतां वृद्धांनीं काळाचीं कैक वर्षें काढिलीं. एकनाथ गेल्यावर कांहीं वर्षें त्यांस फारच दुःख झालें. पाणी आणावयास गेलेला श्रावण कमंडलु घेऊन लवकर परत न आल्यामुळें, जसा त्याच्या वृद्ध अंधांनीं आक्रोश केला, व राम वनवासास गेल्यावर ज्याप्रमाणें राजा दशरथ पुत्रविरहानें विव्हळ झाला, त्याप्रमाणें चक्रपाणीची व त्याच्या वयातीत पत्नीची अवस्था होऊन "नाथा, नाथा" ह्मणून त्यांनीं टाहो फोडावा. सर्व पैठण त्यांस उदास भासून जळीं, काष्ठीं, पाषाणीं, त्यांस नाथ दिसावा.

सर्व शरीर निःशक्त झालें आहे, गालांस सुरकुत्या पडल्या आहेत, चक्षुरिंद्रियांनीं व श्रोत्रेंद्रियांनीं आपआपले व्यापार अशक्ततेमुळें सोडून दिले आहेत, चालतांना सर्वांग लटलटां कांपत आहे, अशा अवस्थेंत तीं दोघें निराश्रित व निराधार असल्यामुळें, कोठें तरी भिक्षा मागून त्यांनीं उदरनिर्वाह करावा, व एकनाथाची निराशा झाल्यामुळें आतां लवकर डोळे मिटतील तर बरें, असें त्यांस वाटूं लागावें.

पुराणिकाविषयीं चक्रपाणीच्या मनांत अनेक कल्पना येत. "माझ्या नाथाच्या अप्रतिम बुद्धीमुळें, मत्सरभावानें तर त्याचा नाश

कोणीं केला नसेलना? पुराणिकास पुत्रसंतान नव्हतें ह्मणून माझ्या नातवास घेऊन तर तो पळून गेला नसेलना? त्यास कुमार्गगामी करण्याच्या हेतूनें तर कोणीं त्याला हिरावून नेलें नसेलना?" अशा अनेक कल्पना मनांत येऊन "मन चिंती तें वैरी न चिंती" ह्या ह्मणीप्रमाणें चक्रपाणीची अवस्था झाली. चक्रपाणीची पत्नीही त्या विचाऱ्या पुराणिकाच्या नांवानें कडकडां बोटें मोडी.

चक्रपाणी व त्याची सुशील पत्नी ह्यांनीं काळाचीं तेरा वर्षें अशीं दुःखांत व शोकांत काढल्यावर, पैठणाहून परगांवीं गेलेला पुराणीक कामकाज आटपल्यावर परत पैठणास आला. उदकाच्या आभीमुळें करपून गेलेल्या वृक्षास वेळींच जलसिंचन झाल्यानें जशी टवटवी येते, त्याप्रमाणें कुडींत प्राण धरून राहिलेल्या चक्रपाणीस पुराणीक आल्याची वातमी लागतांच, आनंदपूरित होत्साता नाथाचा कांहीं तरी समाचार समजेल ह्मणून काठी टेंकीत टेंकीत तो पुराणिकाकडे गेला; व त्यास "माझ्या नाथाला आणलें काय"? ह्मणून त्यानें मोठ्यानें विचारलें. त्या विचाऱ्यास ही कांहींच वार्ता टाऊक नसल्यामुळें व पुष्कळ वर्षें तो पैठणांत नसल्यामुळें "कोण नाथ?" ह्मणून त्यानें चक्रपाणीस विचारिलें. पुराणिकाच्या तोंडचीं हीं अक्षरें श्रवण करितांच चक्रपाणीस मूर्च्छा येऊन तो निचेष्ट जमिनीवर पडला. तेव्हां हा काय चमत्कार आहे ह्मणून साश्चर्य होऊन पुराणिकानें चक्रपाणीस सावध केलें. शुद्धीवर आल्यावर "हा अधमाधम माझ्या पांढऱ्या केंसांकडे न पाहतां माझी थट्टा करितो," असें चक्रपाणीस वाटून त्यानें पुराणिकाची पुष्कळ निंदा केली व नाथाची हकीकत त्यास सांगितली.

पुराणीक फार सज्जन होता. त्यानें यत्किंचित् न रागावतां शांतपणानें सर्व हकीकत ऐकून घेतली, व आपले कामाकाजाचे सर्व कागदपत्र चक्रपाणीस दाखवून आपल्या निर्दोषत्वाविषयीं त्याची खात्री केली. पुराणिकाचें एकनाथावर खरोखर प्रेम होतें. त्यानें ही सर्व कथा ऐकतांच दुःख प्रदर्शित केलें, व चक्रपाणीची ती दीन अवस्था पाहून त्याच्या पोटांत तडतडां तोडूं लागलें. नंतर पुराणिकानें च-

क्रपाणीचें शांतवन केलें व त्यास मागील गोष्टींचें स्मरण होऊन, एके प्रसंगीं दौलताबादेस गडावर जाण्याचा आपला हेतु एकनाथानें प्रदर्शित केला असतां आपण त्यास दिलेलें अनुमोदन, त्याप्रमाणेंच एकनाथाची ब्रह्मज्ञान संपादन करण्याची अत्युत्कट इच्छा व त्याची विलक्षण बुद्धि, या सर्व गोष्टी त्याचेपुढें मूर्तिमंत उभ्या राहिल्या. नंतर आठवलेला सर्व वृत्तांत त्यानें चक्रपाणीस निवेदन केला. हें पूर्ववृत्त ऐकतांच चक्रपाणीची खात्री झाली कीं, देवगडावर सत्पुरुष जनार्दनाकडेसच एकनाथ गेला असावा. मग एकनाथाविषयीं व पुराणिकाविषयीं व्यर्थ कुतर्क मनांत आणले, असें वाटून पुराणिकाची त्यानें क्षमा मागितली. पुराणिकानें चक्रपाणीस धीर दिला व त्यास वचन दिलें कीं, "मी देवगडीं जाऊन हरप्रयत्नानें एकनाथास घेऊन येतों." असें ह्मणून पुराणीक तावडतोब निघाला व चक्रपाणीसही थोडासा धीर आला.

पुराणीक दौलताबादेस गेल्यावर त्यानें जनार्दनपंतांची भेट घेतली, व त्यांस एकनाथाची सर्व हकीकत सांगून, पौत्रवियोगानें मरणाच्या दारीं बसलेल्या चक्रपाणीची व त्याच्या वृद्ध पत्नीची अवस्था, नाथाच्या अकल्पित जाण्यानें सर्व शहरभर झालेला आकांत, व लोकांचे कुतर्क ह्यांविषयीं कची हकीकत सांगितली.

पुराणिकाच्या तोंडून एकनाथाचें गृहवृत्त ऐकल्यावर जनार्दनपंतांस फार वाईट वाटलें. मग त्यांनीं "एकनाथ खुशाल आहे. तो सद्गुणी व सदाचारसंपन्न असून ज्ञानी झाला आहे. तीर्थयात्रा करून तो लौकरच पैठणास येईल" असें सांगितलें, व चक्रपाणीचें समाधान करण्याविषयीं सांगून त्याला देण्याकरितां पुराणिकाजवळ एक पत्र लिहून दिलें. पत्र घेतल्यावर जनार्दनपंतांचा निरोप घेऊन पुराणीक निघाला, व तावडतोब परत पैठणास आला.

पैठणास आल्यावर पुराणिकानें एकनाथाचें कुशलवृत्त चक्रपाणीस सांगितलें, व जनार्दनपंतांनीं दिलेलें पत्र स्वाधीन करून ह्मणाला कीं, "तीर्थयात्रा करीत करीत जेव्हां एकनाथ पैठणास येईल, तेव्हां ही

'जनार्दनपत्रिका' त्यास दाखवावी, ह्मणजे तो पुढें तीर्थयात्रेस न जातां पैठणांतच राहील."

पुराणिकाच्या तोंडून एकनाथाचें कुशल वृत्त ऐकतांच चक्रपाणी हर्षभरित होऊन गेला. ज्या एकनाथाच्या अस्तित्वावरच येऊन बेतली होती, तो एकनाथ खुशाल असून ज्ञानसंपन्न झाला आहे, हें पाहून चक्रपाणीस परम समाधान वाटलें. मग हें कुशल वृत्त आपल्या सुशील पत्नीस सांगून चक्रपाणीनें तिचें समाधान केलें, व जनार्दनपत्रिकेप्रमाणें पौत्रमुख लवकरच दृष्टीस पडेल, ह्मणून वाटेकडे त्यानें डोळे लाविले.

गुर्वाज्ञेप्रमाणें ज्योतिर्लिंगें व तीर्थयात्रा करण्याकरितां बाहेर पडलेला एकनाथ, मनोरम देवालयें, साधुसंतांचे पवित्र आश्रम व निरनिराळीं तीर्थें अवलोकन करीत चालला. गांवांत किंवा शहरांत न उतरतां एखाद्या धर्मशाळेंत उतरावें, व भिक्षा मागून उदरपोषण करावें, असा त्याचा नित्य क्रम असे.

नर्मदा, तापी आदिकरून तीर्थें अवलोकन करून, अवंति, महाकालेश्वर, मथुरा, गोकुळवृंदावन, काशी, प्रयाग, अयोध्या, बद्रिनाथ व द्वारका हीं उत्तरतीर्थें वंदन केल्यावर तो दक्षिणतीर्थें वंदन करण्यास निघाला. जुनागड येथें आल्यावर एकनाथानें प्रसिद्ध पुरुष जो नरसी महंत त्याचें दर्शन घेऊन पुढें तो डाकुरास गेला.

डाकुराहून निघाल्यावर एकनाथास गोदातीर्थ लागलें; परंतु गुर्वाज्ञेप्रमाणें सर्व तीर्थें अवलोकन केल्याशिवाय स्वगृहीं जावयाचें नाहीं, असा ह्या यात्रेकऱ्याचा कृतसंकल्प होता, ह्यामुळें वाटेंत आपली जन्मभूमि जें पैठण शहर तें लागलें असतां, शहरांत न जातां, नित्यनियमाप्रमाणें, ज्या शिवालयांत आकाशवाणीचा गंभीर ध्वनि ऐकिला होता, त्याच देवालयांत नाथानें डेरा दिला.

एकनाथानें देवालयांतील बिल्ववृक्षाकडे आपली नजर फेंकली. त्या वृक्षाचा प्रचंड विस्तार पाहून त्यास आश्चर्य वाटलें. आकाशवाणी लिहिलेल्या बिल्ववृक्षाच्या आकारांत जसें तेरा वर्षांत महदंतर पडलें, त्याप्रमाणेंच स्वतःच्या स्थितींतही जमीनअस्मानचें

अंतर पडून आकाशवाणीप्रमाणें सर्व मनोरथ परिपूर्ण झाले, ही गोष्ट त्यास मोठ्या आनंदाची वाटली.

जनार्दनपत्रिका हातीं आल्यापासून चक्रपाणीनें एकनाथाचा प्रतिदिवशीं शोध चालविला. त्यानें धर्मशाळा धुंडाव्या, देवळांतून शोध करावा, यात्रेकऱ्यांस व प्रवाशांस नाथाचा वृत्तांत विचारावा, परंतु कोठेंच थांग लागेना. एके दिवशीं सायंकाळचे सुमारास देवदर्शन करून चक्रपाणी परत येत असतां, चालतां चालतां दम लागल्यामुळें वाटेंत एका घराबाहेरील स्वच्छ ओट्यावर विसांवा घेण्याकरितां बसला. ती वेळ नित्यक्रमाप्रमाणें भिक्षाटन करण्याची असल्यामुळें ज्या घराच्या ओट्यावर चक्रपाणी काठी टेंकून विसांवा घेत बसला होता, त्याच घरांत कर्मधर्मसंयोगानें एकनाथ भिक्षा मागण्यासाठीं शिरला होता.

एकनाथाचा उद्देश घरीं आजास ओळख देण्याचा नसून, फक्त घरची स्थिति व हालहवाल कशी काय आहे ती पहावी, इतकाच होता. कारण, त्यास पूर्णपणें माहीत होतें कीं, "जर करितां मी ह्या वेळीं आजोबांस भेटलों तर ते मायेला गुंतून मला बाहेर जाऊं देणार नाहींत व मग अर्थातच तीर्थयात्रा पूर्ण न झाल्यामुळें गुरूची आज्ञा उल्लंघन केल्याचें पातक माथीं बसणार." ह्यामुळें वैराग्याच्या वेषानेंच नाथाची स्वारी त्या दिवशीं भिक्षाटनास निघाली होती; व भिक्षा घेत घेत ह्या चक्रपाणी बसलेल्या घरांतच शिरली होती.

चक्रपाणी हुश्श करीत ओट्यावर कोठें टेंकतो आहे, इतक्यांत त्या घरांतून " **ऑळख** " असा गंभीरध्वनि त्याच्या कानीं पडला. तेव्हां इतक्या पहाडी आवाजाचा नवीनच गोसांवी आज पैठणांत कोण आला आहे ह्मणून साश्चर्यमुद्रेनें दाराकडे पहातो तों, भिक्षा घेऊन एक तेजःपुंज तरुण गोसांवी आंतून बाहेर पडला. त्या गोसांव्याचें भस्मचर्चित शरीर, त्याचा काळा कुळकुळित जटाकलाप, भव्य भिक्षापात्र, दीर्घ त्रिशूळ व सतेज शरीर, हीं पाहून हा कोणी महान् योगी असावा असें चक्रपाणीस वाटलें.

गोसांव्याची दृष्टि ह्या वृद्ध मनुष्याकडे जातांच हा आपला आजा

चक्रपाणी आहे असें त्यानें तेव्हांच ओळखिलें. त्याचे शुभ्रवर्ण केंस, सुरकुतलेले गाल, खोल गेलेले डोळे, आणि वार्धक्यानें व शोकानें अत्यंत कृश झालेलें शरीर पाहून एकनाथाच्या पोटांत तोडूं लागलें व पायांत पाय घोटाळूं लागला.

यौवनावस्थेनें झालेला शरीरावयवांत फेरफार, व धारण केलेला अवलियाचा वेष, ह्यांच्यायोगानें फार दिवस दृष्टीस न पडलेला एकनाथ चक्रपाणीस दृष्टिमांद्यामुळें एकाएकीं ओळखूं आला नाहीं; तथापि एकनाथाच्या बाल्यदशेंतील तोंडवळ्याशीं ह्या गोसांव्याचा तोंडवळा मिळतो, हें पाहून हा आपला एकनाथच आहे असें चक्रपाणीस वाटलें. मग तो अवलिया तेथून निघून दुसऱ्या घरांत शिरणार, इतक्यांत सद्गदित अंतःकरण होत्साता उंच स्वरानें "एकनाथा" ह्मणून चक्रपाणी हाक मारितो तों त्याचा गळा दाटून आला, नेत्र अश्रुपूरित झाले, व तोंडांतून स्पष्ट शब्द निघेना !

जमिनीस तोंड लागलेल्या वृद्ध आजाचा तो गहिंवर पाहून एकनाथाच्यानें पुढें पाऊल टाकवेना. त्यानें हातांतील भिक्षापात्र व त्रिशूल हीं जमिनीवर टाकिलीं, आणि चक्रपाणीजवळ धांवत जाऊन "बाबा, होय मी एकनाथच आहें" असें ह्मणून त्यास घट्ट मिठी मारिली !!!

ज्याच्याविषयीं तेरा वर्षे एकसारखा निदिध्यास लागला होता, तो एकनाथ येऊन भेटल्यामुळें चक्रपाणीस पराकाष्टेचा हर्ष वाटला. आजानें नातवास पोटाशीं धरून आनंदाश्रूंनीं त्यास न्हाणिलें. कांहीं वेळपर्यंत कोणाच्याच तोंडांतून शब्द निघेना. नंतर एकनाथाचा हात धरून चक्रपाणीनें त्यास ओट्यावर बसविलें, व गहिंवरानें ह्मणालाः—

"एक्या, अरे, माझ्या उतारवयाकडे न पहातां मला निराधार व निराश्रित सोडून तूं एकाएकीं नाहींसा झालास, हें तुझ्यासारख्या समजूतदार व सुशील मनुष्यास योग्यना ? ज्ञानप्राप्तीसाठींच जर तुला जावयाचें होतें, तर आह्मी तुझ्या हेतूच्या आड कधींच आलों नसतों. तूं लहानपणींच अकल्पित नाहींसा झालास व त्रिखंड

शोधूनही तुझा शोध लागेना, तेव्हां मात्र आमच्या जिवांत जीव नाहींसा झाला. पैठणांतील सर्व लोक अस्वस्थ होऊन गेले. तुझ्या वयोवृद्ध आजीस अवर्णनीय दुःख होऊन तिच्या डोळ्यांचें पाणी हा वेळपर्यंत खळलें नाहीं. तुझ्या जिवावर आह्मी उभयतां वहाल होतों, तो तूंही नाहींसा झालास तेव्हां भानुदास वंशाची खास नक्कल होते असें मला वाटलें. याप्रमाणें संसारसुखास आंचवून ह्या हतभाग्यानें तेरा वर्षं तेरा युगांप्रमाणें अवर्णनीय शोकांत व दुःखांत काढिलीं."

चक्रपाणी पूर्ववृत्त सांगत असतां, नाथाच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. "ह्यांस दुस्सह दुःख देण्यास मीच कारण झालों," हें जाणून त्याच्या पोटांत दुःखाचे उमासे येऊं लागले. गळा दाटून आला. मग डोळे पुसून मोठ्या विनयानें तो ह्मणतो, "बावा, तुह्मां उभयतांस दुःखसमुद्रांत ढकलून देण्यास हा देह कारण झाला ही गोष्ट खरी आहे. वडिलांच्या आज्ञेचें उल्लंघन न करितां त्यांस वृद्धापकालीं सुख देणें, हें माझें कर्तव्य मी जाणून होतों. तथापि ज्या कारणानें मी येथून गेलों, तें कारण जर तुह्मी ऐकाल, व परमश्रेष्ठ स्वामींच्या प्रसादानें जी अजब चीज मला प्राप्त झाली आहे, ती जर मीं तुह्मांला सांगितली, तर तुमचा मजवर रोष न होतां तुह्मांला उलट संतोषच वाटेल."

असें ह्मणून एकनाथानें आपलें इतिवृत्त चक्रपाणीस विदित केलें. लहानपणची पुराणश्रवणाची हौस, साधूंचीं रसभरित अद्भुत चरित्रें ऐकून ईश्वरदर्शनाची स्वाभाविक स्फूर्ति, अध्यात्मविषयक शंकांचें समाधान न झाल्यामुळें चित्ताची उद्विग्नता, व शिवालयांतील आकाशवाणीचा चमत्कार, हीं सर्व सांगून स्वामिजनार्दनाच्या कृपेनें प्राप्त झालेली ब्रह्मविद्या, दत्तदर्शन व दत्तप्रसाद, ह्यांचा सर्व वृत्तांत एकनाथानें आजास कळविला.

एकनाथाच्या तोंडून त्याचें वृत्त ऐकल्यावर चक्रपाणीस धन्यता वाटली. भक्तमालिकेंत अग्रासन व्यापणारा जो भानुदास त्याच्या अलौकिक कीर्तीस मागें टाकणारा आपला नातू दत्तकृपेनें कविमालिकेंत व संतमंडळांत चमकणार, हें पाहून चक्रपाणीस अत्यानंद झाला.

नंतर पुढें तीर्थयात्रेस न जातां पैठणांत राहून गृहस्थाश्रम स्वीकारावा, व उतारवयांत आतां एकनाथानें आपल्याला सोडून बाहेर कोठेंच जाऊं नये, असा चक्रपाणीनें फार आग्रह धरिला. एकनाथानें आपली गुरूच्या ठिकाणीं किती श्रद्धा आहे तें सांगून प्राणापेक्षांही पलीकडे जी गुर्वाज्ञा, ती हरतऱ्हेनें मला पाळलीच पाहिजे, असें मोठ्या विनयानें सांगितलें; व तीर्थयात्रा गुर्वाज्ञेप्रमाणें शेवटास नेऊन लागलाच मी पैठणास येतों, असा हेतु त्यानें प्रदर्शित केला.

गुरूच्या ठिकाणीं इतकी निस्सीम भक्ति पाहून चक्रपाणीस आनंदा वाटला. पुराणिकानें पत्रिका दिल्यापासून ती निरंतर आपले जवळ ठेवण्यास चक्रपाणी कधींच चुकत नसे; व त्याप्रमाणें ह्या प्रसंगींही ती त्याचे जवळ होती. गुर्वाज्ञेप्रमाणें शब्दशः वर्तन करणारा हा जनार्दनशिष्य, तीर्थयात्रा करण्याकरितां पुढें जाणार हें पक्कें समजून चक्रपाणीनें जनार्दनपत्रिका त्याचे स्वाधीन केली.

पत्रिकेंतील जनार्दनस्वामींचें हस्ताक्षर ओळखून एकनाथास परम आश्चर्य वाटलें. नंतर पत्रिकेस प्रथम नमन करून वाचूं लागतोः—

"अनेक आशीर्वाद. पौत्रवियोगानें शोकाकुल झालेलीं तुझीं घरचीं माणसें तुझ्याविषयीं काळजी वहात आहेत! तुझ्यावर अवलंबून राहणारीं माणसें जीं तुझीं आजा व आजी, तीं निराश्रित व दीन होऊन अत्यंत क्लेश भोगीत आहेत! वार्धक्यावस्थेंत तुझ्याखेरीज दुसरे कोणाचाच आधार त्यांस नसल्यामुळें, ह्या वेळीं त्यांची सेवाचाकरी करणें हीच तुझी तीर्थयात्रा, हेंच तुझें शील व ब्रीद व यांतच तुझा पुरुषार्थ आहे. ह्याकरितां ही पत्रिका पाहिल्यावर पुढें न जातां तेथेंच[1] मुक्काम कर, व आपल्या आजास व आजीस निरंतर संतोषित राख. कळावें हा आशीर्वाद."

**जनार्दन देशपांडे,**
**मुक्काम गड दौलताबाद.**

---

१ एकनाथाची गुरुभक्ति किती अवर्णनीय होती, व गुर्वाज्ञेप्रमाणें अक्षरशः वर्तन करण्यांत तो किती दक्ष असे; ह्याविषयीं ह्या निबंधांत जागोजाग उल्लेख झालेला वाच-

अशी ही जनार्दनपत्रिका वाचून ह्या वेळीं ही पत्रिका येथें कशी आली ह्मणून एकनाथानें आश्चर्यानें चक्रपाणीस विचारिलें. चक्रपाणीनें पुराणिकाचा सर्व वृत्तांत सांगितला. नंतर गुर्वाज्ञेप्रमाणें तीर्थयात्रेस पुढें न जातां वृद्ध वडिलांची शुश्रूषा करीत एकनाथ पैठणांतच राहिला.

---

## भाग आठवा.

### गृहस्थाश्रम.

**मजमध्यें रंगली चित्त वृत्ति ।**
**यालागिं विसरला गृहासक्ति ।**
**त्याशीं गृहस्थाश्रमींच माझी प्राप्ति ।**
**निश्चयें जाण उद्धवा ॥** ( भागवत )

एकनाथानें पैठणामध्यें असलेल्या आपल्या लंगोटीमित्रांकडे पाहिलें तों त्यास पराकाष्ठेचें स्थित्यंतर दृष्टीस पडलें. गेल्या तेरा वर्षांत पुष्कळ उलटापालट दिसून आली. नाथाच्या लहानपणचे स्नेहीसोबती आतां तारुण्याच्या भरज्वानींत येऊन कोणी संसारी बनले, कोणी मोठमोठ्या हुद्यांच्या जागा मारल्या, जे लोक त्या वेळेस तारुण्यदशेंत होते ते जराग्रस्त झाले, व जे त्या वेळेस वयोवृद्ध होते ते आतां विश्वभक्षक काळाच्या भक्षस्थानीं पडले. याप्रमाणें कालाच्या अनंतत्वांत हजारों घडामोडी होत असून, परमार्थ-

---

कांच्या लक्षांत आहेच. तथापि ही पुढील गोष्ट एकनाथाचें आज्ञाधारकत्व स्पष्ट रीतीनें द्योतित करते. ती गोष्ट हीच कीं—

जनार्दनपत्रिकेंत 'ही पत्रिका पाहिल्यावर पुढें न जातां तेथेंच मुक्काम कर' अशीं अक्षरें असल्यामुळें ह्या शिष्यश्रेष्ठानें, पत्रिका हातांत पडली त्या वेळेस ज्या भूमिप्रदेशावर तो उभा होता त्या भूमीपासून तिलमात्र मागें पुढें न जातां त्याच भूमिप्रदेशावर मठी बांधून राहिला. व पुढें स्वामिआज्ञेनें जरी त्यानें गृहस्थाश्रम स्वीकारला व स्वतःच्या घरीं जाऊं येऊं लागला तथापि ह्या मठिप्रदेशावर त्याची मोठी भक्ति असून जरी गृहस्थाश्रमी होता तरी तो कथाकीर्तन करून ह्या मठींतच आनंदानें काळ घालवी. पुढें लोकांनीं ही मठी उत्तमप्रकारचें भव्य मंदिर बनविलें व त्यासच 'नाथमंदिर' असें म्हणूं लागले. भक्तलीला. अ. १५

साधनाविषयीं किंवा सत्कृत्य करण्याविषयीं, कोणीच उद्युक्त दिसत नाहीं ! ! जो तो स्वतःच्या ऐश्वर्यांतच गर्क होऊन गेला आहे ! ही लोकस्थिति पाहून एकनाथास पराकाष्ठेचें वाईट वाटलें.

एकनाथाची कडकडीत गुरुभक्ति व त्यास झालेलें दत्तदर्शन ह्यांची वार्ता दौलताबाद, पैठण व आसपासचीं शहरें ह्या ठिकाणीं तेव्हांच पसरली. त्यामुळें हा कोणी भाग्यशाली पुरुष आमच्या पैठणांत अवतरला आहे, असें वाटून तेथील लोकांची एकनाथाविषयीं पूज्य-बुद्धि वृद्धिंगत होत चालली. एकनाथाची ही लोकोत्तर कीर्ति, त्याचें सद्वर्तन व त्याच्या आंगचे अलौकिक गुण पाहून विजापूर येथील एका सदाचारसंपन्न व कुलीन गृहस्थास आपली उपवर झालेली कन्या ह्या पुरुषश्रेष्ठास द्यावी असें वाटलें. ह्या गृहस्थाचा चक्रपाणीशीं पुष्कळ परिचय असून, तो हरहम्मेश कामानिमित्त पैठणास येत असे. विजापूरकर गृहस्थानें आपली कन्या चक्रपाणीस आणून दाखविली, व लग्नाविषयीं गोष्ट काढिली. घराणें कुलीन, मुलगी सुलक्षण व सुस्वरूप असून उपवर झालेली, व दोघांच्या पत्रिका उत्तम तऱ्हेच्या परस्परांशीं जमलेल्या पाहून चक्रपाणीनें रुकार दिला व पैठणांतच लग्न करण्याचें ठरलें.

विजापूरकर गृहस्थ संपन्न असून हौशी असे. त्यानें विजापुराहून सर्व माणसें व लग्नसामग्री पैठणास आणिली. चक्रपाणीचें घराणेंही ह्या वेळीं बरेंच सांवरलेलें होतें. उद्धव या नांवाचा कोणीएक गृहस्थ एकनाथाचा आप्त होता, तोही या प्रसंगींच पैठणास आला. उद्धव सद्गुणी, व नीतिसंपन्न असून तो व्यवहारकुशल असे. चक्रपाणी वयातीत असल्याकारणानें, हा धवलकीर्ति उद्धव, विवाहसमारंभांत एक प्रधान पात्र होता.

एकनाथाचा विवाहसमारंभ फारच थाटमाटाचा झाला. एकनाथ लोकप्रिय असून लोकाश्रयांत यत्किंचित् कमतरपणा नसल्यामुळें पैठणकरांनीं विवाहसमारंभ फारच बहारीचा उठविला. चक्रपाणीचें व्याहीमंडळ सधन असल्यामुळें त्यांनींही कोणतीच उणीव दाखविली नाहीं.

असा हा पौत्रविवाहाचा सोहळा पाहून चक्रपाणी व त्याची पत्नी हीं हर्षभरित झालीं, सुमुहूर्तावर मंगलाक्षता पडलेल्या पाहून आनंदी आनंद होऊन गेला. "सावधान" शब्द श्रवण करून, आधींच सावध असलेल्या ज्ञानी एकनाथाच्या ठिकाणीं "सावधान" शब्दाची सार्थकता मुळींच होत नाहीं, हाही विचार कित्येक सुज्ञ श्रोत्यांच्या लक्षांत आला!

लग्नसमारंभ निर्विघ्नपणें शेवटास जाऊन वरात मोठ्या थाटानें मिरविली. मुलीचें नांव गिरजाबाई ठेविलें. भानुदास वंशाची नक्कल होते कीं काय अशी ज्याला धास्ती पडली होती, नातवाचें कुशलवृत्त न कळल्यामुळें प्रपंचाची ओकारी येऊन जो जीवितासही कंटाळून गेला होता, त्या चक्रपाणीस सोन्यासारखा दिवस दिसून नातसुनेचें नांव ठेवण्यापर्यंत मजल येऊन ठेपली, हें पाहून सर्वांस अतिशयित आनंद झाला; व जगन्नियंत्याच्या अघटित लीलेचें आश्चर्य मानून त्यांनीं परमेश्वराचे आभार मानिले.

चक्रपाणीला नातसूनही फार सुस्वभावाची मिळाली होती. आधींच कुलीन घराण्यांतली, तशांत चक्रपाणीच्या महासाध्वी पत्नीचें हातपाणी, मग गिरजाबाईच्या गुणांस व स्वभावास काय मोल? वय लहान असून आंगीं कर्तृत्व उत्तम तऱ्हेचें. स्वभाव शांत असून पतिसेवेंत व सासुसासऱ्यांच्या शुश्रूषेंत कधींच अंतर पडत नसे. नाथाच्या स्वभावाप्रमाणेंच गिरजाबाईचा शांत स्वभाव व अत्यंत नम्रपणा पाहून प्रत्यक्ष विवेक व शांतिच मनुष्यरूपानें अवतरली असें सर्व लोक ह्मणूं लागले. आधींच पिकलें पान झालेलें, तशांत नवस सायास करून कोठें नातसुनेचें तोंड दृष्टीस पडलें, ह्यामुळें चक्रपाणीची बायको, गिरजाबाईस जिवापेक्षां पलीकडे करी. गिरजाबाईची निरंतर असणारी आनंदवृत्ति, तिचें हास्यमुख, आणि सासूचें व सुनेचें परस्परांवरील अवर्णनीय प्रेम, हीं पाहून पहाणारांस वाटे कीं, ह्या सासवासुना नसून अत्यंत ममता करणाऱ्या मायलेंकीच आहेत.

एकनाथाच्या विवाहसमयीं पैठणास आलेला उद्धव लग्न आटोप-

त्यावर परत गेला नाहीं. ह्या पुरुषाचें सद्वर्तन, त्याची शांत वृत्ति व त्याचा दृढनिश्चय पाहून एकनाथानें त्यास आपणाजवळ राहून घेतलें. पुढें एकनाथाच्या ठिकाणचें उद्धवाचें प्रेम व त्याची श्रद्धा हीं इतकीं दृढतर झालीं कीं, समर्थांचा पट्टशिष्य जसा कल्याण, किंवा जनार्दनाचा एकनाथ, त्याप्रमाणेंच नाथाचा उद्धव हा शिष्यवर हो-ऊन बसला.

चक्रपाणीचें घर, जें त्याला शून्य व भयाण भासत होतें, तें आतां नांदतें होऊन निरंतर माणसांनीं गजबजून जाऊं लागलें. चक्रपाणी, त्याची सुशील व महासाध्वी पत्नी, क्षमाशील एकनाथ, त्याची सद्गुणी स्त्री गिरजाबाई, आणि नीतिनिपुण व व्यवहारकुशल उद्धव हीं इतकीं माणसें सदाचारसंपन्न व सुस्वभावाचीं असल्यामुळें, व चक्रपाणीचें कुटुंब हें शांतीचें माहेरघर असल्यामुळें, सर्व पैठ-णांत नाथाच्या घरासारखें आनंदी व सुखी घराणें त्यावेळीं कोठेंच नव्हतें.

गृहस्थाश्रम स्वीकारल्यापासून एकनाथाचा वर्तनक्रम असा असे कीं:—प्रातःकालीं उठून शौचमुखमार्जनादि विधि झाल्यावर गंगेस स्नानास जावें, मग संध्याब्रह्मयज्ञादि विधि उरकून पूजा अर्चा ध्यान-धारणा करावी. नंतर पुराण श्रवण करावें. इतक्यांत दोनप्रहराचा सुमार होई. मग अतीत, अभ्यागत व निराश्रित जे लोक असतील त्यांस ( नैवेद्य, वैश्वदेव झाल्यावर ) भोजनास बसवावें. सर्वांचें भोजन यथास्थित झाल्यावर आपण स्वतः भोजनास बसावें. तिसरे प्रहरीं पुराण सांगावें. रात्रीं पूजा अर्चा झाल्यावर कधीं कथा व कधीं भ-जन करावें. ह्याप्रमाणें ह्या सत्पुरुषाचा वर्तनक्रम असे. एकना-थाच्या कुटुंबाचा चरितार्थ पुराणाच्या प्राप्तीवर होत असे. त्याची अयाचित वृत्ति होती; तो लोकप्रिय असल्यामुळें व पुराण सांगण्यांत त्याचा कोणी हात धरणारा दुसरा पुराणीक नसल्यामुळें त्याची प्राप्ति मोठी होती. व ह्यामुळेंच एकनाथाच्या कुटुंबाचा चरितार्थ उत्तम रीतीनें चालून अन्नशांति चांगली होत असे.

ह्याप्रमाणें संसारसुखाचा व सद्गुणी नातवाच्या नांदत्या संसा-

राचा सोहळा बरेच दिवस पाहिल्यावर, चक्रपाणीनें व त्याच्या पत्नीनें देह ठेविला. वेदांतविषयांत निपुण असल्यामुळें एकनाथास आजाचें व आजीचें दुःख मुळींच झालें नाहीं. "जनार्दनच विश्वरूपानें भासावयास लागला; त्यांत मरणें व जगणें हें संभवत नाहीं," असा विचार मनांत येऊन नाथाचें चित्त निरंतर विकाररहित असे ! चक्रपाणीचें और्ध्वदेहिक होऊन कांहीं दिवस लोटताहेत, तों एकनाथाचें दैवत जें जनार्दनस्वामी, ते फाल्गुन कृष्ण षष्ठीस देवगडीं समाधिस्थ झाल्याची वार्ता एकनाथास कळली. गुरूंनीं देहपरित्याग केलेला श्रवण करून काडीमात्र दुःख न दाखवितां फाल्गुन कृष्ण षष्ठीचा उत्साह करण्याविषयीं उद्धवास एकनाथानें आज्ञा केली ! ज्या एकनाथाचें जनार्दनस्वामीविषयींचें प्रेम इतकें अवर्णनीय असे कीं, गुरूला ठेंच लागली, तर शिष्याचे पंचप्राण कासावीस व्हावेत, त्याच एकनाथास वेदांताचीं खरीं खरीं तत्वें कळल्यावर, गुरुहानीची दुःखकारक वार्ता ऐकूनही, सुतराम् मोह पडला नाहीं. ह्यावरून चित्ताची प्रसन्नता राखण्याचा प्रभाव अद्वैतमतांत कसा आहे, हें, त्या मताच्या सत्यासत्यतेची व बलाबलाची मीमांसा करणाऱ्यांनीं, नीट लक्षांत वागवावें.

---

## भाग नववा.

## साधुत्व आणि अलौकिक गुण.

सन्तः स्वयं परहितेषु कृताभियोगाः ।

(भर्तृहरि).

आतां एकनाथाची साधु या संबंधानें जी लोकोत्तर कीर्ति पसरली आहे, ती कीर्ति पसरण्यास ह्या पुरुषाचे ठिकाणीं अलौकिक

---

१ जनार्दनपंचकाचें असें मौजेचें समकालीनत्व आहे कीं:—१ जनार्दनजन्मदिन, २ जनार्दनदत्तदर्शन, ३ जनार्दनानुग्रह, ४ जनार्दनदेहावसान, ५ जनार्दनशिष्यसमाधि ह्या पांचही गोष्टी एकाच तिथीला म्हणजे फाल्गुन कृष्ण षष्ठीस घडल्या. (भक्तली. अ. १६ ओ. ७२, ७३, ७४.) २ केवळ दुसऱ्यांच्या हितासाठींच साधूंचे अवतार !

गुण कोणते होते, साधूंचीं लक्षणें कशीं ओळखावीं, व एकनाथाच्या आंगीं साधु या नांवास पात्रता कितपत होती, याचा विचार करूं.

हा पुरुष प्रतिष्ठानपुरींत अत्यंत लोकप्रिय असे, व ही लोकप्रियता होण्याचें मुख्य कारण त्याचें अप्रतिम वक्तृत्व. ह्या पुरुषानें कथापुराणाच्या रूपानें लोकस्थितीची उन्नति करण्याचें ब्रीदच बांधलें होतें, असें ह्मटलें तरी चालेल. याच्या भाषासौष्टवाचा व वाक्सौरस्याचा लाभ लोकसमूहांस निरंतर व्हावा ह्मणून पैठणकरांनीं एक भव्य मंदिर उठवून दिलें. या मंदिरांत निरनिराळे उत्साहसमारंभ होऊन कृष्णजयंतीचा उत्साह फारच बहारीचा होई. एकनाथास कृष्णाची भक्ति विशेष असून कृष्णोत्साहामध्यें वाग्देवतेच्या मनोहर लीलेनें श्रोतृसमुदाय तल्लीन होऊन जाई. एकनाथाची कथा विशेष मनोहर होण्याचें दुसरें कारण असें होतें कीं, त्याच्या आंगीं तात्कालिक कविता करण्याचा मोठा गुण असे. कोणत्याही आख्यानावर जरी कीर्तन चाललें असलें, तथापि तात्कालिक कवित्वस्फूर्तीनें कीर्तनास रंग आल्याशिवाय कधींच रहात नसे. वाणी मधुर, भाषा सरळ असून सुबोध, व उपमा, दृष्टांत देऊन विषयविवेचन, ह्यांच्यायोगानें नाथाचें कीर्तन आबालवृद्धांस समजत असे. ह्या सत्पुरुषाचे वाक्पीयूषसेवनास पंक्तिप्रपंच कधींच होत नसे. वर्णहीन महारमांगांपासून तों वर्णश्रेष्ठ ब्रह्मवृंदापर्यंत, सर्व जातींच्या व सर्वधर्मोच्या लोकांस, एकनाथाचें कीर्तन पहावयास सांपडे.

एकनाथास कीर्तनसमयीं जशी रंगदेवता निरंतर अनुकूल असे, त्याप्रमाणें एकनाथाचें पुराणश्रवण करण्यासही श्रोत्यांच्या उड्या पडत. चक्रपाणीच्या तुटपुंजी घरगुती शिक्षणापेक्षां अधिक शिक्षण जरी एकनाथास मिळालें नव्हतें, तथापि जनार्दनपंतांच्या व चंद्रभटाच्या साहचर्यानें, आणि लहानपणच्या पुराणश्रवणानें, गीर्वाण भाषेशीं ह्या पुरुषाचा इतका परिचय झाला होता कीं, भागवतासारख्या ग्रंथाचें पुराण सांगून श्रोत्यांचें अंतःकरण आपणाकडे आकर्षून घेण्याचा चमत्कारिक गुण याजमध्यें असे.

एकनाथाला केवळ संस्कृत भाषेचेंच आंग नसून प्राकृत भाषे-

चाही तो पूर्ण मर्मज्ञ होता. जो ग्रंथ आज सुमारें सहाशें वर्षें सांदीकोंदीला पडून राहिला आहे व सुधारणुकेच्या एकुणिसाव्या शतकांत सुद्धां शब्दकाठिण्यामुळें ज्याच्या पुनरुज्जीवनाची आशा दिसत नाहीं, त्याच ज्ञानेश्वरींतील रहस्यप्रतिभेनें विद्वज्जन दिपवून टाकून, सोळाव्या शतकांतच त्या ग्रंथाचा जयजयकार आमच्या विषयनायकानें केला!!

कोणत्याही विषयाचें हुबेहूब स्वरूप श्रोत्यांच्या अंतःकरणांत उतरून देण्याची एकनाथाची हतोटी चांगली होती. भागवत व ज्ञानेश्वरी हे ग्रंथ एकनाथानें इतक्या सुलभ रीतीनें समजावून द्यावे कीं, ज्ञानेश्वरीच्या पाठपठणाशिवाय एक घरही त्या वेळेस पैठणांत राहिलें नव्हतें.

महाराष्ट्रभाषावधूची अनास्था व अवहेलना जशी हल्लीं कित्येक ठिकाणीं दृष्टीस पडते, त्याप्रमाणें एकनाथाचे वेळींही होती. भूभ्रमणाचा खरा सिद्धांत प्रतिपादन करणें जितकें ग्यालीलिओला भयप्रद होतें, तितकें किंवा त्याहूनही भयंकर, एकनाथाचे वेळीं महाराष्ट्रभाषेंत कवित्व किंवा वक्तृत्व करणें धोक्याचें होतें. जो तो गीर्वाणभाषावधूवरच मोर्चेलें उडवीत असून, कोणीं महाराष्ट्र भाषेचा कैवार घेतल्यास, विद्वन्मुकुटमणि ह्मणविणाऱ्या कित्येक शास्त्रीपंडितांनीं तिलांजलि घेऊन उभें असावें. एकनाथालाही अशाच प्रकारच्या आपमतलवी व परोत्कर्षासहिष्णु महापंडितांबरोबर टक्कर मारावयाची होती; परंतु चमत्कार हा कीं, श्रोतृसमुदायांत एकनाथाच्या नाशाविषयीं उद्युक्त असे कित्येक भलेबुरे गृहस्थ येत असून, नाथाचें अप्रतिम वक्तृत्व, त्याची रसाळ वाणी, त्याचा नीतिपर उपदेश, तात्कालिक कवित्व, आणि त्याचे आत्मानात्मविचार श्रवण

---

१ शब्दकाठिण्यामुळें दुर्बोध ग्रंथ जो ज्ञानेश्वरी तो एकनाथानें शकें १५०६ मध्यें शोधून प्रकट केला. ( कांहीं ठिकाणीं ग्रंथ शोधनाचा शक १५१२ असाही आहे. ) यावरून लोक त्याला ज्ञानदेवाचा अवतार म्हणतात. एक लौकिक म्हण अशीच आहे.

" ग्यान्याचा एका " }
" नाम्याचा तुका " } भक्तली० अ० १९ ओं० ११०–१२८.

केल्यावर त्यांपैकीं कित्येक चित्रासारखे तटस्थ होत! कित्येक कुमार्गगामी कृतकर्माचा पश्चात्ताप होऊन ढळढळां रडत व कित्येकजण आपलें आचरण सुधारीत!

एकनाथाचे ठिकाणीं दुसरा अलौकिक गुण दातृत्व हा होता. ह्या पुण्यपुरुषानें आपलें वित्तसर्वस्व व बलसर्वस्व अन्नशांतीमध्यें खर्च केलें. निढळच्या घामानें, पुराण सांगून जें द्रव्य त्यानें संपादन केलें त्या द्रव्याचा व्यय अंध, पंगू, निराश्रित व दुबळ्या लोकांस भोजनसुख देण्यांत व आर्तांचें दुःखविमोचन करण्यांतच होत असे. एकनाथाचें घर ह्मणजे जराग्रस्त व निराधार लोकांचें माहेरघर होतें असें ह्मटलें तरी चालेल. याचकानें जी जी इच्छा प्रदर्शित करावी, ती ती इच्छा तृप्त करण्यामध्यें हा अनाथाचा नाथ कधींच माघार घेत नसे.

ह्या असाधारण पुरुषाचे ठिकाणीं अद्वैत इतकें बाणून गेलें होतें कीं, त्याच्या शुद्ध व पवित्र अंतःकरणांत लहानमोठ्याची किंवा ज्ञातिभेदाची भावना अजीबात नाहींशी झाली होती!

अन्नशांतीचा हल्लींचा प्रचार ह्मटला ह्मणजे, सजातीय कितीही नीतिहीन व ज्ञानहीन असला तरी त्याचा आदरसत्कार व्हावा, परंतु तोच भिन्नजातीय असून नीतिसंपन्न व ज्ञानी कां असेना, त्याची पायमल्ली व्हावी; वर्णश्रेष्ठ ब्रह्मवृंद कर्महीन व ज्ञानहीन कां असेना, त्यास घृतकुल्या मधुकुल्या भरल्या पोटावर आग्रहानें चारावी, परंतु त्याच वेळीं एखादा क्षुधेनें व तृषेनें पीडित झालेला असा दीनहीन अंत्यज गोळाभर अन्नासाठीं जर दाराशीं केविलवाण्या स्वरानें ओरडत आहे, तर त्याजवर गालिप्रदानाचा वर्षाव करावा, किंवा अर्धचंद्रप्रयोग व्हावा, अथवा दातृत्वप्रवाहाचा ओघ फारच वाहिला तर उष्टींमाष्टीं चार शितें त्याचे तोंडावर टाकावींत, हा जो अन्नशांतीचा प्रचार आहे, त्या प्रचाराहून एकनाथाच्या

१ हर्ष्नां धन आलें जें तें देवब्राह्मणांसि अर्पावें ।
स्यापत्य नसें प्रेमें अन्नार्थी प्राणिजात तर्पावें ॥ ४२ ॥
मोरोपंत (साधुरीति).

अन्नदानाचा प्रकार फार भिन्न असे. एकनाथास ब्राह्मणसमुदाय जरी सर्वदा वंद्य असे, व ब्रह्मवृंदाची सेवाचाकरी जरी त्यानें उल्हासवृत्तीनें निरंतर करावी, तथापि महारमांगांसारख्या वर्णहीन दुबळ्या लोकांची त्यानें कधींच अवहेलना केली नाहीं. अशा अनाथलोकांस उपदेशामृत पाजून ज्ञानी व नीतिसंपन्न करावें व त्यांस दूर न लोटतां त्यानें त्यांची दुःखापासून सुटका करावी. फार काय, ह्या ज्ञानी पुरुषाचे ठिकाणीं भिन्नभाव इतका अस्तंगत झाला होता कीं, पितृतिथीला क्षण दिलेल्या द्विजवर्यास एकीकडे ठेवून, क्षुधेनें पीडित झालेल्या अंत्यजांस एके वेळीं नाथानें श्राद्धीय अन्न वाढून, पंचपक्वान्नांच्या रसमाधुरीनें तृप्त करून सोडिलें[1]!!

एकनाथाचे ठिकाणीं तिसरा मोठा गुण सहनशीलता हा होता. शांतवृत्ति व सहनशीलता हे दोन गुण ह्या अद्वितीय पुरुषाचे ठिकाणीं स्वाभाविक असून पुढें जसजसा ह्या गुणांचा विकास होऊं लागला, तसतसा लोकसमूह त्याच्या गुणाधिक्यानें चकित होऊन गेला.

एकनाथ हा प्राच्यदेशीय सॉक्रेटीस होता म्हटलें तरी साजेल. एकनाथाची महासाध्वी स्त्री गिरजाबाई ही सत्वस्थ व सुशील असल्यामुळें, जी उणीव पडणार होती, ती, कित्येक पैठणकर खप्पींनीं काढून टाकलीच होती! तुकारामाची जगविख्यात जिजाबाई, व सॉक्रेटिसाची कर्दनकाळ झँटिपी, ह्या जशा आपापल्या नवऱ्याचें सत्व पहाण्यास अवतरल्या होत्या, त्याप्रमाणेंच एकनाथाच्या सहनशीलतेला पुरा कस लावण्याकरितां प्रतिष्ठानपुरींतही कित्येक हरिभक्त कंबर बांधून तयार होतेच!

एकनाथाच्या आंगच्या वक्तृत्व, दातृत्व, आदिकरून गुणांनीं जरी तो लोकप्रिय होता, तथापि त्याचा अभ्युदय, त्याची उन्नति, व त्याचें पुराणपटुत्व सहन न होऊन त्याचा छल करण्याविषयीं बहुत लोक प्रवृत्त होते. संस्कृत ग्रंथांचें रहस्य प्राकृत भाषेंत सां-

---

१ दे अन्न अंत्यजां जें केलें तर्पावयासि पितरांनें ।
हें साधुशील दुर्लभ लोकीं कालत्रयींहि इतरांनें ॥ ३८ ॥

मोरोपंत ( साधुरीति ).

गितल्यामुळें आपल्या पोटावर पाय येतो, असें कित्येक पुराणिकांस वाटून त्यांनीं एकनाथाचा हेवा करावा, व त्याच्या वेदांती कथा-कीर्तनाच्या योगानें लोक प्रवृत्तिमार्ग सोडून निवृत्तिमार्गानें चालूं लागले, हें पाहून एकनाथाचा कीर्तिचंद्र ग्रासून टाकण्याचा सतत उद्योग त्यांनीं चालवावा.

एकनाथाचा जरी इतका छल होत होता, तथापि त्याच्या सहनशीलतेचा मनोरा बालाग्रही डगला नाहीं. एकनाथाच्या हितशत्रूंनीं निंदाव्यंजक शब्दांचा भडिमार करावा, त्याच्या साधुत्वाच्या कीर्तीस कालिमा लागावा एतदर्थ मिथ्या व भ्रांतिमूलक लोकवार्ता पसराव्या, त्याला बहिष्कृत[1] करून छवीना काढण्याची तयारी करावी, तथापि ह्या क्षमाशील व विवेकी पुरुषास यत्किंचित् सुद्धां क्रोध येत नसे; त्यानेंच उलट निंदा व छल करणाऱ्या लोकांची पायधरणी करावी, त्यांचें शांतवन करावें, ते क्रोधवश कसे होतात ते त्यांच्या प्रचीतीस आणून देण्याचा यत्न करावा, व आपल्या खऱ्या पक्षाचें मोठ्या शांततेनें प्रतिपादन करावें !!

केवळ प्रतिष्ठाननगरींतील लोकच ह्या जितेंद्रियाचें सत्व पहात नसून, भरतखंडाच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंत हा साधुवर्य सहनशीलतेच्या व दुसऱ्या कित्येक अलौकिक गुणांच्या संबंधानें गाजला! काशीकर पंडितांनीं ह्या विचाऱ्यावर फारच गहजब गुदरविला. त्यांनीं आपल्या कुत्सितबुद्धीची परमावधि करून एकनाथ निरपराधी असूनही, त्याजवर आग पाखडली. एके समयीं तर महाराष्ट्रभाषेंत कविता केल्याचा दोषारोप ठेवून, ह्या काशीकर अधमाधमांनीं अर्धचंद्रप्रयोग करून विचाऱ्या पैठणकर कवीस थेट

[1] एकनाथाला प्रथम बहिष्कृत करावा व त्यानें कांहीं चमत्कार दाखविला म्हणजे मग त्यास प्रायश्चित्त देऊन शुद्ध करावें असा पैठणकरांनीं छल केला यास उद्देशून कवि म्हणतो:—

जों जों प्रायश्चित्त ब्राह्मण आग्रह करूनियां देती।
तों तों साधुमनांत प्रीति न चतुराननींहि नांदे ती ॥ २९ ॥

मोरोपंत ( साधुरीति ).

काशीपर्यंत खेंचित नेलें. परंतु शेवटीं "सत्यमेव जयते" हा न्याय होऊन या साधुश्रेष्ठाचीच सरशी झाली!!

ह्या थोर पुरुषाच्या सहिष्णुतेची एक चमत्कारिक आख्यायिका आहे. ती येथें लिहिणें अप्रासंगिक होणार नाहीं:–

एँके दिवशीं हा सत्वस्थ ब्राह्मण गंगेवरून स्नान करून येत असतां, मार्गांत एक उन्मत्त यवन याचे अंगावर थुंकला. तो प्रकार पाहून तोंडांतून चकार शब्द न काढितां एकनाथ पुन्हा गंगेवर स्नानास गेला. स्नान करून परत आला तों, पूर्वीप्रमाणेंच त्या यवनानें थुंकण्याचा विधि केला. तरीही कांहींएक वाईट न वाटतां "मनोनिग्रह करण्याची ही किती सर्वोत्कृष्ट संधि आहे" असें मनांत ह्मणत पुन्हा स्वारी गंगेवर गेली! यवनानेंही विचार केला कीं, "मोंगलाईंत ब्राह्मणधर्माचा टेंभा पाजळणारा हा कोण इतका सोंवळा भटोरा आहे, त्याची पुरीच खात्री करावी." असें ह्मणून तोही चङ्गीकाचा भिडवून आपलें थुंकण्याचें कर्तव्य बजावण्यास सिद्ध झाला.

नंतर त्या अविंधानें थुंकावें व नाथानें पुन्हा स्नान करून यावें, असा प्रकार अस्तमानपर्यंत चालला होता, हा सहनशीलतेचा व दुराग्रहाचा झगडा पहाण्यास ही गर्दी जमली! जयश्रीची माळ कोणाच्या गळ्यांत पडते ती पाहण्याविषयीं प्रेक्षकजन उत्कंठित होऊन गेला! सरतेशेवटीं त्या यवनाचें तोंड थुंकतां थुंकतां दुखून त्याचा तोच खजील होऊन गेला. व हा कोणी क्षमाशील असाधारण मनुष्य असावा असें त्यास वाटून कृतकर्माचा त्याला पश्चात्ताप झाला, व एकनाथाची त्यानें क्षमा मागितली!!

पूर्वनिर्दिष्ट गुणांशिवाय निरभिमान, भूतदया, निरिच्छता, आत्मनिग्रह, स्थैर्य, समचित्तत्व, विषयवैराग्य, परोपकार आदिकरून जे गुण खऱ्या साधूच्या ठिकाणीं अवश्य पाहिजेत, व ज्या गुणांचा ल-

---

१ हीच गोष्ट मयूरकवीनें एका आर्येंत आणली आहे:–

आंगावरि नित्य थुंके एके दिवशीं न त्या खळा पाहे।
तद्द्वारीं साधु उभा तें तद्वन चालवावया राहे ॥ २५ ॥

मोरोपंत ( साधुरीति ).

क्षणें समर्थासारख्या पुरुषश्रेष्ठांनीं, व तुकोबासारख्या सत्पुरुषांनीं बांधिलेलीं आहेत, ते सर्व गुण मूर्तिमंत एकनाथाच्या ठिकाणीं होते. "परोपकाराय सतां विभूतयः" हें जें महावाक्य, व त्याच अर्थाची, "जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति। देह कष्टवीती उपकारें ॥" ही जी शूद्रकवीची उक्ति, त्याप्रमाणें अक्षरशः एकनाथाचें वर्तन असे. ह्या पुरुषानें गृहस्थाश्रम स्वीकारल्यापासून गोदातीर्थीं देह विसर्जन होईपर्यंत आपला देह परोपकार करण्यांत झिजविला! अन्नान्नगत झालेल्या लोकांस यानें अन्नदानानें तृप्त केलें. नीतिभ्रष्ट व अज्ञानांधकारांत चांचपडत असलेल्या लोकांस उपदेशामृत पाजून व नीतिपर ग्रंथरूप दीपिका उज्ज्वलित करून, नीतिसंपन्न व ज्ञानी करून सोडिलें! भजन, पूजन, कथा, पुराण, व सत्कृत्य ह्यांशिवाय दुसऱ्या गोष्टींचा व्यासंगच या पुरुषास नसे! ह्याचे ठिकाणीं भूतदया इतकी ओतप्रोत असे कीं, आर्तांचें दुःख निवारण्याचा समय आला ह्मणजे, ह्या दयाशील पुरुषानें काळ पाहूं नये, वेळ पाहूं नये, स्थळ नाहीं, जात नाहीं, भाऊ नाहीं, बंधु नाहीं, कांहींएक न जुमानतां दुःख निवारण करावें!! ह्या अद्वितीय पुरुषानें गोदातीरीं तापलेल्या वाळूवरील पोरकीं पोरें, व चुकलेलीं अतिनीचांचीं व अंत्यजांचींगुद्धां मुलें कडेवर घ्यावींत, त्यांस आपल्या अंगवस्त्रानें स्वच्छ करून खाऊ देऊन तीं उगी करावीं, व त्यांस महारवाड्यांत नेऊन त्यांच्या मातापितरांचे स्वाधीन करावें!!

आपल्या अद्वितीय गुणाच्या योगानें जगास चटका लावणाऱ्या ह्या दयार्द्रपुरुषानें स्वकष्टार्जित संपादन केलेलें ज्ञान, विद्या व धन हीं परोपकारीं खर्च केलीं! कुमार्गगामी पुरुष दृष्टीस पडला ह्मणजे त्याचे घरीं त्यानें अनेक वेळां जावें. तो नको नको ह्मणत असतां व धिक्कार करीत असतांही, त्याचे कानीं कपाळीं ओरडून एकनाथानें त्यास चार सोईच्या गोष्टी सांगाव्या. दुर्व्यसनाचे दारुण परिणाम

---

१ अंत्यजनीच कडे घे उष्णीं ज्या फार त्याळ शेंबुड तें।
अद्भुत मुकुन न गानां, साधूंची रीति आळसें बुडतें ॥ ३१ ॥
(भक्त. अ. २२ ओं १२४-१३१) मोरोपंत (साधुरीति).

त्याचे लक्षांत आणून द्यावे, व त्यास सुमार्गास लावावें. दुष्टांस सुष्ट करण्याची युक्ति अशी असे कीं, चोरी करावयास आलेल्या तस्करास मारहाण न करितां, उलट त्याचें चुकून राहिलेलें द्रव्य त्यास देऊन, पश्चात्तापानेंच त्यास एकनाथ ताळ्यावर आणी.

एकनाथ हा साधुवृंदाचें शिरोभूषण होण्यास आणखी एक सबल कारण हें आहे कीं, ह्या अलौकिक पुरुषाच्या बोलण्यांत व करण्यांत काडीमात्र तफावत नसे. साधूंच्या लक्षणांविषयीं नियमन करीत असतां, समर्थ ह्मणतातः—

**श्लोक.**

**मुखें बोलिल्यासारिखें चालतोहे ।**
**मना सद्गुरू तोचि शोधोनि पाहे ॥**

रामदास.

साधुश्रेष्ठ तुकारामाचेंही असेंच ह्मणणें आहेः—

**अभंग.**

**बोले तैसा चाले । त्याचीं वंदावीं पाउलें ॥ १ ॥**
**साधु तोचि ओळखावा । देव तेथेंची जाणावा ॥ २ ॥**

साधूंचीं लक्षणें कशीं ओळखावीं ह्याविषयीं शूद्रकवि ह्मणतातः—

**अभंग.**

**अंतरीं निर्मळ । वाचेचा रसाळ ॥**
**त्याचे गळां माळ । असो नसो ॥ १ ॥**
**आत्मा अनुभवीं । चोखाळिल्या वाटा ॥**
**त्याचे माथां जटा । असो नसो ॥ २ ॥**
**परस्त्रीचे ठायीं । जो कां नपुंसक ॥**
**त्याचे अंगा राख । असो नसो ॥ ३ ॥**

---

भोजन दे चोरांला, आदर आग्रह करी स्वयें मोटा ।
साधु प्रसन्नचित्तें, बांधुन लागे वहावया मोटा ॥ २३ ॥
रीति न कोणाचीही या अनितर सरळ रीतिशीं तुकली ।
साधु म्हणे तस्कर हो घ्या तुमची एक आंगटी चुकली ॥ २४ ॥

मोरोपंत ( साधुरीति ).

**परद्रव्या अंध । निंदेसी जो मुका ॥**
**तोचि संत देखा । तुका ह्मणे ॥ ४ ॥**

तुकाराम.

कविसिद्द मयूरकवि एके ठिकाणीं ह्मणतातः—

**गीति.**

**मोक्षद ह्मणे सदय जो कोणाचाही करीच ना द्रोह । नांदे**
**क्षमा जयाच्या हृदयीं तो साधु नाशितो मोह ॥ १५ ॥**
**भव्य बळ सत्य जाचें नित्य असूयादिरहित जो काय ।**
**सुखदुःखांत सम सदा ज्याचा सर्वोपकाररत काय ॥२५॥**
**गडबड ना कामांहीं सुमृदु सदाचाररत सदा दांत ॥**
**इष्ट क्रियारहित मितभोजी जो भी पराग्रहा शांत ॥३५॥**

मोरोपंत.

महान् महान् तत्त्ववेत्त्यांनीं, पंडितांनीं व साधुवर्योनीं जीं जीं लक्षणें साधूंचे ठिकाणीं असावींत असें प्रतिपादित केलें, तीं सर्व लक्षणें ज्या अर्थी एकनाथाचे ठिकाणीं पूर्णपणानें होतीं, त्या अर्थी हा पुरुष सन्मणिमालिकेंत चमकला हें यथार्थच झालें. ज्या पुरुषाला अद्वैतमत काय आहे हें पुरें कळून, निरंतर आनंदमय, निर्विकार व निरिच्छ अशी ज्याची वृत्ति होती, "सर्वमेकं अद्वितीयं ब्रह्म" हें जो पुरें ओळखीत होता, जो या प्रपंचांत व संसारांत असूनही नाहीं-सारखाच होता, ह्मणजे जो या जगताचें भासमान स्वरूप पूर्णपणें ओळखीत होता, व ज्याची कृतिही अखंडदंडायमान एकसारखी बोलण्याप्रमाणेंच होत असे, असा तादात्म्य पावलेला, त्रिपुटी मावळलेला, तद्रूप झालेला, भिन्नभाव नष्ट झालेला, आणि तदाकार व तल्लीन झालेला एकनाथ, हा विष्णूचाच अवतार होता असें जें कि-

---

१ अशाच अर्थाचा उल्लेख गोल्डस्मिथ् कवीनें एका पवित्र पुरुषाविषयीं एके ठिकाणीं केला आहेः—

"To them his heart, his love his griefs were given",
"But all his serious thoughts had rest in heaven".

*Goldsmith's Deserted Village.*

त्येक भाविक भक्त ह्मणतात, त्यांत आश्चर्य तें काय ? असा अमानुष पुरुष साधुचूडामणि झाला यांत विशेष तें कोणतें ? व अशा महात्म्याच्या हातून अद्भुत चमत्कार घडले, असें ह्मणण्यांत अतिशयोक्ति ती कोणती ?

असो; नानागुणांनीं मंडित असा हा अद्वितीय पुरुष पैठणामध्यें असल्यामुळें, लोकांची नीतिवर्तनाकडे उत्तरोत्तर प्रवृत्ति होत गेली. प्रपंच व परमार्थ हीं दोन्ही कशीं साधितां येतात, हें नाथाच्या उपदेशावरून व त्याच्या स्वतःच्या वर्तनावरून जनसमूहास चांगलें कळलें. एकनाथानें गृहस्थाश्रमाप्रमाणें यथास्थित वर्तन करून, सद्वर्तन, परोपकार, कर्माचरण, इंद्रियदमन, आत्मज्ञान, आदिकरून गोष्टींच्या योगानें प्रपंचांत राहून प्रपंचसाधनानेंच परमार्थाची विलक्षण वस्तु प्राप्त करून घेतली. सारांश, 'तो नर भला भलारे भला भला, प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो ज्याणें केला' हें जें शिवदिन केसरीसारख्या साधुश्रेष्ठांचें महद्वाक्य, त्या वाक्याप्रमाणें 'भला' हें योग्यपद धारण करण्यासारखेंच या पैठणकर साधुचूडामणीचें निरंतर वर्तन असे. आतां एकनाथाच्या अपत्यांविषयीं माहिती देऊन हा भाग संपवूं.

एकनाथास प्रथम कन्यारत्न झालें. तिचें नांव गोदुबाई असें होतें. गोदुबाई, पैठणामध्यें कोणी चिंतोपंत नांवाचे सद्गृहस्थ होते त्यांचेकडे दिली होती. एकनाथास गोदुबाईचे पाठीवर हरी नांवाचा पुत्र झाला. हाच पुढें हरिपंडित या नांवानें गीर्वाणभाषाभिज्ञत्वाच्या संबंधानें काशिक्षेत्रांत गाजला. एकनाथाचा हा मुलगा आपल्या पढतमूर्खत्वाच्या योगानें बापावर रुसून काशींत जाऊन राहिला होता. रुसण्याचें कारण हेंच कीं, 'मी एवढा पंडित असून, बापानें प्राकृत भाषेंत पुराण सांगून माझ्या अब्रूस वट्टा लावावा हें बरोबर नाहीं !' पुढें एकनाथ स्वतः काशींत गेला व आपल्या लेंकास चार गोष्टी सांगून त्यानें त्यास परत पैठणास आणिलें.

हें वरील बापलेंकांचें रुसणें, ह्मणजे विचाऱ्या महाराष्ट्र भाषेवर त्या कालच्या पंडितांचा किती रुसवा होता ह्याचें द्योतक आहे.

हरिपंडिताच्या पाठीवर एकनाथास गंगाबाई नांवाचें तिसरें अपत्य झालें. गंगाबाईला कर्नाटकांत एका कुलीन घराण्यांत दिलें होतें. याप्रमाणें एकनाथाला दोन कन्या आणि एक पुत्र अशीं तीन अपत्यें होतीं.

एकनाथाच्या आंगीं वर सांगितलेलेच केवळ गुण नसून, वरील गुणांशिवाय अमानुष, अतर्क्य, आणि अलौकिक असे अद्भुत चमत्कार करून दाखविण्याचेंही सामर्थ्य त्याच्या तपश्चर्येंत व समाधींत असे. ह्या अमानुष चमत्कारांचें अद्भुत वर्णन पुढील भागांत दिलें आहे

## भाग दहावा.

### अद्भुत चमत्कार.

**परित्राणाय[1] साधूनां संभवामि युगे युगे ।**

( भगवद्गीता. )

### आर्या.

**गोपां किति गोपींना नेदी उदकासि आणिकां वडिलां**
**तो एकनाथसदनीं गंध उगाळूनि आणि कावडिला ॥**

( मोरोपंत. नाथचरित्र. )

आतां एकनाथानें अद्भुत चमत्कार कोणते केले ते पाहूं. एकनाथाच्या अमानुष कृत्यांचा विचार करण्यापूर्वी येथें ही एक गोष्ट सांगणें अवश्य आहे कीं, आमच्या वाचकांपैकीं कित्येक अशी पृच्छा करितील कीं, ह्या सुधारणुकेच्या शिखरास पोंचलेल्या एकोणिसाव्या शतकांत आकाशवाणी, दत्तात्रयदर्शन, अद्भुत चमत्कार, अशीं सदरें ठोकून असंभाव्य गोष्टी लिहिण्यानें ग्रंथ विटाळावा, हें शास्त्रोक्त कसें ठरेल ? तर अशा प्रकारच्या पृच्छकांस आमचें सांगणें हें आहे कीं, ह्या गोष्टी लिहिण्याचीं आमचीं साधक बाधक कारणें आहेत, तीं प्रथम देऊन नंतर प्रकृत भागास आरंभ केला आहे. तीं कारणें वाचूनही जर कित्येक वाचकांस अद्भुत गोष्टींच्या वर्णनानें ग्रंथ विटा-

---

[1] भक्तांच्या संरक्षणासाठीं ईश्वर क्षणोक्षणीं अवतार घेतो.

ळला असें वाटेल, तर त्यांनीं स्पर्शास्पर्श दोष न लागावा ह्मणून, ह्या चमत्कारवर्णनाचा भाग सोडून देऊन एकदम उत्तरार्ध उघडावा हें बरें. कारण ज्यांचें रसनेंद्रिय अद्भुतरसास्वादनाविषयीं मुदलींच बधिर, अशा लोकांना त्या रसाच्या आस्वादनाविषयीं आग्रह करणें बरोबर नाहीं!

अद्भुत चमत्कार वर्णन करण्याचें पहिलें कारण हें आहे कीं:— ह्या निबंध एकनाथावर असून नाथचरित्र ( खुद्द एकनाथाची माहिती ) ह्या एक निबंधाचा प्रधान अवयव आहे. ह्याकरितां एकनाथासंबंधी ग्रंथाधारानें मिळणारी सर्व प्रकारची खरी खरी माहिती देणें, सर्वथैव न्याय्य आहे. इतकेंच नव्हे, तर ही माहिती जगापुढें न मांडणें, ह्मणजे चरित्रनायकाचें खरें स्वरूप जगास न दाखविण्याप्रमाणें होणार आहे. ग्रीस, रोम इत्यादि पाश्चात्यदेशीय इतिहास जरी चाळून पाहिले, तरी त्यांतसुद्धां ग्रंथारंभीं अशाच प्रकारच्या तद्देशीय अमानुष कथानकांचें दिग्दर्शन केलेलें असतें. असाच प्रकार पाश्चात्य साधु जे सेंट जॉन आदिकरून, त्यांच्याही चरित्रांत दृष्टीस पडतो. ह्या जर प्रकार इतिहासासारख्या महत्वाच्या पुस्तकांत, व त्यांतून पाश्चात्यांच्या इतिहासांत दृष्टीस पडतो, तर बिचाऱ्या तुकोबा, ज्ञानोबा, एकनाथांनींच काय पाप केलें नकळे!

शिवाय ह्या ग्रंथांत जर ते चमत्कार दिले नाहींत, तर ग्रंथांतील एकंदर लेखाचा विचारही रास्त रीतीनें करितां येणार नाहीं. ह्याकरितां ते चमत्कार, संक्षेपानें कां होईना, येथें देणें जरूर आहे. मग त्यांच्या खंडनमंडनाचा विचार स्वतंत्र आहे. अद्भुत चमत्कार केवळ एखाद्या विषयवर्णनाच्या अंगभूत असल्यानेंही जर तो ग्रंथ कवडीमोल किंमतीचा ठरता, तर नवनीतांतील कविचरित्रांला कधींच हरताळ लागून त्याच्या इतक्या आवृत्तिही न निघत्या. व त्याप्रमाणेंच भारतवर्षीय प्राचीन अर्वाचीन ऐतिहासिक भांडाराच्याही कधींच चिंधड्या उडाल्या असत्या. यावरून इतकें सिद्ध होतें कीं, वस्त्राभरणांनीं अलंकृत अशा सुकुमार व सुंदर युवतीच्या रूपयौवनाचाच जेथें विचार कर्तव्य आहे, त्या ठिकाणीं हे दागिने खरे आहेत किंवा

मुलाम्याचे आहेत, ही तरुणी ब्राह्मणी आहे किंवा अन्य जातीय आहे, ह्या गोष्टींची जशी मार्मिक मनुष्य मीमांसा करीत नाहीं, त्याप्रमाणेंच ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम ह्यांसारख्या जितेंद्रिय, निग्रही व ज्ञानी महापुरुषांच्या भक्तांनीं भक्तिभावानें गाइलेलीं उपास्यदेवांचीं अद्भुत चरित्रें वाचीत असतां, जर कोणी चमत्कारांच्या सत्यासत्यतेची मीमांसा करील, तर तो, भक्तिरसमाधुरीचें आस्वादन करणाऱ्यांच्या दृष्टीनें, अरसिक ठरेल.

अद्भुत चमत्कार वर्णन करण्याचें तिसरें कारण हें आहे कीं, एखाद्या मनुष्याची एखाद्या ठिकाणीं श्रद्धा व आस्तिक्यबुद्धि बसण्याला कांहीं चमत्कारिक कारण लागतें. "चमत्काराशिवाय नमस्कार नाहीं." ही जी ह्मण आहे ती यथार्थ आहे. अज्ञान बालकानें भाताचे दोन घांस घ्यावे एवढ्याच करितां "बागुलबोवा" आला ह्मणून जशी आईस क्लृप्ति लढवावी लागते, किंवा लहान मुलाची समजूत घालावयाची असली ह्मणजे नानाप्रकारचे भयप्रद अथवा चमत्कारिक पदार्थ दाखवून, लहान मुलाच्या हिताच्याच गोष्टी जशा युक्तीनें साध्य करून घ्याव्या लागतात, त्याप्रमाणेंच महान् महान् साधूंचीं चरित्रें भक्तिरसानें व अद्भुत रसानें जर थबथबलीं नसतीं, तर त्यांची महती इतकी न वाढतां त्यांच्या ज्ञानाचा, त्यांच्या विद्येचा व अमोघ तपश्चर्येचाही जगास कांहींच उपयोग झाला नसता. मधाचें बोट दाखवून जसें मुलांकडून औषध खाववायाचें, त्याप्रमाणेंच एखाद्या व्यक्तीचें व पदार्थांचें सरस वर्णन करून जनसमूहाची दृष्टि तिकडे आकर्षण करावयाची, इतकाच भक्तांचा व स्तुतिपाठकांचा उद्देश असावा.

आतां ही गोष्ट खरी आहे कीं, ज्या ठिकाणीं अतिशयोक्तीनें एखाद्या अधमाधमाची उन्नति होऊन दंभ, अनीति, अनाचार, दुराचरण इत्यादि गोष्टींस उत्तेजन मिळण्याचा संभव आहे, त्या ठिकाणीं अद्भुत व असंभाव्य गोष्टींचें निरंतर खंडनच केलें पाहिजे; परंतु ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, सॉक्रेटिस आदिकरून जे पुण्यपुरुष नीतीचे व सदाचरणाचे पुतळे असे अवतरले, जे स्वतः निरिच्छ

असून आपलें सर्व आयुष्य ज्यांनीं तत्त्वबोधांत घालविलें, अशा महात्म्यांच्या अद्भुत स्तुतिस्तवनाचें मंडनच केलें पाहिजे.

एकनाथानें अद्भुत चमत्कार खरोखर केले किंवा न केले, हें सांगणें फार कठीण नाहीं. कारण जितक्या अंशानें असे चमत्कार करणें असंभाव्य आहे असें प्रतिपादन करितां येईल, तितक्याच अंशानें ते संभवनीय आहेत असेंही कबूल करावें लागेल. कारण पाश्चात्यविद्येचा संस्कार होऊन रसायनशास्त्र, ज्योतिषशास्त्र आदिकरून शास्त्रांचा कोठें थोडा वारा लागतो न लागतो इतक्यांतच आमचे लोक अर्ध्या हळखुंडानें पिंवळे होऊन, स्वधर्माची अवहेलना करूं लागले, व भूतें, पिशाच, मंत्रतंत्र सब झूट ह्मणून सिद्धांत ठरला. परंतु तें सगळेंच पारडें फिरून ब्ल्याव्हाट्स्की व ऍनीबिझांट् बाईनीं व ऑल्कॉट साहेबांनीं "थिआसोफिस्ट[१]"ची[२] अंजनशलाका पातालांतून व पश्चिमेकडून आणून भारतीयांच्या नेत्रांत फिरविल्याबरोबर काय बहार उडाला तो पहा!! ज्या योगसाधनादि वैदिकक्रिया मिथ्या ह्मणून आधुनिक विद्वानांनीं ठरविल्या होत्या, ज्या वैदिकधर्मात मंत्रतंत्रादिक गोष्टींची रेलचेल असल्यामुळें त्या कुचकामाच्या ह्मणून वेदाची पायमल्ली त्यांनीं चालविली होती, तोच वैदिकधर्म आतां इतर धर्माहून श्रेष्ठ, व जें कांहीं परम गुह्य ज्ञानतत्त्व आहे तें याच धर्मात आहे, असा हल्लीं सिद्धांत ठरूं पहात आहे!!

मुंबापुरवासी व मद्रपुरवासी ईशज्ञानी मंडळींनीं योग, समाधि, जप, तप हीं सर्व खरीं आहेत असें प्रतिपादित केलें आहे. तसेंच मानसिक चुंबकाच्या (Metaphysical-Magnetism) प्रभावानें व सूक्ष्मदेहामुळें संचार, आंगांत येणें, बोडणाचा प्रकार, महालक्ष्मी, करपुतळी, भूत, पिशाच, दृष्टांत, सिद्धिदर्शन इत्यादि सर्व गोष्टी

१ या नांवाचें व अशींच दुसरीं मासिक पुस्तकें अमेरिकन व इंग्लिश लोक काढीत असून त्यांचीं ठाणीं लंडन, मद्रास व अवांतर प्रसिद्ध ठिकाणीं आहेत. त्यांचा उद्देश गुप्त विद्या प्रकट करून त्यांचा अनुभवही घ्यावा. ह्या त्यांच्या स्तुत्य उद्योगापासून सात्विक वृत्तीच्या दीर्घ उद्योगी सदाचारी लोकांस अनुभविक ज्ञान मिळण्याचेंही यश येन चाललें आहे.

२ The Theosophists.

खऱ्या आहेत असें शास्त्ररीत्या सिद्ध करून दाखविलें आहे, व त्याप्रमाणें **ब्ल्यांव्हाट्स्की** बाई चमत्कारही करून दाखवीत होत्या!!!

असा जर प्रकार धडधडीत विलायत व मुंबईमद्राससारख्या राजधानींच्या शहरांत, सुधारलेल्या देशांतील लोक, सुधारलेल्या मंडळींत, सुधारलेल्या शास्त्रसाधनानें करून दाखवितात, तर एकनाथानें ऐकलेली आकाशवाणी, त्याचें दत्तदर्शन व अद्भुत चमत्कार हेही कालाच्या अनंतत्वांत झाले नाहींत कशावरून? व पुढें होणार नाहींत यास तरी प्रमाण काय?

वैदिक धर्मातील साधुवर्यांनीं आत्मानात्मविचार संबंधी जितका

---

१ सदर्हू विद्वान् स्त्री कांहीं वर्षांमागें विलायतेंत समाधिस्त झाली. तिच्याहूनही विशेष अधिकारी असे **नाशिकचे भटजी महाराज, अक्कलकोटकर स्वामि महाराज, आळंदीचे श्रीमत् नृसिंह सरस्वति स्वामिमहाराज** यांच्या अद्भुत योगबलाचे विलक्षण चमत्कार प्रत्यक्ष पाहिलेले व ऐकलेले असे इंग्लिश शिकलेले अनेक विद्वान् लोक आज मित्तीला हयात आहेत. परंतु इतक्यांवरही भरंवसा नसून केवळ पाश्चात्यांच्या ओंजळीनें पाणी पिण्याचेंच ज्यांना आवडत असेल त्यांनीं **हिपनॉटिझम, क्लेअर व्हॉएन्स, क्लेअर ऑडिअन्स, मेस्मेरिझम्, स्पिरिच्युआलिझम्, मीडिअमशिप,** इत्यादि ज्या शास्त्रांचा ऊहापोह पाश्चात्य पंडित हल्लीं सुरेख रीतीनें करीत आहेत त्यांचीं साधक बाधक कारणें आमच्याकडील विद्वानांनीं अवश्य ताडून पहावीं; व त्यांतील ग्राम्यउपासनेचे, सिद्धीचे व वाममार्गाचे प्रकार, केवळ ग्राम्यलोकांच्या खात्रीकरितां आहेत म्हणून त्यांत न पडतां शुद्ध व पारमार्थिक असे जे **तूर्या** व **उन्मनि** अवस्थेचे अवर्णनीय सुख देणारे समाधियोगमार्ग, त्यांचें योग्य रीतीनें परिशीलन केलें असतां या आमच्या अश्रद्धावानांची खात्री होईल कीं, सृष्टि म्हणजे केवळ पंचभौतिक परमाणूंचेंच अनिर्गलित सम्मीलन नसून **मूर्त** पदार्थाप्रमाणेंच **अव्यक्तमहत्तत्वादि अमूर्त सूक्ष्म तत्वाशीं** सुद्धां, **सूक्ष्म देहाचा** ऊर्फ **जीवाचा** साक्षात् संबंध, साधक दशेंत घडत असतो. या **अव्यक्ततत्वमहोदधींतील रसायनिक** व्यापारामुळेंच (Chemistry of unmanifested universe on intellectual, spiritual or Metaphysical planes) योगारूढ जीववृत्तीस जागृती प्रमाणें एकाहून एक अशा **जाणीवेच्या** व **ज्ञानाच्या अवस्थांचा** (stages of consciousness) अनुभव येत असतो. या शास्त्रोक्त, सयुक्तिक रसायनामुळेंच सत्पुरुष व त्यांचे अद्भुत चमत्कार हे खरे ठरतात.

शोध, विवेचन व स्पष्टीकरण केलें आहे, तितकें बौद्ध व हिंदु धर्मांच्या पायावर उभारलेल्या थिआसफीच्या अपवादाखेरीज अन्य धर्मांत कोठेंच केलेलें नाहीं. भूगर्भ, ज्योतिष, रसायन इत्यादि अनेक शास्त्रांचें परिशीलन करून त्रिभुवनाचा जरी मथितार्थ **हक्स्ली, स्पेन्सर, टिंडाल, मॅक्समुलर, डार्विन**सारख्या पदार्थविज्ञान, भाषा, शारीर व प्राणिशास्त्रवेत्त्या पाश्चात्य पंडितांनीं बुद्धिसर्वस्व खर्च करून काढलेला आहे, तथापि हा सर्व त्यांचा प्रयत्न बाह्यांगाविषयींचा आहे. अंतरंग (Inner Man) काय तें महाराष्ट्र साधु जे ज्ञानोबा, तुकोबा, एकनाथ, रामदास, शंकराचार्य, ह्यांसच कळलेलें आहे, असें सूक्ष्मदृष्टीनें जो पाहील व निःपक्षपातबुद्धीनें जो विचार करील त्यास दिसून येईल.

असो. ह्या विस्तृत लेखावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल कीं, एकनाथानें केलेल्या अद्भुत चमत्कारांच्या सत्यतेची मीमांसा करण्याचा आमचा इरादा नसून, फक्त या ग्रंथाचा विचार पूर्णपणें करितां यावा, चरित्रनायकाचें चरित्र अपुरें न रहावें, व चमत्कारांची जाती वाचकांस कळावी, ह्या उद्देशानें कांहीं चमत्कार संक्षेपानें पुढें दिले आहेत.

**चमत्कार पहिला.** भूतदया—एकनाथाचे घरीं पितृतिथि असल्यामुळें, आदले दिवशीं एकनाथानें पैठणांतील कांहीं ब्राह्मणांस क्षण दिला होता. पितृतिथीचे दिवशीं दहा वाजण्याचे सुमारास पाक सिद्ध झाला असतां, द्विजवर्यांची वाट पहात एकनाथ दारांत उभा राहिला.

एकनाथाचे घरावरून त्या सुमारास कांहीं क्षुधापीडित अंत्यज चालले होते. त्यांनीं तो श्राद्धीय अन्नाचा खमंग वास अनुभवतांच त्यांची क्षुधा द्विगुणित झाली. मग ते नाथाच्या घरापासून बरेच अंतरावर गेल्यावर कोणास ऐकूं न जाईल अशा रीतीनें परस्परांत बोलतात. "कायहो हा अन्नाचा सुवास! असें सुग्रास अन्न आह्मांस कधीं तरी मिळण्याचा संभव आहे काय?" दुसरा त्यास उत्तर देतो,

"छीः, महारांस असले स्वमंग पदार्थ कोठून खावयास मिळणार?" हा त्यांचा संवाद एकनाथाच्या कानीं ओझरता पडला. नाथाचें अंतःकरण भूतदयेनें द्रवीभूत होऊन त्यानें मोठ्या उल्हासानें व आनंदानें त्या अंत्यजांस हाक मारिली. नंतर ते नको नको ह्मणत असतांही आग्रह करून एकनाथानें तो अंत्यजसमूह श्राद्धीय अन्नरसमाधुरीनें तृप्त करून सोडिला; व मोठ्या आदरानें त्यांस मार्गस्थ केलें. नंतर सडासंमार्जन करून पुनश्च पाकसिद्धि केली व ब्राह्मणांस बोलावण्याकरितां उद्धवास सांगितलें.

इकडे क्षण घेतलेल्या ब्राह्मणांस हा सर्व प्रकार विदित होताच, त्यामुळें, त्यांनीं उद्धवास साफ सांगितलें कीं, "वर्णसंकर करणाऱ्या नीतिभ्रष्ट अधमाधमाच्या घरीं आह्मी येत नाहीं. एकनाथ बहिष्कृत असून हें ग्रामण्याचें प्रकरण मोठेंच माजणार." असा हा ब्राह्मणांचा निरोप उद्धवानें परत येऊन आपल्या गुरूला विदित केला.

एकनाथानें तें सर्व शांतपणानें ऐकून घेतलें. त्याचें मन यत्किंचित् सुद्धां खट्टू न होतां, परत मध्यगृहांत येतो तों, ब्राह्मणाकरितां मांडलेल्या पाटांपैकीं, एकही पाट रिकामा न रहातां, स्वच्छ वस्त्रें परिधान केलेले भस्मचर्चित, शुद्ध आणि पवित्र द्विजवर्य, दर्भपुंज घेऊन आसनारूढ झाले आहेत!!!

नंतर यथाविधि श्राद्धसंकल्प करून सर्व गोष्टी यथासांग झाल्या. गिरजाबाईसारखी दक्ष बायको घरांत असल्यामुळें एकनाथाचा भोजनसमारंभ काय विचारावा! ब्राह्मणांचा यथेच्छ भोजनविधि झाल्यावर पिंडदानादि कृत्यें उरकून यजमानास विचारून हा विप्रसमूह बाहेर पडला.

इकडे क्षण दिलेले ब्राह्मण एकत्र जमून एकनाथास फजित करावें व त्यास बहिष्कृत करावें ह्या उद्देशानें लगबगीनें मोठमोठ्यानें बडबड करीत, व मिशांवर ताव देत एकनाथाचे घराकडे आले; आणि पहातात तों केशरी गंध लावलेले द्विजवर्य, हातांत गंगाजमुनी झाऱ्या घेऊन, तांबूलचर्वण करीत व ढेंकरा देत एकनाथाच्या

घरांतून बाहेर पडत आहेत !! व त्या विप्रांच्या झुंडींतच, या क्षण घेतलेल्या पैठणकर ग्रामण्यपंडितांपैकीं, कोणाचे परलोकवासी आजे, कोणाचे वडील, कोणाचे पितृव्य, कोणाचे प्रपितामह, कोणाचे मृतबांधव अशी मंडळी दृष्टिगोचर झाली !!! हा अद्भुत चमत्कार पाहून कसलें ग्रामण्य! आणि कसला बहिष्कार! ती पैठणकर मंडळी खजील होऊन एकनाथास शरण आली. व नाथ हा कोणी अमानुष पुरुष असावा, अशी त्यांची खात्री झाली!!

**चमत्कार दुसरा.** जातिभेद—पैठणामध्यें एक सदाचारसंपन्न, नैष्ठिक, भक्तिमान् आणि ज्ञानी महार रहात असे. त्याचें नांव रामा असें होतें. रामाची बायकोही त्याप्रमाणेंच सुशील असून भाविक होती. तीं उभयतां एकनाथाच्या पुराणास, कीर्तनास व भजनास नित्यनेमानें व भक्तीनें जात. एकनाथाच्या ठिकाणीं त्यांची पूर्ण श्रद्धा असून यथाशक्ति त्याची तीं सेवाचाकरी करीत.

" जनार्दनाशिवाय पदार्थच नाहीं " हें एकनाथाचें मत त्यांचे ठिकाणीं ठसून गेलें होतें. या कारणानें एकनाथानें एकवेळ आपल्या घरीं भोजनास यावें, अशी जी फार दिवसांची इच्छा रामाच्या व त्याच्या बायकोच्या अंतःकरणांत होती, ती इच्छा तृप्त करण्यास 'जनीं जनार्दन' हें महावाक्य प्रतिबद्धक होणार नाहीं, असें जाणून रामानें नाथाला भोजनांस बोलाविलें. रामाचा भाव, त्याची श्रद्धा, त्याचें आचरण हीं एकनाथाला पूर्णपणें ठाऊक असल्यामुळें, त्यानें ती गोष्ट मान्य केली.

नंतर नेमलेल्या दिवशीं एकनाथ रामाचे घरीं गेला. त्या ठिकाणीं यथाशक्ति रामानें जी भोजनसिद्धता केली होती तिचा मोठ्या संतोषानें नाथानें स्वीकार केला. एकनाथ राम्या महाराकडे जेवायास गेला, ही वार्ता, केवळ बाह्य पावित्र्यावरच खुलणारे व शालजोडी खांद्यावर उडविणारे टिळाटोपीवाले मत्सरी शास्त्री पंडितांस कळतांच, नाथाची धिंड काढावी या हेतूनें त्याला पकडण्याकरितां कांहीं मंडळी चोरून त्याच्या मागोमाग महारवाड्या-

कडे गेली. व कांहीं मंडळी तो परत पळून न यावा ह्मणून एक-नाथाच्या घराकडे गेली.

राम्या महाराचे घरीं जाऊन पहातात तों, एकनाथ मोठ्या प्रेमानें आमटी भुरकीत बसला आहे! मग त्याला, जेवीत असतां धरावा ह्या हेतूनें कांहीं मंडळी आंत शिरणार, इतक्यांत नाथाच्या घराकडे गेलेली मंडळी येऊन सांगूं लागली कीं, "व्यर्थ कां कष्ट करितां? एकनाथ स्वगृहीं झोंपाळ्यावर बसून उद्धवाबरोबर खुशाल गोष्टी सांगत आहे!!" तेव्हां एकच एकनाथ दोन[1] ठिकाणीं कोठून आला, ह्मणून खात्री करण्याकरितां एकनाथाचे घरीं जाऊन पहातात तों, खरोखरीच तोच एकनाथ एकसमयावच्छेदेंकरून भिन्न स्थलीं भिन्न व्यापार करीत आहे!!! व कांहीं वेळानें अवलोकन करतात तों, रामाचे घरींच यथेच्छ भोजन झाल्यावर तांबूल घेऊन एकनाथ जागच्याजागींच अदृश्य झाला!!!

**चमत्कार तिसरा.** गंगेचा पाट—एकनाथाच्या अलौकिक पुराणश्रवणाकरितां, त्याचे घरीं तिसरे प्रहरीं श्रोतृजनांची मोठी गर्दी जमे. तें पुराण ऐकण्याकरितां एक अत्यंत लावण्ययुवती येत असे. त्या तरुण स्त्रीचें अलौकिक रूपसौंदर्य, तिचें पांढरें शुभ्र पातळ, काळा कुळकुळीत केशकलाप व देदीप्यमान अलंकार शोभा हीं सर्व अवलोकन करून कित्येक कामी पुरुषांची चित्तवृत्ति चंचल होई. परंतु त्या स्त्रीची शांत मुद्रा, पवित्र आचरण, व भारदस्त स्वभाव पाहून ते जागच्याजागींच थिजून जात!

तथापि एके दिवशीं दोन मदांध पुरुषांच्या मनांत ह्या स्त्रीवर झडप घालावी असा विचार येऊन, त्या दिवशीं सायंकाळीं पुराण आटोपल्यावर, हे दोघे त्या स्त्रीच्या मागें लांडग्याप्रमाणें पाठलाग करीत चालले. ती स्त्री मागें न पाहतां खालीं पहात शांततेनें गोदातिरापर्यंत गेली. ह्या कामपीडित पतंगांस वाटलें कीं, आतां ही आत्महत्या कदाचित् करील, व त्यामुळें हातची शिकार नाहींशी

१ या संबंधानें पंचकोशांपैकीं Double किंवा Kama-Rupa याविषयींची व्युत्पत्ती थिआस्सोफीच्या ग्रंथांत पहावी.

होईल, ह्मणून ते ह्या पवित्र ज्योतीवर झडप घालणार इतक्यांत गोदानदी दुभांग झाली, व त्यांत ही तरुण स्त्री क्रोधयुक्त मुद्रेनें त्या शठद्वयाकडे अवलोकन करीत अंतर्धान पावली !!!

नंतर ही वार्ता दुसरे दिवशीं एकनाथास कळून, त्यानें त्या दोघां पुरुषांस उपदेश केला व ती प्रत्यक्ष भागीरथी स्त्रीरूप धरून पुराणश्रवणास येई असें सांगितलें ! पैठणामध्यें अजूनही चाल आहे कीं, कोठेंही पुराण व्हावयाचें असलें, तर पुराणिकाजवळच 'गंगेचा पाट' ह्मणून एक पाट मांडितात ! व हळदकुंकवाच्या वाट्या ठेवितात !! ही चाल तेव्हांपासून पडली !!

**चमत्कार चौथा.** हरिपंडित आणि पत्रावळी—एकनाथाचा एकुलता एक मुलगा हरिपंडित, मूर्खपणानें बापावर रुसून काशींत जाऊन राहिला होता, त्यास समजावून एकनाथानें परत पैठणास आणिलें. परंतु त्या वेळेस बापलेंकांचा असा करार मदार झाला होता कीं, 'बापानें प्राकृत पुराण सांगण्याचें बंद करावें, व परान्नग्रहण करूं नये.' ह्या करारावर पंडितांची स्वारी पैठणास परत आली.

हरिपंडित आल्यावर एकनाथानें वाड्यांतील पुराण बंद केलें व ह्या पंडितांनीं आपली गीर्वाणगिरा सुरू केली. परंतु चमत्कार हा कीं, ज्या वाड्यांत एकनाथाचे पुराणश्रवणास गर्दीमुळें जागाही मिळूं नये, त्याच ठिकाणीं ह्या संस्कृत पुराणाची सुरवात होण्यावरोबर, भोळ्याभाविक भक्तांपैकीं कोणीच ऐकावयास येईना ! फक्त टिळाटोपी करणारे 'श्रोतव्यं, दातव्यं,' वर्गांपैकीं कांहीं नियमित मंडळी कधीं कधीं येत, व केव्हां केव्हां तर हरिपंडितासच श्रोत्यांचीं आणि वक्त्याचीं कामें, बजावावीं लागत !!

असा प्रकार चालला असतां, एका सुशील, सदाचारी व भाविक वृद्ध स्त्रीनें एकनाथाला आपले घरीं मोठ्या आदरानें भोजनास बोलाविलें. हरिपंडितावरोबर केलेल्या करारामुळें, एकनाथास रुकार देववेना. शेवटीं बापलेंकांच्या विचारानें मोठ्या मिनतवारीनें असें ठरलें कीं, हरिपंडितानें आपल्या घरची सामुग्री घेऊन त्या भाविक स्त्रीच्या घरीं पाकनिष्पत्ति करावी, व बापलेंकांनीं तेथेंच

अन्नग्रहण करावें, ह्मणजे परान्नाची अडचण मोडून त्या वृद्ध स्त्रीचेंही मन मोडलेंसें होणार नाहीं.

संकेताप्रमाणें उभयतां त्या सुशील स्त्रीचे घरीं भोजन करीत असतां, त्या भाविक स्त्रीनें एकनाथासाठीं मोठ्या प्रेमानें आणि काळजीनें खर्पूस पोळ्या भाजून ठेविल्या होत्या, त्या आणून भाविकपणानें दोघांच्या पानांत वाढिल्या! पोळ्या पानांत पडतांच 'अब्रह्मण्यं! अब्रह्मण्यं!' ह्मणून मोठ्यानें ओरडत हरिपंडित पानावरून उठला! त्याच्या तळव्याची आग मस्तकास जाऊन पोहोंचली.

पंडितानें, मग एकनाथाला व त्या बिचाऱ्या स्त्रीला शिव्या देत देत, दोघांच्या पुढील पत्रावळी उचलून बाहेर फेंकून दिल्या; व हात धुऊन घरांत येतो तों, पुनः पूर्ववत् जागच्याजागीं पत्रावळी आहेतच! हें पाहून पंडितांनीं पुनः पत्रावळी उचलल्या, आणि फेंकून देऊन आंत येऊन पहातात तों पत्रावळी आहेतच!!

याप्रमाणें पंडितांनीं रागानें पत्रावळी काढाव्या व त्या पूर्ववत् पुनः उत्पन्न व्हाव्या! असा प्रकार कांहीं तासपर्यंत चालल्यावर पंडितांची कंबर ठणकूं लागून ते अगदीं थकून गेले. आणि आपला पिता साधारण पुरुष नव्हे, अशी त्याची खात्री झाली. एकनाथानें त्यास उपदेश करून त्याच्या मूर्खपणाबद्दल व गर्विष्ठपणाबद्दल त्याची चांगलीच कानउघाडणी केली. पंडित तेव्हांपासून पित्राज्ञा उल्लंघिनासे झाले!

**चमत्कार पांचवा.** दुष्टांस सुष्ट करण्याची रीति—एके दिवशीं एकनाथ निद्रिस्त असतां अकस्मात् चार चोर त्याचे घरीं शिरले. हातांत पेटविलेली दिवटी घेऊन ते चीजवस्त गोळा करीत आहेत, इतक्यांत चौघांचे डोळे अकस्मात् जाऊन चौघेही अंधऋषि बनले!! मग घाबऱ्यां घाबऱ्यां जो तो पळून जाण्याविषयीं प्रयत्न करूं लागला; परंतु स्थल अपरिचित असल्यामुळें एकजण जिन्यांत पडून गडबडां खालीं आला! त्या आवाजासरसा एकनाथ जागा होऊन पहातो तों अंधऋषींची त्रेधा उडून गेली आहे! नंतर त्यानें ती सर्व अंधमालिका एकत्र केली. व त्या सर्वांचे डोळ्यांवरून हात फिरवितांच त्यांच्या दृष्टि पूर्ववत् झाल्या!! मग एकनाथानें त्या सर्वांच्या पुढें घरांतील

सर्व चीजवस्त आणून ठेविली; आणि ती 'खुशाल घेऊन जा' ह्मणून सांगितलें. परंतु ते आधींच गर्भगळित झाले होते. त्यांनीं नाथाची क्षमा मागून आपलें वर्तन सुधारिलें.

**चमत्कार सहावा.** नंदीचें उड्डाण—एके समयीं पैठणांत कोणीएक संन्याशी आला. त्याचा नेम असा असे कीं, कोणीही भेटलें तरी त्यास नमन करावयाचें, मग तो वंद्य, मनुष्य असो किंवा पशु असो. एके समयीं ह्या संन्याशानें एक मृत पशु पडलेला होता त्याला नमन केलें. तेव्हां ही गोष्ट धर्मबाह्य झाली असें ह्मणून पैठणच्या लोकांनीं त्या संन्याशाला बहिष्कृत केलें.

संन्याशानें तो प्रकार पाहून कमंडलूंतील थोडें उदक घेतलें व तोंडानें मंत्र ह्मणून त्या मृत पशूवर सिंचन केलें. इतक्यांत तो पशु खडबडून उठला व नाचत बागडत धांवूं लागला !!

हा प्रकार पाहून पैठणकरांनीं त्या संन्याशाला शुद्ध केलें. व अशाच प्रकारचा कांहीं चमत्कार दाखवा ह्मणून एकनाथाची त्यांनीं विनंति[1] केली. त्यावरून एकनाथ एके दिवशीं शिवालयांत भजन करीत असतां, असा प्रकार घडला कीं, एकनाथाचें भजन ऐन रंगांत आलें आहे, तालमृदंगादिकांच्या ध्वनीनें शिवालय नादून जाऊन गाभाऱ्यांतून प्रतिध्वनि ऐकूं येत आहे, श्रोत्यांचें मन भजनांत गढून गेलें आहे, एकनाथाची अभंगवाणी गिरिजारमणाचा धांवा करीत आहे, इतक्यांत सभामंडपांतील शिवापुढला पाषाणमय नंदी स्थानावरून उठला, आणि एकनाथाजवळ येऊन त्यानें नाथाज्ञेवरून तेथील गवत खाल्लें. सर्व लोक हा अमानुष प्रकार पाहून आश्च-

---

१ ही आख्यायिका फारच विस्तृत आहे. संजीवनी विद्या येत असलेला संन्याशी, लोकांनीं आपल्याला त्रास न द्यावा ह्मणून जमिनीमध्यें समाधि लावून बसला असतां, पैठणच्या लोकांनीं एकनाथावरच आळ घातला कीं यानेंच त्या संन्याशाला जिवंत पुरिलें, आणि एकनाथाला त्यांनीं बहिष्कृत केलें. नंतर आपणाविषयीं हा जनापवाद असणें बरोबर नाहीं असें समजून लोकांच्या आग्रहामुळें त्याला हा नंदीचा चमत्कार करून दाखविणें भाग पडलें. व संन्याशी केवळ स्वेच्छेनें समाधिस्त आहे अशी त्यांची त्यानें अनेक रीतींनें खात्री केली.

र्यभरांत निमग्न झाले. नंतर तो नंदिकेश्वर तेथून निघाला आणि नाथाचें भजन समाप्त झालेलें पाहून त्यानें उंच उड्डाण करून गोदा-वरींत धाडदिशीं उडी घातली; हा नंदी त्या नदींत अजून आहे; व पैठणास जाणाऱ्यांच्या तो दृष्टीस अजून पडतो.

**चमत्कार सातवा.** निरिच्छता—पैठणांतील एका ब्राह्मणानें आपल्या जवळचा परीस एकनाथाजवळ ठेवून आपण कांहीं जरू-रीच्या कामाकरितां दूर देशीं निघून गेला. एकनाथानें तो परीस घेऊन देव्हाऱ्याखालीं ठेविला. पुढें ह्या गोष्टीला बरींच वर्षें लोटलीं. एकनाथाला त्या परिसाचें स्मरण न राहून एके दिवशीं निर्माल्या-बरोबर तो परीस गंगेंत गेला. ब्राह्मण परत आल्यावर त्यानें आप-ला परीस परत मागितला. तेव्हां एकनाथास स्मरण होऊन देव्हारा झाडून पहातो तों, कोठेंच परीस सांपडेना. तेव्हां ब्राह्मण मनांत फार खट्टू झाला आणि ह्या मानकाप्यानेंच (एकनाथानें) माझ्या परिसाचा अभिलाष केला असें ह्मणून तो ब्राह्मण एकनाथास शिव्या देऊं लागला.

एकनाथानें त्या ब्राह्मणाचें बोलणें शांतपणानें ऐकून घेतलें. नंतर त्या ब्राह्मणाला घेऊन एकनाथ गोदा नदींत गेला व हातानें तींतील दगड वर काढून ब्राह्मणास ह्मणतो, 'ह्यांमधील तूं आपला परीस ओळखून घे.' ब्राह्मणास प्रथम असें वाटलें कीं, हा माझी थट्टा क-रीत आहे. मग बरोबर आणलेल्या लोखंडाच्या खिळ्यांनीं दगडांस स्पर्श करून पहातो तों, एकनाथाच्या ओंजळीमधील प्रत्येक दगड परीस आहे! मग त्यांपैकीं आपल्या ओळखीचा एक परीस घेऊन ब्राह्मणानें एकनाथाच्या विलक्षण पराक्रमाची फार तारीफ केली. नंतर एकनाथानें बाकीचे परीस पूर्ववत् नदीमध्यें टाकतांच ते सर्व पहिल्याप्रमाणें पाषाण झाले.

**चमत्कार आठवा.** नाथाचा रांझण—एकनाथाची निस्सीम भक्ति, त्याचा निर्धार, व त्याचें शुद्ध अंतःकरण, ह्यांच्या योगानें संतुष्ट होत्साते श्रीभगवान् ब्राह्मणाच्या रूपानें, निरंतर साधुसमागम असावा ह्मणून एकनाथाचे घरीं राहिले होते. त्या ठिकाणीं, कृष्णंभट हें नामाभिधान धारण करून, एकनाथाची शुश्रूषा करीत होत्साते,

द्वादश वर्षेपर्यंत भक्ताची सेवा चाकरी करीत, देवाधिदेव राहिले. कृष्णंभट हा प्रत्यक्ष भगवान् आहे हें कोणास ठाऊक नव्हतें. कृष्णंभटानें एकनाथाचें पूजेचें साहित्य तयार करून द्यावें, त्याला गंध उगाळून द्यावें, नाथाचे घरीं कावडीनें पाणी भरावें व हरएक प्रसंगीं देवानें आपल्या भक्ताची बाजू राखावी.

पुढें अशी गोष्ट घडून आली कीं, कोणी एक ब्राह्मण श्रीकृष्णाचें प्रत्यक्ष दर्शन व्हावें ह्मणून भयंकर तपश्चर्येस बसला असतां, कांहीं वर्षांनीं त्याला दृष्टांत झाला कीं, ' प्रतिष्ठानपुरींत कृष्णंभट या नांवानें, माझ्या सद्भक्त एकनाथाचे घरीं माझा शोध कर, ह्मणजे तेथें मी तुला दर्शन देईन.'

तो ब्राह्मण त्या दृष्टांताप्रमाणें पैठणांत एकनाथाच्या घराचा शोध करीत आला. आंत आल्यावर एकनाथाला ' तुमचे घरीं कृष्णंभट असतात ते कोठें आहेत ?' ह्मणून विचारिलें, हें ऐकून एकनाथानें कृष्णंभटास हाक मारिली. हाक मारल्याबरोबर पहातात तों, शंखचक्रगदापद्मधारी देदीप्यमान चतुर्भुज कृष्णमूर्ति घरांतून बाहेर आली; व एकनाथानें आणि त्या ब्राह्मणानें साष्टांग नमन केल्यावर, तो असह्य तेजोराशि तेथेंच अंतर्धान पावला!

एकनाथाच्या अद्भुत चमत्कारांच्या संबंधानें कोणीं कशीही मी-

---

१ श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो
स्वकरें चंदन घांसी, गंगेचें पाणि कावडीं भरितो ॥ ५१ ॥
अद्यापि साण, रांझण नाथ-द्वारांत असति देवाच्या ।
हातींचे म्हणुनि कवि, पंतमयूरेश तशि वदे वाचा ॥ २६ ॥
( मोरोपंत )

२ ह्या वर सांगितलेल्या चमत्कारांशिवाय आणखी पुष्कळ चमत्कार महिपतीनें दिले आहेत:—१ एकनाथाच्यामागें केशव नांवानें ब्राह्मणबटूचें रूप धरून प्रत्यक्ष भगवान् कथेमध्यें ध्रुवपद धरीत. २ त्याप्रमाणेंच एकनाथाचें पुराण श्रवण करण्यास श्रीकृष्ण, मनुष्यरूपानें येत. ३ एकनाथाला ज्ञानेश्वराचा असा दृष्टांत झाला कीं माझ्या मानेला मुळी लागली आहे ती काढ. त्यावरून एकनाथ आळंदीस आला आणि पहातो तों समाधीखालीं एक झाडाची मोठी थोरली मुळी आहे. मग त्यानें ती मुळी दूर केली. याप्रमाणें पुष्कळच अद्भुतवर्णन आहे. ( ज्ञानेश्वराचा हा दृष्टांत म्हणजे ज्ञानेश्वरी प्रगट करण्याविषयीं एकनाथास सूचक चिन्ह नसेलना ? )

मांसा करोत, तथापि लोकसमूहास हा साधुपुरुष किती प्रिय आहे, व ह्याचा अजरामर कीर्तिध्वज वसुंधरेवर कसा अप्रतिहत फडकत आहे, ह्या संबंधाचा मजबूत पुरावा आज तीनशें वर्षें एकनाथाचें जीवंत स्मारक करीत आहे ! ज्या रांझणांत भक्तिभावाचा भुकेलेला भगवान् पाणी भरीत असे, तो भव्य रांझण एकनाथाच्या साधुत्वाच्या अलौकिक कीर्तीची साक्ष देत, प्रतिवर्षीं फाल्गुन कृष्ण षष्ठीचे दिवशीं पैठणामध्यें लक्षावधि लोकांना नाथाचें स्मरण करीत आहे !! त्याप्रमाणेंच ह्या साधुपुरुषाच्या साधुत्वाचा परिमल दरवळून टाकणारें सहाणखोडही नाथाच्या भक्तांनीं जतन करून ठेविलें आहे !! पाश्चात्य कविकुलगुरु जो शेक्स्पीयर, त्याची स्टॅटफर्ड येथील खुर्ची पाहण्याकरितां जशी रसिकवर्यांची झड पडते, त्याप्रमाणेंच परोपकार, सहनशीलता, आत्मज्ञान, साधुत्व, इत्यादि गुणांविषयीं गाजलेल्या या गोदातीरच्या अवलियाचीं रांझणासारखीं जीवंत स्मारकें अवलोकन करण्याकरितां, पैठणामध्येंही भाविकभक्तांच्या उड्या पडतात !! राष्ट्रांतरास किंवा स्थित्यंतरास न जुमानणारी, व जनस-

१ अद्भुत चमत्कारांसंबंधानें एक गोष्ट निर्विवाद आहे कीं, या मायामय जगद्विलासाचा आदि अंत ज्याप्रमाणें कळत नाहीं त्याप्रमाणेंच या मायादेवीनें भिन्न भिन्न अधिकाऱ्यांच्या मनोरंजनार्थ किती प्रकारच्या रंगी बेरंगी अवस्थांच्या पैठण्या, व त्रिपुट्या परिधान केल्या आहेत त्याचाही निश्चयानें अमुकच म्हणून आंकडा सांगतां येणार नाहीं. तथापि या जगताप्रमाणें अवांतर अद्भुत देखावे व अवस्था व सुखें, जीव कर्तबगारी करील तर खचीत अनुभवील, ही गोष्ट निर्विवाद ठरते. म्हणून कोणी एखादा कमनशीब अडाणी हा जर एखाद्या छाछु करणाऱ्या धूर्त वैराग्याकडून ठकविल्यामुळें साधूंची व त्यांच्या अद्भुत कृतींची निंदा करील, तर त्याचें तें दुर्दैव व अज्ञान पाहून साधूंच्या चमत्काराविषयीं खात्री झालेले व अनुभविक लोक त्या फसलेल्याची कींव करतील व स्वानुभवामुळें साधूंस भजतीलच भजतील यांत संशय नको.

२ जीवंत स्मारक म्हणण्याचें कारण हेंच कीं—नाथषष्ठीस पैठणास मोठा उत्साह होत असून त्या वेळेस सर्व लोक हा रांझण गोदानदीच्या पाण्यानें भरतात. व तो रांझण भरला म्हणजे मग उत्साहसमारंभ यथासांग झाला, असें समजतात. इतकें त्या रांझणाचें महत्व आहे.

मूह्रास चिरकालिक हळहळ लावणारी, अशी ही अलौकिक साधुत्वाची किती विलक्षण शक्ति !! ह्मणूनच समर्थ ह्मणतातः

**देहे त्यागितां कीर्ति मागें उरावी ।**
**मना सज्जना हेंचि क्रीया धरावी ॥**

अस्तु; येथपर्यंत आह्मीं आपल्या आदिनायकाचें चरित्रचित्र रंगवून ह्या ग्रंथाच्या पूर्वार्धाची येथें समाप्ति करितों. ह्या ग्रंथाच्या विषयनायकाचें तेज केवळ साधुत्वसंबंधाचेंच नसून वाग्देवीचाही तो एक आवडता लाल होता. ह्याकरितां आमच्या वाचकांनीं येथेंच न थांबतां, या पैठणकर कविमण्यानें जीं उत्तमोत्तम काव्यमंदिरें उठवून दिलीं आहेत, तीं अवलोकन करण्याकरितां त्यांनीं पुढील उत्तरार्ध उघडावा.

**पूर्वार्ध समाप्त.**

---

# उत्तरार्ध.

## भाग पहिला.

## एकनाथाच्या ग्रंथांतील गुणदोष.

**रतरीतिवीतवसना प्रियेव शुद्धापि वाङ् मुदे सरसा ।**
**अलसा सालंकृतिरपि न रोचते शालभंजीव ॥ १ ॥**

आर्या सप्तशती.

एकनाथाची कीर्ति केवळ साधुत्वसंबंधाचीच नसून कवीमध्येंही त्याची गणना आहे. प्रतिष्ठानपुरींतील कित्येक स्मारकें ज्याप्रमाणें एकनाथाच्या साधुपणाविषयीं साक्ष देत आहेत त्याप्रमाणेंच त्यानें केलेले मोठमोठाले लोकमान्य ग्रंथ त्याच्या कवित्वाविषयीं उत्तम प्रकारचा पुरावा देत असून कांहीं काव्यें तर खऱ्या रसिकांस तल्लीन करून सोडण्यासारखीं आहेत.

कवि या संबंधानें एकनाथाच्या आंगचा पहिला गुण ह्मटला ह्मणजे तात्कालिक स्फूर्ति हा होय. कोणत्याही भाषेंतील कविता घेतली तरी ज्या कवितेंत कवीची स्वाभाविक स्फूर्ति दिसून येते, तीच कविता खऱ्या रसिकांस विशेष प्रिय असते. हा तात्कालिक स्फूर्तीनें कविता करण्याचा गुण एकनाथाच्या आंगीं पूर्णपणें वसत होता. त्याचें शीघ्रकवित्व इतकें जबरें असे कीं, अध्यात्मविषयासारख्या गहन विषयावर सुद्धां हजारों ओंव्या, अभंग, पदें त्यानें चालतां चालतां करावीं ! त्यानें जे जे मोठमोठाले ग्रंथ लिहिले आहेत व जीं जीं सरस काव्यें केलीं आहेत ते ते ग्रंथ, व तीं तीं काव्यें कोणत्या समयीं व कोणत्या स्थलीं रचलीं ह्याविषयींची हकीकत त्याच्या चरित्रांत वाचूं लागलें ह्मणजे कवीच्या स्फूर्तीचें व त्याच्या विलक्षण कल्पनाशक्तीचें आश्चर्य वाटतें, आणि त्याचे भागवतरामायणासारखे ग्रंथ पाहूनच मनुष्य अगदीं थक्क होऊन जातो. ह्या कवीनें कित्येक

१ रतिकालीं वीतवसनाही स्त्री जशी प्रिय असते परंतु ती अलंकृत असूनही जर मुग्ध असेल तर ज्याप्रमाणें प्रिय असत नाहीं, त्याप्रमाणें कविता साधीभोळी कां असेना, ती जर शुद्ध आणि सरस असेल तर ती रसिकजनांस तल्लीन करून सोडणारच.

अभंग, ओंव्या, आरत्या, पदें, हीं वाळवंटावर उपदेश करितांकरितां रचिलीं आहेत, कित्येक पदें कीर्तनाच्या ऐन रंगांत ठेवून दिलेलीं आहेत, व कांहीं उपदेशपर कविता तर प्राणोत्क्रमण होण्याच्या भयप्रद प्रसंगींही बनविल्या आहेत ! ! नाथाप्रमाणें कवित्वशक्तीची साहजिक भरारी फारच थोड्या कवींच्या ठिकाणीं दृष्टीस पडते. ओढून चंद्रबळ आणणारेच फार.

एकनाथाच्या कवितेचा दुसरा गुण सुबोधत्व व भाषेचा साधेपणा. हे दोन्ही गुण उत्तम प्रकारच्या काव्यांत अवश्य असले पाहिजेत. आणि त्याप्रमाणें ते नाथाच्या कवितेंत सर्व ठिकाणीं आढळतात. एकनाथाच्या कवितेंत कृत्रिमरचना मुदलींच नसून त्याचा कोणताही ग्रंथ पाहिला तरी त्याची भाषा शुद्ध, साधी आणि सोपी अशीच असते. शब्द गोड असून खुबीदार असतात. वर्णन करण्याची हतोटी चांगली असते. व त्यामुळें वाचक जसजसा निरनिराळे प्रसंग वाचीत जातो, तसतशा त्याच्या चित्तवृत्ति विकसित होत जातात. ज्ञानेश्वरी वाचीत असतां अर्थ न समजल्यामुळें व शब्द कठिण असल्यामुळें जसा ग्रंथ मध्येंच टाकावा लागतो तसा प्रकार नाथाचे ग्रंथ वाचीत असतां होत नाहीं.

मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांच्या मागून, लवकरच एकनाथ अवतरला; तथापि ज्ञानेश्वराप्रमाणें एकनाथाच्या कवितेंत जुनाट शब्दांचा भरणा मुदलींच नसल्यामुळें, ह्या पैठणकर कवीची थोरवी बरीच समजली पाहिजे. उत्तम ग्रंथकार हे भाषेचे शिक्षक होत. कारण प्रत्येक काळच्या भाषेचें खरें स्वरूप त्या वेळच्या ग्रंथकारांवर पुष्कळ अंशीं अवलंबून असतें. आणि ते जें जें वळण घालून देतील, त्या त्या वळणावर भाषेची धांव बरीच असते. ही आपली कामगिरी एकनाथानें उत्तम रीतीनें बजाविली असें ह्मणण्यास चिंता नाहीं. कारण आपल्या ग्रंथांतील शुद्ध आणि साध्या रचनेनें एकनाथ जर भाषेला आळा न घालिता, तर तिच्या 'वोखटें,' 'गोमटें,' शब्दांच्या भराऱ्या आजपर्यंतही कदाचित् चालू असत्या.

वरील दोन्ही गोष्टींशिवाय कविसमूहामध्यें एकनाथाला विशेष

मान देण्याचें तिसरें कारण त्याचें प्राचीनत्व. कोणत्याही कवीच्या काव्याविषयीं विचार करावयाचा असल्यास लोकस्थितीकडे व वेळेकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. बापानें लडिवाळपणानें मुलाला खांद्यावर घेतलें असतां मी बापापेक्षां उंच आहें अशी घमेंडी मिरविणें जशी मुलाला योग्य नाहीं, त्याप्रमाणेंच प्राचीन विद्वानांच्या व कवींच्या परिश्रमावर इमारत बांधणारे जे आधुनिक कवि व विद्वान् त्यांची तुलना प्राचीन कवींशीं न करितां समकालीन कवींबरोबर केली असतां साजेल. त्यांतून एकनाथाच्या वेळची लोकस्थिति व त्या काळीं महाराष्ट्रभाषेची होत असलेली पायमल्ली ह्यांचा विचार केला असतां भागवतरामायणासारखे उत्कृष्ट ग्रंथ उठवून देण्याला ह्या कवीची विद्वत्ता, काव्यशक्ति आणि धारिष्ट हीं जबर असलीं पाहिजेत असें सहज कबूल करावें लागतें. आतां अर्वाचीन कवींची तरफदारी करून कित्येक असें ह्मणतील कीं, जुन्या कवींपेक्षां कित्येक अर्वाचीन कवींचीं काव्यें सरस आहेत. तरीही ह्या आक्षेपानें जुन्या कवींची योग्यता कमी न होतां अर्वाचीन कवींनीं आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें केलें इतकें मात्र होईल. कारण कालानुरोधानें विद्येची अभिवृद्धि होणें हें साहजिक आहे. प्रख्यात टीकाकार जॉन्सन् एके ठिकाणीं ह्मणतो:– 'विद्यादेवीचें पूर्वरूप साधेंभोळें असून कालाच्या अनंतत्वांत तिनें अभिवृद्धि व उन्नति व्हावयाचीच, तथापि प्राचीनत्वाचा योग्य मान प्राचीन कवींना मिळणें अगदीं कायदेशीर आहे.'[1]

स्वतंत्र कविता करण्यामध्यें एकनाथाची ज्याप्रमाणें आल्या आहे त्याप्रमाणेंच एका भाषेतील कवितेचा रस दुसऱ्या भाषेंत हुबेहूब उतरून देण्यामध्येंही त्याचा हातखंडा आहे. कित्येक कवि निवळ टीकाकार व अर्थप्रकाशक असल्यामुळें दुसऱ्याच्या कल्पनेवरच त्यांच्या उड्या विशेष असतात, आणि त्यामुळें मर्मज्ञ लोकांच्या दृष्टीनें ते खरे कवि नसून केवळ अर्थवाहक ठरतात. परंतु ए-

१ Johnson's Lives of the Poets Vol. III. Pope, page 131-132.

कनाथाच्या संबंधानें तसा प्रकार मुदलींच नाहीं. त्याची कल्पना-शक्ति अचाट असल्यामुळें स्वतंत्र कविता करण्यांत तो पुरा कसबी होतांच व त्याशिवाय संस्कृत काव्यांतील अर्थ मराठी भाषेंत व्यक्त करून दाखविण्याची करामतही त्याला चांगली साधली होती. ह्मणून खरा कवि व उत्तम टीकाकार हीं दोन्ही विशेषणें ह्या पुरुषास शोभतात.

एकनाथ संस्कृत भाषेंतही चांगलाच वाकबगार होता असें त्याच्या ग्रंथांवरून स्पष्ट दिसतें. महाराष्ट्रभाषेची व त्या भाषेंत कविता करणाऱ्या कवींची इतकी गांजणूक जरी त्या वेळीं होत होती, तथापि अज्ञान लोकांस संस्कृत ग्रंथांतील रहस्य कळवून देण्यासाठींच ह्या कवीचे सतत परिश्रम असल्यामुळें, त्याची जितकी थोरवी वर्णन करावी तितकी थोडीच. ह्या कवीनें आपल्या कवित्वाचा अपव्यय न करितां भागवतासारख्या अतिमहत्वाच्या ग्रंथांतील विषय, प्राकृतजनांस सुगम व्हावा ह्मणून जागोजाग दृष्टांत देऊन सर्व काव्य प्रसादगुणयुक्त करून सोडलें आहे. मूळ अर्थ स्पष्ट करण्याकरितां एक एक श्लोकासाठीं कैक अध्याय खर्चीं घातले आहेत, व सोपे सोपे दाखले गोड गोड शब्दांनीं देऊन वेदांतासारखा कठिण विषयही अत्यंत मनोहर करून ठेविला आहे.

एकनाथाच्या ह्या गुणांविषयीं, वाचकांची खात्री, पुढें योग्यस्थलीं दिलेल्या कित्येक उताऱ्यांवरून होईलच. तथापि इ० स० १५७३ मध्येंही काशीपासून रामेश्वरापर्यंत हा कवि, कवित्वाच्या संबंधानें कसा गाजला हें खालीं दिलेल्या मौजेच्या आख्यायिकेवरून वाचकांच्या चांगलें लक्षांत येणार आहे:—

भागवतासारख्या महत्त्वाच्या ग्रंथांतील विषय, प्राकृत लोकांस समजण्याचें कांहींच साधन नाहीं, हें पाहून एकनाथाला दिलगिरी वाटली व त्यानें त्या ग्रंथांवर टीका लिहिण्याला सुरवात केली. भागवतटीकेचे पहिले दोन अध्याय तयार होत आहेत तोंच एका विद्वान् ब्राह्मणाला ते आवडून त्यानें ते दोन्ही अध्याय उतरून घेतले. व नित्य वाचण्याचा त्यानें क्रम आरंभिला.

लवकरच पुढें तो रसिक विप्र काशियात्रेस गेला. तेथें गेल्यावर

नित्यनेमाप्रमाणें भागीरथीचे घाटावर ते दोन्ही अध्याय मोठ्या उल्हासानें तो ब्राह्मण वाचीत आहे इतक्यांत घाटावरील ब्राह्मणांनीं हा सर्व प्रकार पाहिला. काशीसारख्या क्षेत्रांत घाटावर मोठ्या डौलानें बसून भागवतग्रंथाचें रहस्य मराठी भाषेंत वाचीत आहे, हें पाहून 'ही केवढी अंदाधुंदी आहे' असें ह्मणत सर्व लोक त्या ब्राह्मणाभोंवतीं जमले, व त्यास पकडून तेथील स्वामीकडे घेऊन गेले!

त्या यतीचें त्या वेळेस काशींत मोठेंच बंड असे. त्याच्याइतकी विद्वत्ता, काशीपासून रामेश्वरापर्यंत कोणाच्याच ठिकाणीं नाहीं, अशी त्या वेळेस ख्याति होती. स्वामींनीं ते दोन अध्याय पाहून मनांत विचार केला कीं, संस्कृत ग्रंथांतील रहस्याचा भलताच उपयोग जर हवा त्यास करूं दिला, तर महाराष्ट्रभाषेचें प्राबल्य होऊन गीर्वाण भाषेंतील सर्व ग्रंथांवर टीका होऊं लागतील, ब्राह्मणांचें वर्चस्व कमी होऊन अन्य जात विद्वान् होईल, व शास्त्र्यांचें, पंडितांचें, पुराणिकांचें आणि यतींचें महत्व कमी होऊन, काशीक्षेत्राची आज संस्कृतभाषेच्या संबंधानें जी दिगंतरीं कीर्ति पसरलेली आहे, तीही अस्तास जाईल. असा विचार करून टीकेचा व टीकाकाराचा नाश करण्याविषयीं स्वामिमहाराजांनीं शिष्यवर्गास हुकूम फर्माविला. तथापि मूळग्रंथापासून टीका कितपत सुटलेली आहे तें पहावें, ह्मणून दोन्ही पुस्तकें ताडून पाहिलीं. तेव्हां स्वामी आश्चर्यानें थक्क होऊन गेले! भागवतांतील मूळचा अर्थ अणुमात्र न सोडतां, ग्रंथार्थ इतका व्यक्त करून दाखविला होता, व भाषेचें सौष्ठव आणि सारस्य इतकें मजेदार होतें कीं, टीकेच्या व्यवधानांतून आलेल्या थोडक्याशा प्रभेनेंच यतिवर्य दिपून गेला!!

ही अजब करतबगारी पाहून यतीची टीकाकाराच्या कवित्वाविषयीं खात्री झाली. तथापि ही वेळ अशा ग्रंथकर्त्यास उत्तेजन देण्याची नाहीं, असें समजून "या अधमाधम महाराष्ट्र टीकाकारास एकदम पकडून आणा" अशी स्वामींनीं आज्ञा केली.

काशीक्षेत्रांतून हें धरण्याचें वारंट घेऊन स्वामींचे शिष्य पैठणास आले. नाथमंदिरांतील एकनाथाची कथा, श्रोत्यांची गर्दी, कथेक-

त्याचें वक्तृत्व व त्याची उभय भाषेंतील विद्वत्ता हीं पाहून, काशी-कर शिष्य थक्क होऊन गेले. नंतर स्वामींची आज्ञा न घेतां मराठींत टीका लिहिली येणेंकरून यतींची अप्रतिष्ठा केल्याचा दोष ठेवून, एकदम काशीस निघून येण्याविषयींचें आज्ञापत्र त्यांनीं एकनाथास दाखविलें.

आज्ञापत्र पाहतांच "मला स्वामींची आज्ञा शिरसावंद्य आहे" असें ह्मणून हा कवि काशीस जाण्यास सिद्ध झाला. एकनाथाच्या शत्रूंस, ही त्याची अप्रतिष्ठा पाहून परम समाधान वाटलें. परंतु नाथाच्या पक्षाच्या लोकांस ह्या कवीची ही मानखंडना पाहून महत् दुःख झालें. त्यांनीं पुष्कळ रदबदली केली. परंतु तें कांहींएक न जुमा-नतां यतींच्या शिष्यांनीं एकनाथास थेट काशीपर्यंत खेंचीत नेलें!

एकनाथ काशीस गेला त्या वेळेस त्यानें पहिली पंचाध्यायी तयार केली होती. ती त्यानें आपणाबरोबर घेतली. काशीमध्यें एकनाथाच्या टीकेबद्दल चोहोंकडे गवगवा झाला होता. एकनाथ आल्याबरोबर यतिरायांनीं बिचाऱ्या नाथावर शिव्यांचा यथेच्छ वर्षाव केला. परंतु कांहींएक उत्तर न देतां एकनाथानें शांतपणानें तें सहन केलें.

संन्याशाचा तो थाट, त्याचा अत्यंत क्रोध व तो शिष्यांचा मेळा पाहून एकनाथास वाटलें कीं, यानें चतुर्थाश्रमाची मात्र विटंबना केली व आपण होता तसाच घमंडानंदन राहिला!

मठामध्यें या पैठणकर कवीचा व काशीकर यतींचा वादविवाद सुरू झाला. काशींतील लोकांची स्वामीचे ठिकाणीं पूज्यबुद्धि अस-ल्याकारणानें, एकनाथाची व त्याचे पंचाध्यायीची प्रथम फारच वि-टंबना झाली. परंतु वादविवादांत एकनाथाचें वक्तृत्व, त्याचें वेदां-तविषयक ज्ञान, त्याची सहनशीलता हीं पाहून भोंवतालचे लोकच केवळ साश्चर्य झाले, इतकेंच नाहीं, पण त्या परमहंसासही अत्यंत अचंबा वाटला!

संन्याशास आश्चर्य वाटण्याचें पहिलें कारण हें झालें कीं, चतु-र्थाश्रमी पुरुषाच्या ठिकाणीं जितकी शांति, दया, तितिक्षा, निरि-च्छता, इंद्रियदमन आदिकरून गोष्टी अवश्य पाहिजेत, त्या गोष्टींचा शतांशही आपले आंगीं नसून ह्या सर्व गोष्टी एकनाथाचे ठिकाणीं

त्यानें मूर्तिमंत पाहिल्या. दुसरें कारण हें झालें कीं. संस्कृत ग्रंथावर टीका न करण्याविषयीं कोणतीं साधकबाधक कारणें आहेत तीं सांगण्याविषयीं एकनाथानें विनंति केली असतां, यतीकडून एकनाथाचें किंवा जमलेल्या प्रेक्षकांपैकीं कोणाचेंच समाधान करवलें नाहीं. तिसरें कारण असें झालें कीं, वेदांतविषयांत उभयतांच्या झटापटी चालल्या असतां, सहा शास्त्रांपैकीं वेळीं एकही शास्त्र उपयोगीं न पडतां, एकनाथाच्या कोटीक्रमापुढें संन्याशी फिका पडला. ह्या सर्व गोष्टींमुळें व एकनाथाची पहिली पंचाध्यायी मूळग्रंथाशीं हुबेहूब जुळल्यामुळें सर्व लोक थक्क होऊन गेले.

एकनाथाच्या विद्वत्तेच्या तेजामुळें दिपून जाऊन हा कोणी विलक्षण[1] पुरुष असावा असें त्या यतीस व सर्व लोकांस वाटलें. नंतर राहिलेला सर्व ग्रंथ स्वामींच्या मठांत समाप्त झाल्यावर ज्या ग्रंथाला काशीकरांनीं गंगेंत फेंकून देऊन अत्यंत विटंबना केली होती, त्याच ग्रंथाला त्यांनीं पालखींत मिरवून त्याचें सातसायास केले व एक एक प्रत प्रत्येक काशीकरानें उतरून घेतली.

मराठींत ग्रंथ लिहिणें किती जिवावरचें काम होतें, एकनाथ हा टीका करण्यांत कसा निष्णात होता, व हा पैठणकर कवि कवित्वसंबंधानें काशीक्षेत्रांत कसा गाजला, ह्या सर्व गोष्टींची वरील आख्यायिका साक्ष देत आहे.

एकनाथाचे उपलब्ध ग्रंथ गात आहेत. त्यांचे, धर्म किंवा अध्यात्मविषयक आणि चरित्रविषयक असे दोन भेद करितां येतील.

ते ग्रंथ येणेंप्रमाणें:—

| चरित्रविषयक. | धर्म किंवा अध्यात्मविषयक. |
|---|---|
| | १ एकनाथी भागवत. |
| १ भावार्थरामायण. | २ स्वात्मसुख. |
| २ रुक्मिणीस्वयंवर. | ३ चतुःश्लोकी भागवतटीका. |
| | ४ हस्तामलक. |
| | ५ आनंदलहरी. |

---

१ महीपतीनें असेंही म्हटलें आहे कीं, त्या स्वामीला, एकनाथ हा प्रत्यक्ष भगवान् आहे असा भास झाला !!

२ फेंकून दिलेले ग्रंथ भागीरथीनें वर दान करून झेलिले, असेंही वर्णन आहे.

एकनाथाचे ग्रंथ दोन प्रकारचे ( चरित्रविषयक आणि अध्यात्मविषयक ) असल्याकारणानें दोन मोठे फायदे झाले आहेत. ते हे कीं, ज्यांची मती अध्यात्मविषयक ग्रंथांत शिरण्यासारखी नसेल, व ज्यांस घटपटाच्या खटपटीची उठाठेव करण्याचें उरकत नसेल, अशा वाचकांकरितां चटकदार असे, भावार्थरामायण व रुक्मिणीस्वयंवर हे दोन ग्रंथ एकनाथानें तयार करून ठेविले आहेत. ह्या ग्रंथांतील निरनिराळे प्रसंग कवीनें इतक्या शिताफीनें वर्णिले आहेत कीं, ग्रंथ वाचतांना हर्ष, शोक, आनंद, आश्चर्य, करुणा, प्रसन्नता, गांभीर्य आदिकरून वृत्तींचे ठसे अंतःकरणावर हुबेहूब उमटत जातात. रामायणांत रामचंद्राच्या गुणांविषयीं, स्वभावाविषयीं, व पराक्रमाविषयीं वाचूं लागलें ह्मणजे, राम हा एक नीति, सदाचरण, शांति, वात्सल्य, प्रेम, आनंद, शौर्य ह्यांचा मूर्तिमंत पुतळाच होता असा भास होतो. लक्ष्मण व भरत ह्यांविषयीं दिलेलें वर्णन पाहूं लागलें ह्मणजे, खरी बंधुप्रीति, खरें वात्सल्य, व खरें प्रेम कसें असतें, ह्यांचें हुबेहूब चित्र वाचणाऱ्यांच्या नजरेपुढें उभें रहातें. मंथरा व कैकेयी ह्यांचें परस्पर संभाषण, दशरथाची कैकेयीनें केलेली निर्भर्त्सना, भरताला राज्यपद स्वीकारण्याकरितां सांगितलेला बुद्धिवाद, हे भाग पाहिले ह्मणजे, ह्या दोघी, कौटिल्य, कुबुद्धि, मत्सर, द्वेष इत्यादि दुष्ट गुणांनीं युक्त अशा राक्षसी, मनुष्यरूपानें अवतरल्या होत्या असा भास होऊं लागतो. त्याप्रमाणेंच रामाचें व सीतेचें, आणि स्वयंवरांतील कृष्णाचें व रुक्मिणीचें परस्परांविषयींचें प्रेमयुक्त संभाषण, त्यांचे विरहव्यथेचे हृदयभेदक उद्गार आणि त्यांचें पवित्र आचरण, ह्यांचें कथानक श्रवण केलें ह्मणजे, नीतिसंपन्न व प्रीतिपात्र जोडपीं कशीं सुखी असतात, एकास ठेंच लागली तर दुसऱ्याचे प्राण कसे व्याकुळ होतात, आणि सत्यव्रत पाळण्याकडे त्यांचा किती निर्धार असतो, ह्या गोष्टींचीं हीं कथानकें साक्ष देत असतात.

ह्या कवीची दुसरीही एक विशेष गोष्ट आहे कीं, ज्याप्रमाणें एखादा चतुर वैद्य एखाद्या कष्टसाध्य रोग्यास त्याच्या आवडीचे

व प्रीतीचे पदार्थ खावयास देऊनच बरा करितो, त्याप्रमाणेंच एकनाथानें चरित्रविषयवर्णनांत रूपकालंकारानेंच नीतीचा उपदेश केलेला आहे. आणि त्यामुळें मनोरंजन व सन्मार्गदर्शन हीं दोन्ही साधतात. उदाहरणार्थ रुक्मिणीस्वयंवरांत कृष्णाचें व रुक्मिणीचें लग्न लागण्याचे वेळीं, वरपक्षाकडील मंडळी आली त्या वेळच्या समारंभाचें कवि रूपकवर्णन करितो:—

**ओव्या.**

**भरूनि रजतम औषध । करूनि अग्नियंत्र सन्नद्ध ।**
**कृष्णापुढें अतिविनोद । एक प्रबुद्ध दाविती ॥ ११७ ॥**
**अग्नी लावूनि ठायीं ठायीं । ममता जाळिती हवई ।**
**गगना उसळली पाहीं । धुवोन ठायीं निमाली ॥ ११८ ॥**
**मोहयंत्रीं सुमनमाळा । अग्नीपुष्पें भासती डोळा ।**
**फुलें ह्मणती अबला । पाहतां डोळां तें राख ॥ ११९ ॥**
**अति लोभाची चिचुंदरी । अग्नि लावूनि टाकिली दूरी । पेटल्या पडती जनावरी । उरीं शिरीं जाळीत ॥ १२० ॥ देऊन उपशम अनळा । जाळीती क्रोधाचा भुइनळा । भडभडा निघती ज्वाळा । तोही तत्काळ निमाला ॥ १२१ ॥ हातीं धरूनि कृष्णलीला । जाळिती कामाचा हातनळा । धरूं नेणती त्या बरळा । जिवी जिव्हाळा पोळती ॥ १२२ ॥**

रुक्मि. स्व. अध्या. १५.

काम, क्रोध, लोभ, इत्यादि षड्रिपू जिंकण्याविषयीं कवीचा किती कटाक्ष ! याप्रमाणें सर्व रुक्मिणीस्वयंवर उपमादृष्टांतानें व रूपकानें भरून जाऊन पदोपदीं कवि उपदेश करितो:—"बापहो, अहंकार सोडा. मोहांत गुंतूं नका. मायापटल दूर झुगारून द्या. शुद्ध, आनंदमय चित्स्वरूप ओळखा. द्वैतभाव सोडून द्या. रुक्मिणीचें स्वयंवर ह्मणजे जीव आणि शिव यांचें ऐक्य जाणा—

**ये ग्रंथींचें निरूपण । जिवाशिवा होतसे लग्न ।**
**अर्थ पाहतां सावधान । समाधान सात्विका ॥ ७३ ॥**

रुक्मि. स्व. अ. १८.

एकनाथानें देहावरील गाण्यांतही याप्रमाणेंच रूपक योजून शमदम कसा करावा ह्याविषयीं परिस्फुटता केली आहे. याप्रमाणें एकनाथाच्या चरित्रविषयक ग्रंथांत नीति आणि चित्तवेधकता, हीं दोन्ही साधलीं आहेत. आणि हे ग्रंथ सुबोध असल्याकारणानें लिहितां वाचतां येणाऱ्या स्त्रियांच्या हातीं देण्यासही योग्य आहेत. पौराणिक माहिती मिळून नीतीचा उपदेश या ग्रंथांत पुष्कळ आहे.

नाथाच्या ग्रंथाचा दुसरा भेद जो अध्यात्मविषयक ग्रंथ त्यापासूनही बहुत फायदे आहेत. आजपर्यंत जे जे महान् महान् तत्ववेत्ते, ज्ञानी, साधु, पंडित होऊन गेले, त्यांच्या तर्कशक्तीस पुरून उरलेला, व ज्याचें निरूपण करीत असतां थकून जाऊन "नेति नेति" ह्मणून वेदवाणी बोलली, त्या अनाद्यनंत विश्वव्यापक ईश्वराविषयींचा विचार या अध्यात्मक ग्रंथांत दिलेला आहे. गीर्वाणभाषा न समजल्यामुळें ज्यांस भगवद्गीतेंतील व व्यासवाल्मिकांच्या ग्रंथांतील प्रमेय समजत नाहीं अशा प्राकृतजनांकरितां एकनाथानें भागवतटीका, स्वात्मसुख, आनंदलहरी, इत्यादि ग्रंथ लिहून ठेविले आहेत. ज्याच्या योगानें वाणीची उत्पत्ति, परंतु जें वाणीचेंही वाच्य होत नाहीं अशा, ( केवळ स्वानुभवानें समजूत पडणाऱ्या ) ब्रह्मविषयक विचारांचा पुष्कळ ऊहापोह ह्या कवीनें केलेला आहे.

एकनाथानें निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळे रसही उत्तम प्रकारानें ओतून दिले आहेत. त्याप्रमाणेंच त्याची वर्णन करण्याची शैलीही कांहीं अवर्णनीय आहे. चरित्रविषयक ग्रंथांत चरित्रनायकांचीं रसाळ व चित्तवेधक कथानकें सुरसरीतीनें वर्णिलेलीं असून मानवी वृत्तींचे भिन्नभिन्न देखावे वाचकांचे हृत्पट्टिकेवर हुबेहूब रेखून देण्याचें अमोघ सामर्थ्य कवीच्या ठिकाणीं दिसून येतें. भयप्रद युद्ध-

१ प्राकृत ग्रंथांचा उपयोग व उद्देश काय आहे त्याविषयीं श्रीधरानें यथार्थ लिहिलें आहे. तें असें.—

अबलां न कळे संस्कृत वाणी । जैसें आडांतील गोड पाणी ।
परी तें दोरपात्रावांचोनी । अशक्तजनां केवी निघे ॥ १ ॥
तेची तडागासी येतां त्वरें । तात्काळचि तृषा हरे ।
आबालजनां तारावया ईश्वरें । प्राकृत ग्रंथ निर्मिले ॥ २ ॥

संग्राम, रम्यसुरम्य मुनिआश्रम, राज्याभिषेकाचे प्रसंग, आणि नगर-शोभेचा अप्रतिम देखावा हीं सर्व मनोहर रीतीनें वर्णन केलीं आहेत.

एकनाथाच्या दोन्ही चरित्रविषयक ग्रंथांत करुण आणि वीर हे रस मुख्यत्वेंकरून साधिलेले आहेत. त्यांत भावार्थरामायणांत वीर-रस तर प्रधान होय.

ह्या रसांच्या अंगभूत शृंगार, रौद्र, भयानक आणि हास्य हेही कोठें कोठें साधले आहेत.

सीताशुद्धि करून मारुती परत आल्यावर सर्व वानरांनीं मिळून सुग्रीवाच्या बागेंत मधुपानाचा तडाका सुरू केला. त्या वेळीं कपि-समुदायानें त्या ठिकाणीं ज्या नानाविध चेष्टा आणि क्रीडा केल्या, त्या क्रीडांचें आणि चेष्टांचें वर्णन हास्यरसभरित केलेलें आहे.

कपींद्र हनुमान सीताशोधार्थ लंकेमध्यें अदृश्यरूपानें फिरत अ-सतां, स्त्रीपुरुषांच्या एकांतविचेष्टांचे जे जे प्रकार मारुतीच्या दृष्टीस पडले, त्यांचें वर्णन फार स्पष्ट रीतीनेंच कवीनें दिलेलें आहे. हा प्रकार अंमळ अनुचित झाला आहे, असें ह्मटल्याशिवाय आमच्यानें रहावत नाहीं. ग्राम्यशब्दांचा प्रयोग कोठें कोठें केलेला असल्यामुळें, त्या संबंधानें अंमळ दोष तर खराच.

वर सांगितलेल्या ग्राम्यशब्दांच्या उपयोगाखेरीज एकनाथाच्या कवितेंत दुसरा दोष आढळत नाहीं.

एकनाथाच्या धर्मविषयक ग्रंथांतील विषय सुद्धां मनांत भरण्या-सारखा आहे. निरनिराळे आश्रम कोणते, त्यांचीं लक्षणें कशीं अ-सावींत, खरा संन्यास कोणता, षड्रिपु कसे जिंकावे, शमदमादि दे-वता कशा दक्ष ठेवाव्या, मनुष्यांनीं खरें प्रमेय समजून घेऊन कसें आचरण ठेवावें ह्या सर्व गोष्टींचा विचार उदात्त व गंभीर कवितेंत स्पष्ट रीतीनें सांगितला आहे.

भागवतांत नीतिपर व बोधपर विचारांचा चांगला ऊहापोह के-लेला आहे. द्वैतभाव मानण्यास कोणत्या कोणत्या अडचणी आहेत, चित्तशुद्धि होण्याकरितां कर्ममार्गाचें कसें अवलंबन केलें पाहिजे, ब्रह्म ( मायोपाधीनें ) जगत्‌रूपानें कसें भासावयास लागलें, इत्यादि

अति महत्त्वाच्या गोष्टी उपमादि अर्थालंकार योजून स्पष्ट करून दाखविल्या आहेत; व तेणेंकरून सर्व अध्यात्मक ग्रंथ, शांतिरसानें थबथबून गेला आहे.

एकनाथाच्या अभंगांमध्यें सुद्धां धर्माविषयीं व नीतीविषयीं फारच उत्तम प्रकारचें विवेचन केलें आहे. ते अभंग व तत्संबंधी नाथाचे सर्व विचार, या निबंधांत मधून मधून दिले आहेत.

एकनाथाच्या ग्रंथांत कोणकोणते गुणदोष आहेत ते सांगून त्याच्या ग्रंथांपासून होणारे नफे, ग्रंथांचे प्रकार व कवितेंत साधलेले नानाविध रस आणि अलंकार ह्यांचा सामान्येंकरून विचार झाला. आतां पुढील दोन्ही भागांत एकनाथाच्या ग्रंथांतील उत्कृष्ट स्थलें दिलीं आहेत, त्यांवरून आमच्या लेखाची सत्यता वाचकांच्या लक्षांत येऊन ह्या कवीची योग्यता किती मोठी आहे तेंही सहज समजून येणार आहे.

---

# भाग दुसरा.

## चरित्रविषयक ग्रंथांतील स्थलें.

### [1]मार्मिकः को मरंदानामंतरेण मधुव्रतम् ।

भावार्थरामायण.—हा ग्रंथ वाल्मिकीरामायणावर टीका होय. ह्या ग्रंथाचा आकार वेब्स्टर साहेबांच्या कोशाप्रमाणें मोठा आहे. ह्यांत ३९३२९ ओव्या आहेत. एकनाथानें रचलेल्या ग्रंथांपैकीं भावार्थरामायण हा त्याचा शेवटचा ग्रंथ आहे ह्या ग्रंथाच्या संबंधानें एक चमत्कारिक आख्यायिका[2] आहे. ती अशी:—

एकनाथाजवळ गावबा या नांवाचा कोणीएक गृहस्थ होता. गावबा ह्या लहानपणीं अत्यंत मंद व मूर्ख असून त्याला बोलतांही

---

१ भ्रमराशिवाय मकरंदाचा रसज्ञ दुसरा कोण असणार ? त्याप्रमाणें खऱ्या रसिकांशिवाय शब्दालंकाराच्या बाह्यसौंदर्यावर भुलून जाणाऱ्यांस प्राचीन कवितारसाची काय गोडी ? व त्यांनीं शुद्ध वाग्वधूचें काय चीज करावयाचें आहे ?

२ भक्तलीलामृत अ. २४ ओ. २७—८२.

येत नव्हतें. परंतु पुढें एकनाथाच्या सहवासानें व त्याच्या प्रसादाच्या योगानें गावबास चांगलें बोलतां येऊं लागलें व तो एकनाथाच्या बरोबरीनें कविताही करूं लागला.

एकनाथाला श्रीरामचंद्रजींची प्रेरणा होऊन त्यानें भावार्थरामायण रचण्यास सुरवात केली. युद्धकांडाचे ४४ अध्याय झाल्यावर एकनाथाच्या मरणाचा समय येऊन ठेपला. तेव्हां 'माझ्या मागें गावबा ग्रंथ लिहून समाप्त करील' असें आपल्या अनुयायांस एकनाथानें सांगितलें व गावबाच्या मस्तकीं हात ठेविला. पुढें एकनाथ समाधिस्थ झाल्यावर नाथाच्या आज्ञेप्रमाणें गावबानें रामायण ग्रंथ शेवटास नेला.

ह्या वरील कथानकावरून भावार्थरामायण हा ग्रंथ दोघां सत्पुरुषांनीं रचिला असें सिद्ध होतें. आणि ह्याला आणखीही प्रमाणें आहेत. युद्धकांडाच्या पूर्वी, प्रत्येक अध्याय संपण्याच्या वेळीं स्वामीजनार्दनाच्या स्तुतिसंबंधानें जितक्या ओव्या घातलेल्या आढळतात, तितक्या ओव्या युद्धकांडांतील ४४ व्या अध्यायापुढें आढळत नाहींत.

दुसरें प्रमाण असें कीं, युद्धकांडाचे शेवटीं गावबानेंच या संबंधाचा उल्लेख केलेला आहे:—

**ओव्या.**

**माझि मिरासी मूर्खपण । नेणे पदबंध व्याख्यान । माथां हात ठेवोनि जनार्दन । वदवी रामायण निजसत्ता ॥ ६९ ॥ जनार्दनाची कृपा ऐसी । मूर्खा हातीं रामायणासी । वदविलें रामकथेसी । कृपा ऐसी संताची ॥ ७० ॥ सद्गुरुची कृपा घडे । तें पांगूळ पर्वत चढे । येकनाथें तेणें पाडे । केलें रोकडे मजसरतें ॥ ७१ ॥**

युद्धकांड, अ० ९२

वरील ओव्यांवरून व विशेषेंकरून शेवटील चरणावरून गावबानेंच ग्रंथ समाप्त केला हें स्पष्ट दिसतें. वरील वेंचांत 'जनार्दन' या

शब्दाचा उपयोग फक्त गुरुपरंपरेनेंच केलेला आहे. रामायण ग्रंथ जरी दोघांनीं लिहिलेला आहे, तथापि गावबा, हा काव्यरचनेंत प्रतिएकनाथच होता, असें ग्रंथरचनेवरून स्पष्ट दिसतें. दोघांची वर्णन करण्याची शैली अगदीं बेमालूम आहे.

रामायणाचें संविधानक अगदीं प्रसिद्ध असून एकनाथानें त्यांत फेरफार केलेला नाहीं; ह्याकरितां निराळें संविधानक देऊन जागा न आडवितां संविधानकाला अनुसरूनच पुढील नानाविध रसांचीं उत्कृष्ट उदाहरणें दिलीं आहेत; त्यावरून कथाभाग, वाचकांचे लक्षांत सहज येणारा आहे. पुढील वहुतेक वेंचे खुद्द एकनाथकृत रामायणांतीलच आहेत:—

राजा दशरथ कौसल्येचें दोहदलक्षण विचारीत असतां, तिला अकस्मात् आवेश येऊन नेत्र आरक्त झाले, भृकुटी वर चढल्या, अंगांतील कंचुकी ताडकन् फाटली, व भिल्लिणीप्रमाणें काचा मारून क्रोधाविष्ट होत्साती वर उठून उच्च स्वरानें ह्मणते:—

* * * **येरी ह्मणे दे धनुष्यबाण । करूं लंकेचें निर्वाण । मारूं दारुण राक्षसां ॥ १० ॥ केउता गेलारे हनुमंत । अंगद सुग्रीव जांबुवंत । अजूनि रावणाची मात । जगाआंत उरलीसे ॥ ११ ॥ बाण घेवोनी स्वांगें । छेदूं कुंभकर्णाचें टांगें । भेदूं रावणाचीं सर्वांगें । भिडतां मागें मी न सरें ॥ १५ ॥ केउते गेले रजुत्पती । लंका उलथारे हातोहातीं । पाडा पाडा चारी भिंती । दुर्ग किती आह्मांसी ॥ १७ ॥ राक्षसांच्या शिरकमळीं । लंकेपुढें चेंडुफळी । राक्षसरुधिराच्या कल्लोळीं । तृप्ती कंकाळीं करूं आजी ॥ १८ ॥**

बालकांड, अ० ५

---

१ कैलासवासी परशुरामपंत गोडवोले ह्यांचाही अभिप्राय असाच आहे. पुणें येथील सापकरांचे छापखान्यांत छापलेला भावार्थरामायण ग्रंथ, ह्याच विद्वान् पुरुषाच्या साह्यानें शुद्ध केला असून त्यांनीं आपलें मत शेवटील स्वरचित ओव्यांत दिलेलें आहे:—जरी पात्र पालटलें । तरी न्यूनत्व नाहीं आलें । स्वर्णपात्रीं कीं पर्णपुटीं ठेविलें । अमृतस्वादा भेद न पडे ॥ ९ ॥

किती ही वीरश्रीची उक्ति कवीनें कौसल्येच्या मुखांत घातली आहे ! !

रामजन्माचे वेळीं लंकेमध्यें काय अपशकून झाले पहाः—

**श्रीराम जन्मला अयोध्यापुरीं । तंव वीज पडे लंकेवरी ।**
**भूस्फोटन नगरद्वारीं । विघ्नें दुःखकारी उपजती ॥ ५४ ॥**
**रावण जंव भद्रीं चढे । तंव मुकुट पायांवरी पडे ।**
**वायुघातें छत्र पडे मोडे । सभेचें उडे सौभाग्य ॥ ५५ ॥**
**कुंभकर्णाच्या घरावरी । दिवाभीत घूं घूं करी ।**
**इंद्रजीत आरशाभीतरीं । देखे अशीर शरीर ॥ ५६ ॥**
**मंदोदरीची गळसरी । तुटोनी पडे आगीभीतरीं ।**
**तों ते काढी जंव सुंदरी । तंव भस्म करी हुताशन॥५७॥**

बालकांड. अ० ७

वसिष्ठाच्या आज्ञेवरून रामास राज्याभिषेक होणार, ह्मणून नागरिकजनांनीं आनंदानें गुढ्या तोरणें उभारलीं, सर्व रस्ते चित्रविचित्र रांगोळ्यांनीं सुशोभित केले, व सर्व शहरास आनंदप्रदर्शक शोभा आणिली. त्याचें कवि सुरस रीतीनें वर्णन करितोः—

**वैकुंठींची पूर्ण प्रतिभा । राजमंदिरा आणिली शोभा । चैतन्यतेजें मिरवे सभा । लाजे उभा कैलासू ॥ ५८ ॥ राजमंदिरीं अगाध थोरी । ध्वजा पताका प्रासादशिरीं । महोत्साह घरोघरीं । द्वारोद्वारीं रत्नदीप ॥ ५९ ॥ राजांगणीं वाडेंकोडें । कुंकुमचंदनाचे सडे । नाना रंगमाळा चोहोंकडे । लाजे तयापुढें वसंतू ॥ ६० ॥ राजसभा शोभायमान । शोभेसी नंदनवन शरण । लोटांगणीं ये चित्ररथवन । विराजमान श्रीरामें ॥ ६१ ॥ दासदासी नगरजन । राजे सेना प्रजा प्रधान । वस्त्रीं भूषणीं शोभायमान । वैकुंठभुवन समशोभा ॥ ६२ ॥ कस्तूरीचंदन-**

**कर्दमाक्त । मार्ग शिंपिला सुवासीत । वासें वसंत होतसे मूर्छित । श्रीरघुनाथ निजशोभा ॥ ६३ ॥ मखरें शोभती कुसरीं । मुक्ताफळाचिया हारी । सुमनमाळा चूतांकुरीं । द्वारोद्वारीं तोरणें ॥ ६४ ॥**

अयोध्याकांड, अ० २

ह्या वरील प्रसंगवर्णनावरून शोभावर्णनाची कवीची हतोटी कोणास पसंत पडणार नाहीं बरें !

वीररस हा एकनाथानें दोन्ही चरित्रविषयक ग्रंथांत साधला आहे. रामायणांतील युद्धकांडांत तर तो प्रधानच आहे. सुबाहु आणि मारीच ह्यांच्या बरोबर झालेल्या रामाच्या भयंकर युद्धसंग्रामाचें कवि वर्णन करितो:—

**आतां संग्राम करूं सुदृढ । घेऊं ताटिकेचा सूड । ह्मणोनि असुर पडिपाड । गगनीं गडबड गर्जत ॥ ९१ ॥ वर्षती रुधिराचिया धारा । भयें भेडसावीत द्विजवरां । सांभाळीं ह्मणत रघुवीरा । आला सामोरा सुबाहु ॥ ९२ ॥**

त्या वेळीं आश्रमस्थ मुनिवर्यांची काय त्रेधा उडाली पहा !

**ऐकतां राक्षसआरोळी । भयें द्विज पडिले भूतळीं । येकाच्या बैसल्या दांतखिळी । येक ते चळचळी कांपत ॥ ९५ ॥ येकाचीं धोत्रें गळती । कैक ते धोत्रावरी मूतती । कैकां अधोवात सरती । कांहीं करिती महाशब्द ॥ ९६ ॥ येक आरडती ओरडती । येक दीर्घस्वरें रडती । येक उघडे पडती । येक चरफडती अति धाकें ॥ ९७ ॥ येकाचे खुटखुटती दांत । येकाचे फुटले ओंठ । येकाचें भयें फुगलें पोट । अति संकट ब्राह्मणां ॥ ९८ ॥**

राक्षसांनीं काय अनर्थ मांडला तो पहा !

तंव समुदायें निशाचर। करीत आले हाहाकार। विक्राळ दुर्मद अति दुर्धर। भयंकर संग्रामीं ॥ १०० ॥ महाशस्त्रांचा लखलखाट। थोर खड्गांचा खणखणाट। बाण सुटती सणसणाट। घाय उद्भट हाणिती ॥ १०२ ॥ रामें सोडिला बाण। सकळ शस्त्रें केलीं चूर्ण। तिलप्राय केलें वोढण। बळसंपन्न रघुवीरें ॥ १०४ ॥ निवारावया रामबाण। शस्त्रें सोडितां होती चूर्ण। वीर खोंचले दारुण। सुबाहु पूर्ण क्षोभला ॥ १०५ ॥ मग हातीं वसवोनि गदा। सुबाहु धाविन्नला मल्लयुद्धा। तंव श्रीराम नित्य सावधा। राक्षसद्वंद्वा तें कळलें ॥ १०६ ॥ सुबाहुची गदा केली पीठ। मारीचाचा मुद्गल केला कूट। शूळ त्रिशूळ अति तिखट। ते करि सपाट श्रीराम ॥ १०७ ॥ पिसारा लागला ब्रह्मांडीं। तेणें त्यासि आलि भोंवंडी। हातपाया वळली मुरकुंडी। सुटल्या तोंडीं रुधिरधारा ॥ १०९ ॥ बाण पिसारियाचा पवन। मारीचास उडवी जैसें तृण। वाहटुळीमाजी भोंवे पान। तेंवि परिभ्रमण आकाशीं ॥ ११० ॥

भावार्थरामायणांत पहिल्यापासून शेवटपर्यंत जागजागीं रामाच्या शौर्याचें व पराक्रमाचेंच वर्णन असल्यामुळें, एकनाथाचा हा ग्रंथ प्राय: वीररसमय आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्यावरील रसाच्या बरोबरीनेंच दुसरा एक रस या कवीनें जागजागीं साधिला आहे. तो कोणता ह्मणाल तर करुणरस होय.

दशरथाचा पुत्रवियोगानें झालेला शोक व त्याचा दारुण परिणाम, भरतानें भ्रातृवियोगामुळें केलेला आक्रांत, रामास गहिंवर येऊन त्यानें

सीतेसाठीं केलेला वनांतील सकरुण विलाप, आणि सीतेचे पतिविरहाचे दुःखोद्गार, हीं सर्व कवीनें फारच चित्तवेधक रीतीनें वर्णन केलीं आहेत. हा करुणरस किती उत्तम रीतीनें साधलेला आहे, तें पुढें दिलेल्या संविधानकांतील उत्कृष्ट स्थलांवरून वाचकांच्या लक्षांत येईलच.

स्वरूपसौंदर्यवर्णनाचा मासलाही या कवीनें जागोजाग दाखविला आहे.

जिच्या अनुपम्य लावण्यास भुलून देवाधिदेव अमरपतीनें सुद्धां अधरामृतप्राशनासाठीं व रतिसुखाकरितां स्वर्गाहून उडी घातली, त्या अहिल्येच्या सौंदर्याचें कवि वर्णन करितोः—

**त्रैलोक्यींचें बरवेंपण। ब्रह्मयानें येकवटोनी आपण। स्वयें कन्या केली निर्माण। अहिल्या जाण तीस नांव ॥ २४ ॥ शरीर अत्यंत सुकुमार। खुपों शकती चंद्रकर। पद्मग पद्मिणी तीपुढें निबर। निजांगें अरुवार नभापरिस ॥ २५ ॥ तिचें होतांची स्पर्शन। मनादि इंद्रियां गुदगुल्या पूर्ण। फिकें आमृताचें गोडपण। तिचें बरवेंपण देखोनी ॥ २६॥ देखोनी तीचिया मुखासी। अत्यंत सुख डोळयांसीं। ते मुखीं झाले क्षेत्र संन्याशी। आन पहावयासी नावडे॥ २७॥ अत्यंत सौंदर्याची शोभा। चंद्र लोपे अंगप्रभा। देखोनि लावण्याचा गाभा। विवेकाचा उभा प्राण जाय॥ २८॥ तिसीं होतां डोळेभेटी। धैर्याची विरे गांठी। बरवेपणें अत्यंत लाठी। देखिलया दृष्टी उपडेना॥ २९ ॥**

बालकांड. अ० १४

किती मार्मिक वर्णन हें! आमचे कवि स्वभावसिद्ध वैराग्यशील असूनही प्रणयीजनांच्या अत्यंत गूढ हृद्गतांचे ते पूर्ण परीक्षक होते असें कोणीही कबूल करील.

सौंदर्यवर्णनाचें दुसरें उदाहरण पहा.—

जनकाचे येथें स्वयंवराकरितां अनेक राजे येऊन सभामंडप भरून गेला आहे, प्रचंड चाप पाहून प्रेक्षकांची छाती दडपून गेली आहे, इतक्यांत अलंकृत गजारूढ होऊन सख्यांसहवर्तमान सीता सभेंत आली. तिच्या स्वरूपाचें कवि वर्णन देतोः—

( सीतेच्या मुखास चंद्राची उपमा द्यावी तर )—

**चंद्र पौर्णिमेसीच पूर्ण। मुखचंद्र तो संपूर्ण। चंद्रा राहूचें पूर्वी ग्रहण। येथें नित्यग्रहण श्रीरामीं॥ १६॥ चंद्रबिंबास कळंक। मुखचंद्र निष्कळंक। देखतां सीतेचें श्रीमुख। होती निर्दुःख भावार्थी॥ १७॥**

( बरें, घटकाभर चंद्राची उपमा दिलीच तर तारांगण कोणतें ह्मणाल तर पहा )—

**चंद्रीं नक्षत्रे पुढें मागें। तैसीं तानवडें मोतिलगें। कुंकुमसुरंगरामरंगें। तोचि निजांगें मळवट॥ १८॥ चंद्रबिंबीं काळिमेचा काट। तैसा कस्तूरीचा मळवट। मुखचंद्रीं मिरवे चोखट। त्यावरी बोट कुंकुमाचें॥ २४॥ श्रीरामरंग अतिसुरंग। तेणें रंगें रंगलें कुंकुम चांग। अहेवपण तेणें अभंग। निडळींचें अंग शोभवी शोभा॥ २५॥ चंद्र सदा क्षयरोगी। तेणें व्हावया नित्य निरोगी। जडला जानकीच्या अंगीं। जाला सवेगीं अर्धचंद्र॥ २६॥**

ह्या स्थलावरून उपमादि अर्थालंकार किती उत्कृष्ट रीतीनें कवीनें साधिले आहेत हें वाचकांच्या लक्षांत सहज येईल.

रामाच्या राज्याभिषेकाची तयारी, शहरांतील शोभा, व राज्याभिषेकामुळें लोकांना झालेला अत्यानंद हीं पाहून घाबऱ्या घाबऱ्या मंथरा कैकेयीचे महालांत येते, व तिला कठोरभाषणांनीं टोंचून तिची निर्भर्त्सना करितेः—

* * * * * *

**उठ मूर्खे काय निजशी। सूख मानिशी तें दुःख॥ ५०॥ रामराज्याचें मानिसी सुख। गुढ्यातोरणें**

**अतिहरिख। तेंचि तुज होय महादुःख। परि तूं मूर्ख नेणसी ॥ ५१ ॥ मी रायाची पढियंती। या गर्वें तुज पडिली भ्रांती। सौभाग्य गेलें कौसल्येप्रती। तें तूं निश्चिती नेणसी ॥ ५२ ॥ राजा दशरथ आपण। तुज छळितो संपूर्ण। याचें तूं नेणसी लक्षण। पढियंती पूर्ण अतिगर्वी ॥ ६० ॥ तूं गर्वित जें राज्यवैभवेंसी। तें राज्य राजा देतो श्रीरामासी। वैभव गेलें कौसल्येपासीं। तूं नेणसी मूर्खत्वें ॥ ६१ ॥**

अयोध्याकांड. अ० ३

मंथरेच्या मुखांत घातलेल्या ह्या वरील उक्तीवरून कवि मानवी स्वभावाचा पूर्ण परीक्षक होता असें स्पष्ट दिसतें. त्याप्रमाणेंच कोणत्या पात्राचें भाषण कसें असावें, हें तो पूर्णपणें जाणत होता हेंही सिद्ध होतें.

रतिसंभोगाच्या इच्छेनें राजा दशरथ कैकयीच्या महालांत येऊन पाहतो तों ती जमिनीवर गडबडां लोळते आहे, अंगावरील दागिने फेंकून दिले आहेत, वस्त्राच्या फाडून चिंध्या केल्या आहेत, व केश तोडून डोळे रडून रडून मुठीसारखे केले आहेत, हा प्रकार पाहून तिची समजूत करण्याकरितां दशरथ पुढें होतो आणि ह्मणतो:—

**ज्यासी ह्मणसी करा समर्थ। गजांत लक्ष्मी देईन तेथ । करा ह्मणसी बंदनिर्मुक्त । त्या निर्मुक्त करीन मी ॥९॥ मी असतां शिरावरी। त्वां कां तोडिली गळसरी। भूमिशयन प्रेताच्या परी। अशुभकारी हें चिन्ह ॥ १० ॥**

कैकयीशीं लाडीगोडी लावणाऱ्या दशरथाची काय दुर्दशा झाली पहाः—

**तिशीं लावूं जातां हाता। तिणें झिड्काडिलें नृ-**

पनाथा । तिचें मुख पाहूं जातां । मुख सर्वथा दावीना ॥ ११ ॥ प्रिया पाहों नेदी वदन । ह्मणोनि रायासी आलें रूदन । धांवोनि धरिले तिचे चरण । प्रिये तुजवीण मी परदेशी ॥१२॥ येरी आसुंडिले पाय । ऊठ येथोनी परता जाय। मुख दाखवितोसि काय । निर्लज्ज पाहें तूं एक ॥ १ ॥ दोघी स्त्रियांचा पती तो शठ । तूं तिघींचा अति पापिष्ठ । माझा अपमान करोनी स्पष्ट । राज्यपट कौसल्येसी ॥ १९ ॥

रामाला वनवासास पाठवून आपलें वचन पूर्ण करण्यास कांकूं करतो, असें पाहून कैकयी ह्मणते:—

नपूंसक तूं सूर्यवंशीं । राम न धाडवे वनवासासीं । शेखीं स्त्रियांच्या पायां लागसी । निःसंग होसी तूं एक ॥ ९४ ॥ अती दीनहीन तूं होसी। लाज लाविली सूर्यवंशासी । बोलिला बोल पैं सांडिशी। कृपण होसी नृपनाथा ॥ ११६ ॥ पायां पडिलियासाठीं।मी न सोडी वरद गोष्टी। देणें नाहीं तुझे पोटीं । महाहट्टी होसि राया ॥ ११७॥ तूं तव न देसि वरदान। मज ह्मणसी महाविघ्न । तरि मी आपुला देईन प्राण । सुख संपूर्ण हो तुह्मां ॥ ११८ ॥

अयोध्याकांड. अ० ५

वा: !! स्वभाववर्णनाची कोण शैली ! हा वरील चुटका, ह्मणजे बेफाम व शिरजोर स्त्रिया, सर्वथैव पूज्य पतीची कितपत पर्वा बाळगतात ह्याचें दर्शक होय. त्याप्रमाणें दोन किंवा अधिक बायकांच्या दादल्याची किती फटफजीती असते, सवतीमत्सर कसा

असतो, व विषयासक्त आणि स्त्रैण पुरुष स्त्रियांपुढें कसा बिल्ली होऊन जातो, ह्या गोष्टी वरील उताऱ्यावरुन स्पष्ट होतात.

रामाला वनवासास पाठविलें असतां पुढें होणाऱ्या वियोगदुःखाची कल्पना मनांत येऊन सद्गदित अंतःकरणानें हात जोडून राजा विनवणी करितोः—

सुंदर सुकुमार सुखैकघन। श्रीराम हा राजीवनयन। त्यासि चरणचाली गमन। दुर्धर वन केंवि कंठे ॥ १०४ ॥ सुवासवासें श्रीरघुवीर। त्यासि परिधान वल्कलांबर। शीतउष्ण अति दुर्धर। श्रीरामचंद्र केंवि साहे ॥ १०५ ॥ मृदु अरुवार सुख सेजेसी। सुमनें खुपती श्रीरामासी। तृणपर्ण शयन त्यासी। कैसेनि सोसि श्रीरामा ॥ १०६ ॥ पंचामृत अति चोखटें। सेवितां श्रीरामाचें मन विटे। त्यासी तिखट अंबट तुरटें। फळें मुळें कडवटें केंवि खाये ॥ १०७ ॥ श्रीरामाचें वनप्रयाण। त्यासांगातें जाईल लक्ष्मण। त्यासवें जाईल माझा प्राण। सत्य जाण कैकयी ॥ ११० ॥ दुःखें कौसल्या त्यजील प्राण। सुमित्रा मरेल सत्य जाण। येव्हढियांचा गेलिया प्राण। सुखसंपन्न तूं होसी ॥ १११ ॥ दुर्धर करोनियां आकांत। राज्यीं स्थापूं पाहसी भरत। येवढा न करी तूं अनर्थ। शरणागत मी तुझा ॥ ११२ ॥ ह्मणोनि चरणीं ठेविला माथा। क्षमा करी मज दशरथा। न मागावी हे वरदकथा। वना रघुनाथा न दवडावें ॥ ११३ ॥ ह्मणोनि घातलें लोटांगण। धरिले मस्तकीं तिचे चरण। तंव

**ते क्षोभली दारुण । ह्मणे शठ नष्टपण कां करिसी ॥ ११४ ॥**

अयोध्याकांड. अ० ४

हें दशरथाचें भाषण हृदयाला द्रव आणणारें आहे. प्रसंगानुरूप होणाऱ्या मनोवृत्तींचें हुबेहूब स्वरूप वाचकांच्या मनावर ठसविण्याची हतोटी या कवीची चांगली आहे.

सहाव्या अध्यायांत, राजाच्या आज्ञेनें रामास घेऊन सुमंत आला असतां 'तूं वनवासास जा' ही आज्ञा करण्याचें जिवावर येऊन, दशरथाला आलेली मूर्च्छा व त्यानें केलेला दारुण शोक, रामानें वनवासास जावें अशाविषयीं कठोरमनाच्या कैकेयीनें सांगितलेला बुद्धिवाद, रामानें केलेलें दशरथाचें शांतवन, हे प्रसंग ह्या महाराष्ट्र-कवीनें इतके हुबेहूब वर्णन केले आहेत, कीं खऱ्या रसिकाला गहिं-वर आल्याशिवाय हें कांड तडीस जातच नाहीं.

राम वनवासास निघाला असतां सीतेचा निरोप घ्यावयाकरितां तिच्या महालांत आला. रामाचा हा अकल्पित बेत पाहून सीतेचें काळीज चर्र् झालें, अंगास कंप सुटला, नेत्र दुखाश्रूंनीं भरून आले, छाती धडधड उडूं लागली, सर्व शरीर आरक्त होऊन गेलें, आणि घर्मबिंदूंची मौक्तिकतुल्य शोभा मुखावर चमकूं लागली. रा-मास राज्याभिषेक न होतां तो आतां वनवासी होणार तेव्हां त्याचे मागें या सुखास व संपत्तीस काय कर्तव्य आहे ? असा विचार म-नांत आणून "मी तुमच्या सुखाची व दुःखाची वांटेकरी आहें, मीही बरोबर येणार" असा आग्रह धरून सीतेनें रामाचे पाय घट्ट धरिले, व जमिनीवर गडबडां लोळूं लागली.

रामानें सीतेला वर उठविलें आणि पोटाशीं धरून तिची पुष्कळ समजूत केली. व्याघ्र, सिंह इत्यादि हिंसक पशूंनीं व्यापलेल्या अशा किर्र झाडींतून वास करणें, ऊन, तहान यांस न जुमानतां वनांत कांटे तुडवीत हिंडणें, हीं सुकुमार आणि सुंदर स्त्रियांस असह्य, अशा-बद्दल सीतेची पुष्कळ खात्री केली. परंतु तें कांहींच न जुमानतां ती गहिंवरून ह्मणतेः—

जवळी असतां रघुटिळक । कंटक होती निःकं-
टक । विष तें होय पीयूष । परम सुख वनवासीं
॥ ३ ॥ तुज सांगातें वनवास । तो मज वैकुंठ-
कैलास । तुज वेगळा संसार वोस । दुःख असो
समज तेव्हां ॥ ४ ॥

कां ह्मणशील तर ऐक:—

पति प्रियेचें निजजीवन । पति प्रियेचें निज-
निधान । पति प्रियेचें निजभूषण । तेणेंवीण
ते अति दीन ॥ ६ ॥ पति प्रियेची निजमूर्ती ।
पति प्रियेची निजात्मगती । पति प्रियेची प-
रम शांति । होय उपपत्ती त्यावीण ॥ ७ ॥ पति
प्रियेचें निजशोभन । पति प्रियेचें गतीगमन ।
पति प्रियेचें प्रेमधन । तेणेंवीण ते अति दीन
॥ ८ ॥ तूं तव माझा प्राणनाथ । तुज वेगळा मज
प्राणांत। माझा परमात्मा रघुनाथ। हृदयस्थ अ-
वधारीं ॥११०॥ जेव्हांचि तुझें वनप्रयाण । तुज
सवें येती माझे प्राण । मागें राहवितां जाण ।
अचुक मरण मज रामा ॥ ११ ॥ ह्मणोनि धरिले
दोन्ही चरण । गहिंवरें गळताती नयन । जालें
पतिपादप्रक्षालन । श्रीराम पूर्ण तुष्टला ॥१३॥

अयोध्याकांड. अ० ६०

खऱ्या पतिव्रतेला वरील विचार किती शोभतात ! ! ज्याच्या जिवावर सर्व सौभाग्याची मदार, जो पति स्त्रियांचें केवळ अधि-दैवत, ज्याची सेवाचाकरी हेंच पतिव्रतेचें कर्तव्य, हीच तीर्थयात्रा, व हाच मोक्ष, अशा ईश्वरतुल्य पतीविषयीं खऱ्या सदाचरणी सा-ध्वीचें प्रेम, व पूज्यबुद्धि हीं किती असतात, हें सीतेच्या वरील उद्गारांवरून कवीनें चांगलें दाखविलें आहे.

एकनाथाच्या ग्रंथांतील निरनिराळ्या रसांपैकीं शोकरसाचीं स्थलें पाहणें असल्यास अयोध्याकांडांतील दहावा अध्याय चाळून पहाण्याविषयीं वाचकांस शिफारस करितों.

सुमंतानें परत आणलेल्या रथांत राम नसून रथ रिकामाच आहे, हें पाहतांक्षणीं सर्व अयोध्येंत एकच कल्होळ माजला. राजवाड्यांतील शोकानें व आक्रोशानें वाडा दणाणून गेला आहे, पुत्रविरहानें दशरथाचा शोकाग्नि एकदम भडकून त्याला वारंवार मूर्च्छा येऊं लागली आहे, राणिवशांत कौसल्यासुमित्रांनीं केश तोडून व डोकीं दणादण आपटून मोठा आकांत मांडिला आहे, व सर्व शहरांत घरोघर रडारड आरडाओरड सुरू होऊन सर्वत्र औदासीन्य आणि हाहा:कार ह्यांचा भयानक देखावा दृष्टीस पडत आहे. ह्या सर्व गोष्टी कवि थोडक्यांत मांडून देतो:—

( हा एक शोकरसाचा मासला आहे. )

**नरनारी आक्रंदत। सुमंत नव्हे हा कुमंत।वना सांडोनि रघुनाथ।आला येथें काळतोंडा॥१३॥ जळो याचें काळें मुख । आला नगरा द्यावया दुःख । निंदिती सकळ लोक सन्मुख । अधोमुख सुमंतु ॥ १५ ॥ रामापासून उफराटा । मी कां आलों करंटा। दुःखें पिटितु ललाटा । धिक् अदृष्टा निर्लज्ज ॥ १७ ॥**

राजा दशरथ वक्षस्थळ ताडन करून ह्मणतो:—

**सांडोनी राजभोग निजकांता । सांडोनियां मातापिता । वन सेऊं गेला संगें रघुनाथा । त्या लक्ष्मणापरता धन्य नाहीं ॥ २५ ॥ धन्य ते सती सीता । धन्य तो लक्ष्मण भ्राता । धन्य जन्म श्रीरघुनाथा । पितृवचनार्था प्रतिपाळी ॥ २६ ॥ त्यांसी कोठें मिळालें अन्न । तिहीं कोठें केलें भो-**

जन । अश्रुधारा गळती नयन । मूर्छापन्न पुनः पुनः ॥ २७ ॥ गळीं अडकला जेंवि मासा । तो जीवें न मरे चरफडी जैसा । दशरथाची तैसी दशा । मोहफांसीं विलपतु ॥ ३९ ॥ काय करूं रे सुमंता । श्रीरामासी न देखतां । जीव जाईल तत्वता । मज अशी अवस्था होतसे ॥ ४२ ॥ श्रीरामासवें गेली गती । श्रीरामासवें गेली चित्तवृत्ति । श्रीरामासवें गेली मती । प्राण रामाप्रती जाऊं पाहे ॥ ४३ ॥ रामरूपीं जडले नयन । रामरूपीं जडलें मन । रामापासीं जातील प्राण । सत्य जाण सुमंता ॥ ४४ ॥

दशरथाची काय अवस्था झाली पहा:—

श्रीरामाचें रूप गुण । आठवितां मूर्छा आली पूर्ण । मूर्छेसवें गेला प्राण । रामस्मरण करितची ॥ ४५ ॥ राम राम करितां स्मरण । स्वयें दशरथें सांडिला प्राण । मन बुद्धि इंद्रियें जाण । रामार्पण तेणें केलीं ॥ ४६ ॥

अयोध्याकांड अ० १०

पुत्रशोकाचें किती द्रव आणणारें वर्णन हें ! ! परिणामही किती दारुण ! वरील उताऱ्यांतील पूर्वार्धात[1] राजनिष्ठ प्रजेचें खरें प्रेम किती मार्मिक रीतीनें कवि दाखवितो !

मागें लिहिल्याप्रमाणें सर्व रामायण वीररसप्रधान असल्याकारणानें या रसाचे जितके मासले आह्मी वाचकांपुढें ठेवूं तितके थोडेच होणार आहेत. राक्षसांचा संबंध पदोपदीं असल्यामुळें या वीररसांत भयानक रसही एकवटून गेला आहे.

---

[1] ओव्या १३, १५, १७.

अरण्यकांडाच्या नवव्या व दहाव्या अध्यायांत तर ह्या दोन्ही रसांचीं स्थलें पुष्कळच आहेत.

खर, दूषण ह्या दैत्यांबरोबर रामाचा भयंकर युद्धसंग्राम झाला. त्याचें वर्णन करीत असतां कवि लिहितोः—

**श्रीराम ह्मणे राक्षसांसी । आह्मी गंगातीरी तापसी । तुह्मीं कां आलेति मरायासी । कोणे तुह्मासी धाडिलें ॥ ३५ ॥**

खराची बहीण शूर्पनखा, हिला विद्रूप करून सोडिली. ह्या गोष्टीस उद्देशून राक्षस उत्तर देतातः—

**अरे तुह्मी दोघेजणीं । विटंबिली खराची भगिनी । तापसी ह्मणोनि करितां ग्लानी । तुह्मांसि कोणी सोडिना ॥ ३६ ॥ तापसी आणि धनुष्यबाण । परस्त्रियेचें करावें विटंबन । धन्य धन्य तें तापसपण । आपणा आपण लाजाना ॥ ३७ ॥ येक ह्मणती शूर्पनखींसी । पाजूं दोघांच्या रुधिरासी । मग भक्षावें मांसासी । ऐसा राक्षसीं विवादू ॥ ३८ ॥ चवदा सहस्र निशाचरा । माजी निधडे वीर बारा । ज्यांचा सुरासुरां दरारा । इंद्र थरथरा ज्यां कांपे ॥ ३९ ॥ जे भ्यासुरत्वें जग दाटित । क्रोधदृष्टि वीर आटित । लोहेसि मांस जे घाटित । अवाळी चाटित रक्तपाना ॥ ८४ ॥ हाकें कांपती लोकालोक । विक्राळ दाढा विकटमुख । जे भयानका भयानक । तिन्ही लोक गिळूं पाहती ॥ ८५ ॥**

रामाचें युद्धकौशल्य पहावें तों:—

केव्हां भात्याचा बाण काढी। केव्हां जोडी केव्हां सोडी। अलक्ष लक्षाची परवडी। रणीं कुरवंडी पाडिली ॥ ६७ ॥ छेदोनियां रथसारथी। रणीं दूषण केला पदाति। कोपें गदा घेवोनि हातीं। श्रीरामाप्रती धाविन्नला ॥ ७५ ॥ दूषणासी करितां रण। रणीं रामाचा घेईन प्राण। सांडवीन वाढिवेचा अभिमान। गदा घेवोन चालिला ॥ ७७ ॥ श्रीराम ह्मणे नांव दूषण। सांगतां न लाजसी आपण। दूषण खरासी भूषण। निंद्य वदन दोघांचें ॥७८॥ धर्में दूषण कर्में दूषण। नामें दूषण कामें दूषण। दूषणासी बळ दूषण। आंगवण तुज कैंची ॥ ७९ ॥ दूषण ह्मणे जल्पसी किती। गदा घेवोनीयां हातीं। पतंग धांवे दीपाप्रति। तैसे गती धांवला॥८०॥

अरण्यकांड अ० ९–१०

वीररसाचा आणखी एक मासला.—

खरराक्षसास, धिक्कारपूर्वक क्रोधानें राम ह्मणतो:—

तुजपासोनि गेली शक्ति। वृथा वाळगसी गदागती। गदेसहित पाडीन क्षिती। तूं पापमूर्ति पापात्मा ॥१४॥ ब्राह्मण भक्षिले बहुत। ब्रह्महत्यांचा दोष अद्भुत। बाणधारा प्रायश्चित्त। मी निश्चित तुज देईन ॥ १५ ॥ ते नकटी तुह्मा सांगातें। तुह्मासि यश कैचें येथें।

---

रामचंद्राच्या युद्धकौशल्याचें हें वर्णन वाचीत असतां, नलोपाख्यानांतील नळाच्या शौर्याचें, व वेणीसंहार नाटकांतील वृषसेनाच्या पराक्रमाचें, स्मरण होतें.

**नकटियें निर्दाळिलें निश्चितें । हें खरातें लक्षेना ॥ १९ ॥ नांवें खर रूपें खर । शस्त्रभार वाहे खर । नकळे बुद्धिचा विचार । ऐसा मूर्ख थोर तूं होसी ॥**

खर प्रत्युत्तर करितोः—

**किती जल्पसी सैरावैरा । बोलों नको श्रीरामचंद्रा । बहु बडबड न साजे वीरा । रण निर्धारा पाहेपां ॥१२२॥ राहे साहे श्रीरघुवीरा । तुवां मारिल्या बहुत धुरा । तुझ्या घेवोनिया रुधिरा । मारिल्या धुरा तर्पीन ॥२३॥ तुझिया रुधिराचे तर्पणें । तृप्त होतील राक्षसगण । गदाघायें घेईन प्राण । सत्यसंपूर्ण पण माझा ॥ २४ ॥ सावध पाहें श्रीरामचंद्रा । येकेचि घायें करीन पुरा । दांत खातसे करकरां। गदा गरगरां भोंवडी॥ २५ ॥ धूम्र निघे नेत्रद्वारा। रागें कांपतु थरथरां । डसों धांवे श्रीरामचंद्रा। कंठीच्या रुधिरा प्राशावया ॥ २६ ॥**

अरण्यकांड अ० ११

रामायणांत वियोगशृंगाराचींही कित्येक स्थलें आहेत. मारीच दैत्याला मारून राम परत आश्रमांत येऊन पहातो तों तेथें सीता नसून आसपास शोधही लागेना. तेव्हां कांहीं तरी विपरित गोष्ट झाली असें समजून त्याचें अंतःकरण शोकाकुल झालें, नेत्र पाण्यानें भरून आले आणि दुःखवेग असह्य होऊन मूर्च्छित होतसाता तो जमिनीवर निचेष्ट पडला. त्या वेळच्या दारुण प्रसंगाचें कवि वर्णन देतो. पुढील स्थल वियोगशृंगाराचें आहेः—

**मूर्छापन्न मूर्छे आंत । हाय हाय सीता ह्मणत । सीताविरहें श्रीरघुनाथ । दुःखाभिभूत अति**

दुःखी ॥८९॥ हाहा सीते हाहा सीते । ह्मणो-
नि पाहे सभोंवतें । न देखोनियां सीतेतें ।
वनीं वनांतरीं परिभ्रमे ॥ ९२ ॥ कोठें अड-
खळे कोठें उडे । कोठें रडे कोठें पडे । सीता-
विरहें झाले वेडे । पाहे चहूंकडे जानकी ॥९३॥
सीता सीता ह्मणोनि देखा । अति आक्रोशें
मारी हाका । लक्ष्मणा तूं माझा सखा । उ-
गाचि तूं कां पाहतोसी ॥ ९४ ॥ पर्वतींचे वृक्ष
हो । तुह्मी दुरी देखतां पहाहो । तरी माझ्या
हृदयींचा संदेहो । निःसंदेहो तुह्मी करा॥१०१॥

सीतेचें स्वरूप कसें आहे ह्मणाल तरः—

आरक्तनेत्र आरक्त अधर । सुंदर सुनासिक
सुकुमार । कटिरत्नाढ्य कटिसूत्र । पीतांबर-
धारी जानकी ॥ १०४ ॥

विरहाग्नीनें होरपळून लक्ष्मणास ह्मणतो—

सीतावियोगें विरह जाण । माझा निघों पाहे
प्राण । सौमित्रा वेगीं रची सरण । अलोट म-
रण मज आलें ॥ २० ॥ ऐसें बोलत बोलतां।
सर्वेचि धांवें ह्मणे सीता । वृक्षासी ह्मणे माझी
कांता । गुल्मलता आलिंगी ॥ २१ ॥ सीता
ह्मणोनियां जाण । श्रीराम चुंबी पाषाण। धां-
वोनि हृदयीं धरी तृण । सीता संपूर्ण हे माझी
॥ २२ ॥ लक्ष्मणासी ह्मणे तूं सीता । तूंचि
माझी निजकांता । ऐशी सीतेची अवस्था ।
श्रीरघुनाथा निजभ्रांतीं ॥ २३ ॥

अरण्यकांड अ० १९

करुणरस किती शिताफीनें उठवून दिला आहे! किती हृदय-शल्य उद्गार! कोण दुःखावेग! हा प्रसंग वाचून आमच्या वाचकांस उत्तररामचरित्रांतील वासंतीजवळ काढिलेल्या रामाच्या हृदयोद्गारांचें स्मरण होणार आहे.

**२ रुक्मिणिस्वयंवर**—आतां एकनाथाच्या ' चरित्रविषयक ग्रंथां'तील दुसरा ग्रंथ जो ' रुक्मिणीस्वयंवर ' त्याजविषयीं विचार करूं.

हा ग्रंथ लहान असून यांतही शृंगार, वीर, करुण, आदिकरून रसांचा परिपाक पूर्णपणें उतरला आहे. ह्या ग्रंथांतील एकंदर ओंव्यांची संख्या १७१० असून एकनाथानें तो मनकर्णिकेचे कांठीं १४९२ त समाप्त केला.

एकनाथानें हा ग्रंथ भागवताच्या दहाव्या स्कंधाच्या आधारानें रचिला आहे. ह्या ग्रंथाचें कथानक असें आहे कीं:—

विदर्भदेशाचा राजा भीमक, यास भीमकी नांवाची अत्यंत सुंदर कन्या होती. कीर्तिनामक ब्राह्मण भीमकराजाजवळ येऊन श्रीकृष्णाच्या सौंदर्याचें, गुणांचें व पराक्रमांचें वर्णन करीत असतां तें श्रवण करून बापाजवळ बसलेली भीमकी कामपीडित होत्साती मूर्च्छित होऊन पडली. श्रीकृष्ण हा योग्य वर आहे असें पाहून व भीमकीची प्रीतिही त्याजवर जडलेली आहे हें जाणून भीमकीचा श्रीकृष्णाशींच विवाह करण्याचा भीमकराजानें व त्याच्या पत्नीनें बेत केला. परंतु ह्या गोष्टीस राजपुत्र रुक्मी प्रतिकूळ होता. त्याचे मनांतून चैद्याधिपति जो शिशुपाल, याला आपली बहीण देण्याचा विचार होता. व त्याप्रमाणें लग्नाचा त्यानें सर्व घाटही जुळवून आणिला. इतक्यांत भीमकीनें आपलें मनोगत कुशलतेनें लिहून त्वरित येण्याविषयीं एक पत्रिका कृष्णाकडे पाठविली. भीमकीवर गुदरलेला आणीबाणीचा प्रसंग, व तिची हृदयभेदक पत्रिका हीं पाहून यादवांसहवर्तमान कृष्ण विदर्भदेशांत आला. भीमकीचा शिशुपालाबरोबर विवाह होणार, इतक्यांत श्रीकृष्ण लग्नमंडपांत येऊन पोहोंचला. कृष्णाच्या देदीप्यमान कांतीनें सभाजन दिपून जाऊन

मूर्च्छित झाला. इतक्या अवकाशांत भीमकी अंबिकापूजनासाठीं गेली होती त्या संधीस कृष्णानें भीमकीस रथांत घालून रथ हांकला. मूर्च्छित झालेली मंडळी सावध होऊन पाहतात तों रुक्मिणीस रथांत घालून कृष्ण नेत आहे. मग मोठ्या त्वेषानें व रागानें कृष्णाची निर्भर्त्सना करीत सर्व मंडळी रथामागून धांवली. कृष्णानें आपला रथ मागें फिरवून जरासंधादिक मंडळीचा यथायोग्य समाचार घेतला ! उभय सैन्यांत भयंकर रणकंदन माजून कृष्णानें शत्रुसैन्याची दाणादाण करून सोडिली, व रुक्म्याला रथाशीं खेंचून बांधिला ! नंतर सर्वत्र शांतता झाल्यावर कृष्णाचा व रुक्मिणीचा यथाविधि मोठ्या समारंभानें विवाह झाला. हें ह्या कथेचें संविधानक होय. ह्या ग्रंथांत उपमा दृष्टांतादि अर्थालंकार फारच चांगले साधिले आहेत.

आतां ह्या ग्रंथांत नानाविध रसांनीं परिपूर्ण अशीं जीं कित्येक उत्कृष्ट स्थलें आहेत तीं देऊं, ह्मणजे त्यांवरून रामायणाप्रमाणें हाही ग्रंथ किती मनोहर आहे, हें वाचकांचे लक्षांत येईल.

स्वरूपवर्णनाचा मासला पहा:—

रुक्मिणीच्या सौंदर्याचें कवि वर्णन करितो:—

### ओंव्या.

**भीमकी कटाक्षाच्या घायीं । मदन पाडिला ठायींच्या ठायीं । तेथें सुरनरांचा पाड काई । निधडा पाही श्रीकृष्ण ॥ २६ ॥ चंद्र क्षीण कृष्णपक्षीं । ह्मणे हा पूर्वील माझा बंधु कीं । ह्मणूनि कळवळली भीमकी । निजमुखीं धरियेला ॥ ९ ॥ चंद्रमंडळा मागें पुढें । जैसे तारांगणाचे वेढे । तैशीं मोतिलग तानवडें । दोहींकडे तळपती ॥१२॥ नभीं इंद्रधनुष्य रेखा। तैसा भांगीं सिंदूर देखा । भुलवावया यदुनायका । मोहनीमुखा पूजियेलें ॥ १९ ॥ भीम-**

कीमुखकमल सुंदर । कृष्णपणें श्रीकृष्ण भ्र-
मर । आमोदभावाचें शेजार । निजमंदिर ह-
रीचें ॥ ६६ ॥

रुक्मि० स्व० अ० ७

किती गोड वर्णन हें. ह्या वर्णनानें, रामायणांतील सीतासौंदर्य-वर्णनावरही कडी केली असें ह्मणण्यास हरकत नाहीं. वीररसाचा मासला पहाणें असल्यास अकराव्या अध्यायांतील जरासंध आणि गद यांनीं परस्परांचा असूयापूर्वक केलेला उपहास वाचण्यासारिखा आहे. ह्यावरून उपमा दृष्टांतादि अर्थालंकार साधण्यांत कवि किती निपुण होता हें सिद्ध होतें. पुढील उताऱ्यावरून वीर-रसाची कल्पना सहज करितां येईल—

सन्मुख देखोनियां गद। हासिन्नला जरासंध।
मजशीं पुरों न शके गोविंद।बुद्धिमंद तूं कैंचा २५

मजबरोबर युद्धसंग्राम करणें किती असंभव्य आहे तें ऐकः—

विपायें जरी ऐसें घडे । जैं अंधारीं सूर्य बुडे ।
उडुगण स्वयें भीति चढे । तैं तुज मज घडे
संग्राम ॥ २६ ॥ मशकाचेनि चरणप्रहारें । म-
हामेरू उभाचि चिरे । इंद्रासि भिडिजे उंदिरें।
तैं तुज मज घडे संग्राम ॥ २७ ॥ नवग्रहांचें
बळ घटासी । परि न भिडवे पाषाणासी ।
तेवीं तूं यादवीं योद्धा होसी । परि मजशीं न
झुंजवे ॥ ३२ ॥ ससा चढोनि सिंहाचे माथां।
जरी नाचवील निजसत्ता । तरी तुज मज स-
मता । युद्धीं सर्वथा घडेना ॥ ३३ ॥ गद नां-
वाचेनि शब्दें । तुझी संग्रह कीजे वैद्यें । पो-
तडा घालोनि काखे खांदे । दारोद्वारीं हिंड-
वीती ॥ ३६ ॥

गद प्रत्युत्तर करितोः—

*    *    * । तूं जरेनें सांधिला सांध । सांधा न बैसवेचि सुबुद्ध । फाड शुद्ध करूं आलों ॥ ३८ ॥ शस्त्र घालीन मी गदू । काढीन अभिमानाचा रेंदु । तोडीन जरामरण कंदू । त्द्दय शुद्ध करीन मी ॥ ३९ ॥ ऐकूनि खवळला मागध । जाहला कवचेंसी सन्नद्ध । किती करिसी अनुवाद । होईं सावध्र चावटा ॥ ४० ॥

रुक्मि० अ० ११.

स्वयंवरांतील निरनिराळे प्रसंग वर्णन करावयाचे वेळीं रूपकादि अर्थालंकार पुष्कळ साधला आहे. ह्याच प्रकार रामायणांतही बराच दृष्टीस पडतो. ह्या निबंधांत मागें एके ठिकाणीं ह्या अलंकाराचीं स्थळें दिलीं आहेतच तेव्हां पुन्हा देण्याची जरूर दिसत नाहीं. १५ व्या अध्यायांत हीं रूपकें पुष्कळ ठिकाणीं दाखविलीं आहेत.

सौंदर्यवर्णनाचें आणखी एक स्थल पहाः—

रुक्मिणीच्या सौंदर्याविषयीं कवि आणखी एके ठिकाणीं लिहितो.—

भिंवईं सुरेख सरळ नासिक । गंडस्थतेज आधिक । नाकीचें मोती जडित माणिक । तेणें श्रीमुख शोभत ॥ ५ ॥ सुरंग तळवे आणि तळहात । अधरबिंब अति आरक्त । बोलीं मधुरता तळपत । तेणें झळकत दंतपंक्ति ॥ ५४ ॥ कटिप्रदेश शोभवी जघन । माज अतिशयेंसी सान । घोटी कलाविया सुलक्षण । बरवेंपण पाउलां ॥ ५५ ॥ नेसली क्षीरोदक पाटोळा । त्यावरी नवरत्नाची मेखळा । सुनीळ कांचोळी

घेल्हाळा । लेइली माथां मोतलग ॥ ५७ ॥
गंगातीरीचीं चक्रवाकें । तैंवि कुचद्वय सुरेखें ।
त्द्दयीं घननीळ झळके । शोभा पदकें दा-
विजे ॥ ५८ ॥

रुक्मि० स्व० अ० १५

एकनाथ मदनपीडित झालेल्या भीमकीची अवस्था हुबेहूब उठ-
वून देतो, ती वाचण्याजोगी आहे. विप्रलंभशृंगाराचें उदाहरणः—

डोळा न लागेची शेजेसी । निद्रेमाजि देखे
श्रीकृष्णासी । तेणें स्वप्न सुषुप्तीसी । जागृतीसी
न आठवे ॥ ६० ॥ अन्न न खावे तत्वता । जे-
वितां देखे कृष्णनाथा । गोडी लागली अनंता ।
न मागे आतां धड गोड ॥ ६१ ॥ करूं जातां
उदकपान । घोटासवें आठवे कृष्ण । विसरली
भूक तहान । लागलें ध्यान हरीचें ॥ ६२ ॥
तोंडीं घातलिया फोडी । घेऊं विसरली ते
गोडी । कृष्णीं लागलिसे गोडी । अनावडी
विषयाची ॥ ६३ ॥ आळविल्या कांहीं नायके ।
थापटिलिया ते न वचके । देह व्यापिलें यदु-
नायकें । शरीरसुखें विसरली ॥ ६४ ॥ पाय
ठेवितां धरणीं । कृष्ण आठवी रुक्मिणी । स-
र्वांगें थरथरोनी । रोमांचित होऊनी ठाके ॥ ६५ ॥

रुक्मि० अ० ५.

मदनाच्या तीक्ष्ण बाणांनीं घायाळ झालेल्या युवतीची अवस्था
किती नाजूक रीतीनें व चातुर्यानें दर्शविली आहे ! ! ह्या वर्णनाव-
रून व त्यांतील डावपेंचांवरून कामदेवानें स्वरहस्याचा जणुं उपदे-
शच कवीस केला होता असें भासतें ! दुसऱ्या पक्षीं भक्तिपर अ-

र्थदृष्टीनें ध्यानयोग व भक्तियोग साहजिक बाणून तादात्म्य व तल्लीन झालेल्या जीवाच्या शुद्ध व पवित्र एकतानतेचें हें एक हुबेहूब चित्र आहे असें भासतें.

वियोगशृंगाररस कोठें कोठें चांगलाच साधला आहे. पुढील स्थल पहाः—

विरहानलानें होरपळलेल्या रुक्मिणीचे हृदयोद्गारः—

**मज नलगे विंझणवारा। तेणें अधिकचि होतो उबारा। प्राण रिघों पाहे पुरा। शारंगधरा वांचोनी॥ ७१॥ आंगीं न लावागे चंदन। तेणें अधिकचि होय दीपन। माझे निघों पहाती प्राण। कृष्णचरण न देखतां॥ ७२॥ साह्य नव्हेचि गे अंबा। विन्मुख जाहली जगदंबा। आतां कसली लग्नशोभा। प्राण उभा सांडीन॥ ७३॥ शिवा भवानी रुद्राणी। कां न पावतीच कोणी। कां विसरली कुळस्वामिणी। चक्रपाणी न पावेची॥ ७४॥**

रुक्मि० अ० ५.

कामीजनांच्या अवस्थेचें किती हुबेहूब चित्र कवीनें रंगविलें आहे! आमच्या वाचकांपैकीं ज्यांनीं शाकुंतल वाचिलें असेल त्यांस वरील वर्णन वाचीत असतां, लतागृहांत कुसुमशय्येवर तळमळत पडलेल्या शकुंतलेची आठवण झाली असेलच! नलविरहानलानें पीडित झालेल्या दमयंतीची अवस्था येथें दिल्यास अप्रासंगिक होणार नाहीं हें सांगणें, नकोच. कारण रुक्मिणीस्वयंवराचें व दमयंतीस्वयंवराचें पुष्कळ सादृश्य आहे. इकडे विदर्भदेशाधिपतीची कन्या केवळ कृष्णाच्या सौंदर्याचें व गुणांचें श्रवण करूनच कामपीडित झाली, तिकडेही विदर्भराजाचीच कन्या नलराजाचे गुणानुवाद श्रवण करूनच मोहित झाली. इकडे रुक्मिणीचें पत्र घेऊन

एका ब्राह्मणानें मध्यस्ती केली, तिकडेही हंसानेंच वकिली पत-करली होती. इकडे शिशुपालासारख्या राजांच्या तोंडांस पानें पुसून श्रीकृष्ण रुक्मिणीस घेऊन गेला. तिकडेही इंद्रासारख्या अम-रपतींस वाटाण्याच्याच अक्षता मिळून दमयंतीनें नळाच्याच ग-ळ्यांत माळ घातली ! इतक्यानेंच केवळ या स्वयंवराचें सादृश्य होत नसून ह्या दोहोंचें सर्वच संविधानक अगदीं एकासारखें एक आहे. असो, दमयंतीच्या विरहव्यथेचें पंडितांनीं दिलेलें वर्णन, वर दिलेल्या रुक्मिणीच्या विरहवर्णनाशीं किती हुबेहूब जुळतें तें पहाः—

श्लोक ( शिखरिणी ).

न रंजे कारंजे निरखुनि फणी ते फणफणी ।
मुदेनें मोदेना नळगुणगणीं जे गुणगुणी ।
न वैसे जे सेजे वरि न परिसे जे शुकगिरा ।
न नाहे मानाहे न धरि ललना हेतु दुसरा ॥ १४७ ॥

नलोपाख्यान.

## भाग तिसरा.

### अध्यात्मविषयक ग्रंथ व धर्मसंबंधी आणि नीतिसंबंधी विचार.

तस्मादनंतमजरं परमाविरासी-
त्तद्ब्रह्म चिंतय किमेभिरसद्विकल्पैः

भर्तृहरि.

चरित्रविषयक ग्रंथांप्रमाणें एकनाथाच्या अध्यात्मविषयक ग्रं-थांत व त्यानें केलेल्या कित्येक अभंगांत कथानकाचे भाग नसून त्या सर्वांत एकसारखाच विषय आहे. धर्म व नीति या संबंधाचे विचार व अद्वैतप्रतिपादन करण्याच्या कोट्या हेच मुख्य विषय त्याच्या सर्व अध्यात्मग्रंथांत व अभंगांत असल्यामुळें पुढें ग्रंथांच्या

अनुक्रमानें निरनिराळीं स्थळें न देतां तीं विषयानुक्रमानेंच दिलीं आहेत व जागोजाग त्याच्या बोधपर अभंगांचे मासलेही दाखविले आहेत.

आतां धर्म या शब्दापासून कोणत्या गोष्टींचा बोध होतो व धर्म व नीति यांचा परस्परांशीं किती निकट संबंध आहे त्याचा विचार करूं.

धर्म हा शब्द जरी व्यापक आहे आणि निरनिराळ्या विषयांच्या संबंधानें त्याचे जरी निरनिराळे अर्थ होतात तथापि त्याचा मुख्य अर्थ ह्मटला ह्मणजे पारलौकिक परिणामाचा विचार हाच होय. आणि प्रस्तुत विषयाच्या संबंधानें धर्म ह्या शब्दाचा तोच अर्थ येथें घेतला पाहिजे. इंद्रियगोचर होणारे जे सृष्टींतील पदार्थ त्या पदार्थांचीच केवळ मीमांसा न करितां अमळ पलीकडे ज्ञानदृष्टि फेंकून जे जे विषय समजतील किंवा समजण्याचा संभव आहे, ते ते विषय युक्तीनें, प्रमाणानें व अनुभवानें समजावून देण्याचा पोक्त विचार ज्या ग्रंथांत केलेला आहे तो धर्मविषयक ग्रंथ होय.

वरील महत्त्वाच्या गोष्टीशिवाय दुसऱ्या एका महत्त्वाच्या गोष्टीचाही ऊहापोह धर्मविषयक ग्रंथांत केलेला असतो. ती गोष्ट नीति. सृष्टींतील पदार्थांमध्यें अत्युत्तम पदार्थ जो मनुष्यप्राणी त्याचा सृष्टिकर्त्याशीं संबंध कोणता [illegible] आहे व तत्संबंधानें त्याचें ( मनुष्याचें ) कर्तव्य [illegible] काय आहे हें स्पष्ट करून देण्याचें काम ज्याप्रमाणें [illegible] धर्माचें आहे, त्याप्रमाणेंच एका मनुष्याची दुसऱ्या मनुष्याच्या संबंधानें वागणूक कशी असावी हें सांगण्याचें कामही धर्माचेंच आहे. हें मनुष्यांचें परस्परांशीं असणारें वर्तन एकसारखेंच नसून जसजसा त्यांचा संबंध असेल, तसतसे त्यांचे वर्तननियम सदसद्विचाराला अनुसरूनच ठरलेले असतात; जसें राजा आणि प्रजा, शेजारीपाजारी, धनी आणि चाकर, पितापुत्र, नवराबायको ह्यांचें परस्परांविषयींचें कर्तव्य अगदीं एकसारखेंच नसून त्यांच्या त्यांच्या विवक्षित संबंधाला अनुसरून असतें. करितां, अन्यायानें दुसऱ्याला उपद्रव न देतां शरीर, संपत्ति आणि शांतता ह्यांचा य-

थान्याय उपभोग मिळावा ह्मणून जें मनुष्यमात्राचें एकमेकांविषयीं वर सांगितलेलें कर्तव्य, तीच नीति होय.

धर्म व नीति ह्यांचा परस्परांशीं याप्रमाणें संबंध असल्यामुळें कोणताही धर्म घेतला तरी त्यांत नीतीचा विचार असतोच. कारण नीतीचा जर विचार त्यांत नसेल व नीतीला सोडून जर तें धर्मविवेचन असेल तर मग तो धर्म नसून अधर्म होय.

प्रस्तुत प्रसंगीं आपल्याला अवांतर धर्माविषयीं विचार कर्तव्य नसून एकनाथाचे धर्मसंबंधीं विचार काय होते तें पहाणें आहे. वैदिकधर्मांतील अनादिकालापासून चालत आलेल्या अद्वैतमताचा एकनाथ हा पूर्ण अनुयायी असल्याकारणानें त्याच्या अध्यात्मिक ग्रंथांत व अभंगांत पुढील गोष्टींचा विचार आहे व धर्म आणि नीतीसंबंधीं मुद्याच्या गोष्टी ह्मटल्या ह्मणजे मुख्यत्वेंकरून ह्याच असतात.—

१ ईश्वर ( किंवा ब्रह्म ). २ तें जाणण्याचा मार्ग. ३ कर्ममार्ग. ( मूर्तिपूजा, यज्ञयाग, जपतप इत्यादि ). ४ बाह्य पवित्रता. ५ अंतःकरणशुद्धि. ६ नामस्मरण. ७ इंद्रियनिग्रह. ८ मनुष्यांचें परस्परांशीं वर्तन. ९ अवांतर गोष्टी.

एकनाथाच्या अध्यात्मविषयक ग्रंथांत 'भागवत' आणि 'स्वात्मसुख' हे दोन ग्रंथ फार महत्वाचे आहेत. भागवत हा ग्रंथ शके १४९५ त कार्तिक शुद्ध पंचमीचे दिवशीं श्रीक्षेत्र काशी येथें यतींच्या मठांत समाप्त झाला. ह्या ग्रंथाचे अध्याय ३१ असून एकंदर ग्रंथ २०,००० आहे. भावार्थरामायणाप्रमाणें हाही ग्रंथ फार मोठा आहे. हा एकनाथाचा ग्रंथ अत्यंत लोकप्रिय असून वेदांतविषयाची ज्याला लजत आहे त्याची पहिली उडी ह्याच ग्रंथावर पडते. कारण तो सुबोध असून विषयविवेचनही त्यांत विस्तारानें केलेलें आहे. प्रख्यात साधु व कवि जो तुकाराम त्याचें प्रेम ह्या ग्रंथावर फार होतें. त्यानें गिरिकंदरीं एकांतांत बसून एकनाथी भागवताचीं कैक पारायणें करावीं अशाविषयीं पुष्कळ उल्लेख आहेत.

स्वात्मसुख हा ग्रंथ जरी लहान आहे तथापि त्यांतही वेदांता-सारखा गहन विषय चांगल्या प्रकारानें समजावून दिला आहे. ह्या ग्रंथांत अद्वैत सिद्ध करण्याच्या कोट्या इतक्या शिताफीनें लढविल्या आहेत कीं, मोरोपंतांची कविता वाचीत असतां पंतांचा कारकुनी बाणा जसा जागोजाग दिसून येतो, त्याप्रमाणेंच आमच्या पैठणकर वेदांत्याच्या कोटिक्रमाचे डावपेंच ह्या ग्रंथांत पुष्कळ ठिकाणीं दिसून येतात व त्यामुळें श्रद्धावान् तत्वेच्छूंचें शंकासमाधान होऊन ते आनंद पावतात.

खुद्द ग्रंथकर्त्यालाही या ग्रंथाची भट्टी चांगली साधली असें वाटून त्यानें त्याविषयीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे; त्याप्रमाणेंच बारा वर्षें गुरुसेवा करून जें कांहीं ब्रह्मरहस्य मला प्राप्त झालें व अमृतानुभव आणि ज्ञानेश्वरी ह्यांतील जो मथितार्थ स्वामिजनार्दनांनीं समजावून दिला तो सर्व या ग्रंथांत मीं प्रगट केला आहे असेंही एकनाथानें एके जागीं ह्मटलें आहे:—

**जें सकळ शास्त्रांचें सार । जें सकळ वेदांचें गर्हिवर । जें सकळ पुराणांचें माहेर । ग्रंथासि आलें ॥ ५१२ ॥ जें सकळ ग्रंथांचें ग्रंथार्थ । जें सकळ दृश्यांचें दृश्यत्व । तो गुरुशिष्याचा गुह्यार्थ । चांवळलों गुज ॥ ५१३ ॥ तें गुज एकाएकपणें । मज दीधलें जनार्दनें । तें निरंतर अनुभवणें । अनुभवियें घेतुका ॥ ५१५ ॥**

स्वात्मसुख.

स्वात्मसुख हा ग्रंथ शुकाष्टकावर टीका आहे ह्मणून जें हिंदुस्थानच्या अर्वाचीन कोशांत लिहिलें आहे तें खरें आहे असें एकनाथाच्याच एका ओंवीवरून सिद्ध होतें. ती ओंवी अशी:—

**तें शुकमुखींचीं गळित फळें। प्राप्तप्रभावबळें । तें गोडीयेची रसाळें। अक्षरें लिहिलीं ॥ ४९६ ॥**

स्वात्मसुख.

( उत्कृष्ट स्थलें )

भगवत्स्वरूपाविषयीं भागवतांत एके ठिकाणीं लिहिलें आहे:—
( कृष्ण उद्धवास ह्मणतात ) :—

**माझें स्वरूप अद्वैत जाण । नाहीं नांव गुणवर्ण । तेथें नाना विभूति लक्षण । मिथ्या जाण वाचिकां ॥ २९३ ॥ माझें स्वरूप नित्य निर्विकार । मन बुद्धि वाचा नकळे पार । तेथें इंद्रियें वापुडीं किंकर । प्राणनिधि कें नेणें ॥ २९४ ॥ यालागीं शमदमाच्या अनुक्रमीं । मन बुद्धि वाचा इंद्रियें नेमी । प्राण नेमूनि प्राणधर्मी । आत्मारामीं पावशी ॥ २९५ ॥**

आत्मस्वरूपाचें किती स्पष्ट वर्णन दिलें आहे ! भागवतांत आत्मबोध होण्याबद्दल जागोजाग प्रयत्न केलेला आढळतो.

इंद्रियांचें नियमन कसें करावें, तीं कोणत्या कामीं लावावीं व त्यांपासून कोणती महत्त्वाची सिद्धि प्राप्त करून घेतां येते याविषयीं एके जागीं ह्मटलें आहे:—

**वाचा नेमावी माझेनि नामें । मन नेमावें ध्यानसंभ्रमें । प्राण नेमावा प्राणायामें । इंद्रियें दमें नेमावीं ॥ २९७ ॥ बुद्धि नेमावी आत्मविवेकीं । जीव नेमावा परमात्मसुखें । इतक्यानें तूं अवश्यकें । होशि कौतुकें मद्रूप ॥ २९८ ॥**

एक० भाग० अ० १६.

ईश्वरच सर्व ब्रह्मांडांत ओतप्रोत भरलेला असल्यामुळें ईश्वराशिवाय दुसऱ्या पदार्थाचें अस्तित्व संभवत नाहीं. ब्रह्म तोच जीव, ब्रह्म तोच शिव, क्षेत्र आणि क्षेत्रज्ञही ब्रह्मच अशा अर्थाबद्दल एकनाथानें सोळाव्या अध्यायांत पुष्कळच विवेचन केलें आहे.

वा उद्धवा:—

*　　*　।　*　　*

**मज वेगळा अणुप्रमाण। सर्वथा जाण असेना ॥ २७७ ॥ जिव आणि ईश्वर । गुणी आणि गुणावतार । क्षेत्र क्षेत्रज्ञ निर्धार । सर्वेही साचार मीचि मी ॥ २७८ ॥ मजवेगळा गा अणुमात्र । उरलें नाहीं स्वतंत्र । मी सर्वात्मा सर्वी सर्वत्र। केवळ चिन्मात्र तेंहि मी॥२७९॥ मज वेगळें गा येथें कांहीं । उद्धवा आतां उरलेंचि नाहीं । सर्व साधारण पाहीं ।सर्व देहीं मी असें ॥ २८० ॥**

एक० भाग० अ० १६.

'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' हा सिद्धांत वरील ओंव्यांमध्यें किती व्यक्त केला आहे. अशाच अर्थाचे नाथांचे अभंगही किती बोधपर आहेत ते पहा:—

**कल्पना अविद्या तेणें झाला जीव ।**
**मायोपाधी शीव बोलीजेतो ॥ १ ॥**
**जीव शीव दोन्हीं हरीरूप तरंग ।**
**सिंधु तो अभंग नेणे हरी ॥ २ ॥**
**जें जें दृष्टि दीसे तें तें हरीरूप ।**
**तयावीण ठाव रीता कोठें ॥ ३ ॥**
**वैकुंठ कैलासीं तीर्थक्षेत्रीं देव ।**
**अनंतासी अंत पहातां नाहीं ॥ ४ ॥**
**आदि मध्य अंतीं अवघा हरी एक ।**
**एकची अनेक एक हरी ॥ ५ ॥**

शुद्ध आत्मप्राप्ति ज्या पुरुषाला झाली त्या पुरुषाचीं लक्षणें कवि सांगतो:—

र परिनिष्ठित । श्रवण मनन अभ्यास- ... । ज्यासीं ब्रह्मविद्या प्राप्त । सुनिश्चित स्वानुभवें ॥ २५ ॥ तोचि अनुभव ऐसा । दोरा अंगीं सर्प जैसा । न मारितां मरे अपैसा । भवभ्रम तैसा ज्या नाहीं ॥ २६ ॥ जेंवि नटाची रावोराणी । दोघे खेळती लटकेपणीं । तेंवि प्रकृति पुरुष उभउनी । मिथ्यापणीं जो जाणे ॥ २७ ॥ स्वप्नींचीं नानाकर्में जाण । त्यांचें जागृतीं नलगे बंधन । तेंवि मिथ्या निजकर्माचरण । जीवित्वेंशीं जाण जो देखो ॥ २८ ॥

एक० भाग अ० १९.

भासमान संसाराचे ठिकाणीं ब्रह्मस्वरूप ओळखावें कसें ह्याविषयीं किती प्रचारांतले व सोपे दृष्टांत दिले आहेत !! जसें अंधेरांत पडलेली पांढरी दोरी पाहतांच, सर्प आहे, असा भास होऊन पोटांत धडकी भरते, अंगास कंप सुटतो, व पळून जाण्याविषयीं आपण प्रयत्न करितों, परंतु तिकडून कोणी दिवा आणिला असतां जसें त्या दोरीवरील सर्पाची कल्पना नष्ट होऊन, ती दोरीच आहे, अशी खात्री होते व पोटांतील भीति नाहींशी होते, त्याप्रमाणेंच मायेच्या व अज्ञानाच्या योगानें, ब्रह्माच्या ठिकाणीं भासावयास लागलेलें जें हें जगत्, त्या जगाला व प्रपंचालाच खरेपणा देऊन, आह्मीं विषय प्राप्ति झाली ह्मणजे, आनंद मानितों, व हानी झाली ह्मणजे खेद करितों व ह्याचमुळें देहाभिमान उत्पन्न होऊन माझी बायको, माझीं मुलें, माझें घर, माझें दार, असा स्वामित्वाचा संबंध जोडितों. परंतु आत्मबोधाची दीपिका ज्ञानीपुरुषाच्या अंतःकरणांत प्रज्वलित झाल्याबरोबर चक्क प्रकाश पडून त्याला कर्माचे ठिकाणीं अकर्म दिसावयास लागतें, व अकर्माचे ठिकाणीं कर्म दिसावयास लागतें, ( कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ), द्वैतभाव नष्ट होऊन जातो, आणि तो तादात्म्य पावतो. या विवर्तवादाच्या कोटीपुढें

नास्तिकाचा पदार्थवाद किंवा परमाणुवादही फिक्का पडून नास्तिकाला वेदांत्या पुढें हात टेंकावे लागतात. कारण हल्लींच्या पाश्चात्य वैद्यशास्त्राप्रमाणें सुद्धां प्राणिमात्राच्या अस्थि-मांस-रुधिर-मज्जातंतूचे सर्व परमाणु क्षणोक्षणीं पालटत असून रुधिराभिसरण व अस्थिमज्जेचें वर्धन होण्याला पिंडस्थ जुन्या परमाणूंचा क्षणोक्षणीं नाश व त्यांचे जागीं नव्या परमाणूंचा प्रवेश झाल्याखेरीज या ब्रह्मांडबाजाराची घडामोडच संभवत नाहीं, असें पाश्चात्य वैद्यशास्त्र सुद्धां ह्मणतें. यामुळें कोणी जर गंगेंत स्नान करणारा असेल तर त्याला जसे कालच्या स्नानाचे पाण्याचे परमाणु आज स्नानास मिळत नाहींत, त्याप्रमाणें या प्रवाही मायामय विलासांत कितीही नास्तिक व आस्तिक स्त्रीपुरुषांनीं परस्परांस गोंजारून किंवा भिन्नभिन्न त्रिपुड्या उभारून घरें दारें बांधलीं, तरी त्यांचीं शरीरद्रव्यें व घरें, तींच तींच कायम रहात नसून क्षणोक्षणीं त्यांत पार्थिव द्रव्याचा व इतर सर्व तत्वांचा फेरबदल व व्यभिचार घडत आहे. ह्मणून नास्तिक हा केवळ आकारसादृश्यावरच खुलून आहे. त्याचें जगत् शाश्वत मुळींच नाहीं; व हे पिंड ब्रह्मांडाचे आकार, दिवसानुदिवस, युगानुयुग, व कल्पानुकल्प खरे खरे आणि घट्ट मुट्ट जे वाटतात ते केवळ **पारमेश्वरी सत्तेनें** ऊर्फ मायेनें भासतात. **अधिष्ठानाला** ह्मणजे **ब्रह्माला** कधींच व कसलाच धक्का पोहोंचत नाहीं. हें **परमार्थरहस्य** ज्याला पुरतेपणीं कळलें तोच आस्तिक व त्यालाच सुखदु:खाचे चटके कमी बसतात. आणि ही **पारमेश्वरी सत्ता-शक्ति** ज्याला कळली नाहीं तोच नास्तिक व मोहित, आणि त्यालाच या **ब्रह्मरहस्याच्या** अज्ञानामुळें, **चैतन्याच्या** नैसर्गिक आवरणविक्षेप शक्तींतील सुखदु:खाचे चटके असह्य होतात.

स्वात्मसुख ग्रंथांत ही वरील गोष्ट किती खुबीनें सिद्ध केली आहे पहा:—

**यापरी जे जे प्रतिमा । तेथें प्रगटे आत्मारामा । हे गोडी आत्मयारामा । निर्मने रमवी ॥ ६७ ॥ जैसे सूर्याचे किरण । सूर्यापुढें धांवती आपण । तेणें प्रकाशे सूर्यपण अधिका-**

धिक ॥ ६८ ॥ कां चंदनाचा वास । चंदनाहूनि चौपंस[1] । धांवे तेणें अधिक प्रकाश । चंदनत्वा आणी ॥ ६९ ॥ तैसे विश्व प्रकाश तया गभस्ती । त्याचीं किरणें त्या त्या नानाव्यक्ती । तेथें नास्तिकता जे देखती । ते मूर्ख मृगतृष्णिका ॥ ७२ ॥ हो कां चिद्रत्नाची कीळे[2] । तें हें चराचर सकळ । ऐसें नेणती ते समूळ । पटल दृष्टी ॥ ७३ ॥ मोत्यांचीं करूनिया भूषणें । अंगीं प्रत्यंगीं लेणें । बाणलिया सुंदरपणें । शोभे स्वयें ॥ ७५ ॥ तैसें हें स्वरूप निर्विकार । त्याचें सर्वांग भूषण चराचर। तेणें अलंकारलें मनोहर । स्वरूपचि भासे ॥ ७६ ॥ सुवर्ण आणि भूषण । तेथें काय आहे दोन्हीपण । प्रगट पाहातां ही कांकण । सोनेंचि दिसे ॥७८॥ सौधपट पाहतां दृष्टी । तंतूसीच होय भेटी । तैसी अवलोकितां सकल सृष्टी । स्वरूपची भासे ॥ ७९ ॥

ह्या वरील दृष्टांतांच्या योगानें अद्वैताचें माप किती उत्तम प्रकारानें पदरीं घातलें आहे! एकनाथ ह्मणतोः–सूर्यापासून सूर्यप्रकाश जसा निराळा काढितां येत नाहीं, साखरेपासून साखरेची गोडी जशी भिन्न करितां येत नाहीं, चंदनापासून जसा सुवास निराळा काढितां येत नाहीं, सुवर्णाहून जसे अलंकार (गोट, पाटल्या, इत्यादि) निराळे काढितां येणार नाहींत व कापसापासून उपर्णी किंवा लुगडीं निराळीं दाखवितां येणार नाहींत, त्याप्रमाणेंच हें चराचरसुद्धां ब्रह्माहून पृथक् करितां येत नाहीं. सूर्य आणि सूर्यप्रकाश ज्याप्रमाणें एक, चांदणें आणि चंद्र जसा एक, ह्मणजे एकाशिवाय दुस-

१ पुष्कळ. २ प्रभा.

त्याचें अस्तित्व जसें संभवत नाहीं, त्याप्रमाणेंच हें चराचर आणि चित्स्वरूप हीं एकच. निर्विकार ब्रह्मच, चराचरालंकारानें नटलें.

**तैसें हें स्वरूप निर्विकार । त्याचें सर्वांग भूषण चराचर । तेणें अलंकारलें मनोहर । स्वरूपचि भासे ॥ ७६ ॥**

आतां ह्या अन्वयव्यतिरेकाच्या गोंधळांत आह्मीं ब्रह्मस्वरूप कसें शोधावें, ह्मणून कोणी शंका घेतील तर ऐका:—

**या लागीं उघडिया दृष्टी । पाहतां दृश्येसी नव्हे भेटी । नामारूपाची सृष्टी । ते देखतांही ॥ ८३ ॥ सुवर्णाचे ह्मणती नग । ते नग नव्हती सोनेंच चांग । तैसें दृश्याचें देखतां अंग । द्रष्टाचि दिसे ॥ ८४ ॥ ह्मणें सोनें म्यां पहावें दृष्टी । तरी पुढें ठेविजेल खोटी[1] । परि खोटी वेगळी भेटी । काय सुवर्ण निघडें ॥ ८५ ॥ तसें जग हें परतें न्यावें । मग आत्मत्व पहावें । कांकण आटूनि ह्मणावें । सुवर्ण आतां ॥ ८६ ॥**

स्वात्मसुख.

ज्या वेळेस दृश्य पदार्थ भिन्नभावानें दिसेनासे होऊन द्रष्टा, ह्मणजे पहाणाराच, सर्वत्र भरून जातो, त्या वेळेसच आत्मज्ञान झालें असें ह्मटलें पाहिजे. कंगण्या, पाटल्या, गोट इत्यादि सुवर्णालंकारांचे ठिकाणीं, जसें केवळ सुवर्ण पहावयाचें, त्याप्रमाणेंच दृश्य पदार्थांचे ठिकाणीं केवळ ब्रह्म पहावें. सोन्याचे दागिने न आटवितांसुद्धां जसें सोनेंच जाणावें, त्याप्रमाणें 'शुकनलिकान्यायानें' "मी" हा जो देहबुद्धीचा विकल्प प्राप्त झाला आहे, तो काढून टाकून व संपूर्ण जगत् विवेकदृष्टीनें व योगाभ्यासानें अवलोकन करून आत्मस्वरूप पहावें. "तैसें जग हें परतें न्यावें॥ मग आत्मत्वें पहावें। कांकण आटूनि ह्मणावें। सुवर्ण आतां॥"

[1] सोनें इत्यादि धातूंचा चौकोनी तुकडा, अलंकार.

अशा प्रकारचा ज्ञानी पुरुष झाला, ह्मणजे त्याची कशी अवस्था होते ? तर—

## श्लोक.

ज्ञानी पश्यति देहेषु निर्मलं गगनोपमम् ।
यत्र यत्र मनो याति तत्र तत्र परं पदम् ॥ ९ ॥

उत्तरगीता.

महात्मे पुरुष, या चंचल मनरूप वारूच्या पाठीवर विवेकाचे फटके मारून त्यास जेरीस कसे आणितात, तें सांगितलें आहे:—

## ओंव्या.

मन जेथें विकल्पुं धांवे । तेथें महामारि विवेकु फावे । मन जेथें अधर्मीं भवें । तेथें विवेक धावें हाकि तुं ॥ ५२ ॥ मन जाय काम क्रोधापार्शीं । विवेक धरूनि वोढी केशीं । मन रिघतां निंदे-पार्शीं । विवेक त्यार्शी बुकली ॥ ५३ ॥ मन ह्मणे विषयसुटी । विवेक हाणे वैराग्य काठी । मन धांवतां कल्पने पाठीं । विवेक उठाउठी झोटि धरी ॥ ५४ ॥ परदारा परधन । अभि-लाषूं धांवे मन । तेथेंही विवेक पावोन । रण-कंदन आरंभी ॥ ५५ ॥ ऐसा मनविवेकाचा झगडा । गान्हाणें आलें सद्गुरूपुढा । तेणें करा-वया निजनिवाडा । अद्वैतवाडा कोंडिलें ॥ ५६ ॥

एकनाथाचा हा किती नीतिपर उपदेश आहे ? प्रत्येक प्राणी जर आपलें मन याप्रमाणें स्वाधीन ठेवील, व ज्या ज्या वेळीं तें परधन, परकांता अन्यायानें हरण करण्याकरितां अत्यंत वेगानें भरारी मा-रतें, त्या त्या वेळीं तो मनुष्य जर त्याचे पंख, विवेकशस्त्रानें तोडून टाकील तर या जगांतील दुराचरण, अनीति, आणि अनाचार ह्यांचा

किती त्वरित उच्छेद होईल ? ज्या घरांत, ज्या कुटुंबांत, ज्या देशांत, व ज्या राष्ट्रांत, आज केवळ लोक कुमार्गगामी असल्यामुळें, दुःखाचे उद्गार, क्लेशाचे आक्रोश, आणि यातनेचे हुंबरडे ऐकूं येत आहेत, त्याच कुटुंबांत, त्याच घरांत, त्या देशांत व त्या राष्ट्रांत लोकरीति सुधारून जनसमूह सन्मार्गानें वागूं लागल्यास, शांततेचें राज्य आणि आनंदाची कारकीर्द किती लवकर सुरू होईल ? परंतु असा दिवस उगवेल तो सुदिन ! !

संन्याशाची चित्तवृत्ति कशी असली पाहिजे, व त्याचें खरें कर्तव्य कोणतें, यांविषयीं स्पष्ट रीतीनें सांगितलें आहे. त्याप्रमाणेंच खऱ्या क्षमेचें लक्षण एके ठिकाणीं सांगितलें आहे—

( संन्याशाचा खरा धर्म कोणता ह्मणशील तर ऐक ):—

**भूता अभय दानोपक्रम। सर्व भूतीं मी आत्माराम। हा संन्याशाचा मुख्य धर्म। तो धर्म मी पुरुषोत्तम स्वयें ह्मणे ॥ २०९ ॥ भूतांसीं काया वाचा मनें। दुःख न देऊनि सुख देणें। त्याही नांव संन्यास धर्म ह्मणणें। तो धर्म मी ह्मणें गोविंदु ॥ २१० ॥**

एक० भाग० अ० १६.

( बा उद्धवा, खरी क्षमा ज्या पुरुषाचे ठिकाणीं बाणून गेली आहे त्याचें लक्षण ऐक ):—

**अंतरीं शुद्ध नाहीं बोधू। दांत चाऊनि साहतां द्वंद्वू। ते क्षमा नव्हे शुद्ध। ऐक विनोदु क्षमेचा ॥ २११ ॥ अंतरीं ठसावलें परब्रह्म। बाह्य सर्व भूतां जाहला सम। तेचि क्षमा ह्मणे पुरुषोत्तम। द्वंद्व आराम बाधिना ॥ २१२ ॥**

एक० भाग० अ० १६

रुक्मिणीस्वयंवरांत कृष्णाची वरात पहाण्याकरितां पुष्कळ गर्द

जमली होती. त्या वेळेस एका संन्याशाला एका वेश्येचा चुकून विटाळ झाला. त्या वेळेस त्या उभयतांमध्यें झालेलें संभाषण फारच बोधपर आहे. तें खालीं देतों.

**वेश्या आणि संन्याशी । मंडपघसणी होतसे कैशी । कोप आला श्रीपादासी । दंडें वेश्येसी ठोकित ॥ २६ ॥ येरी विसरली देहासी । वृत्ती लाधली श्रीकृष्णासी । रागें लाथा ह्मणोनि तिसी । विटाळ आह्मासी कां केला? ॥ २७ ॥ येरी हांसोनि कपाळ पिटी । अजूनि क्रोध न सोडी पोटीं । विटंविली दंड कांसोटी । आत्मदृष्टी तुह्मा नाहीं ॥ २८ ॥ मी उत्तम पैं लहान । विषयभेदाचें अशन । सर्वांभूतीं समसमान । निजात्मज्ञान तुह्मा नाहीं ॥ २९ ॥ नाहीं निजशांति रोकडी । तंव कां केली तडातोडी । भगवीं नाशिलीं लुगडीं । उपाधी गाढी श्रीपादा ॥ ३० ॥ शेंडी टाकिली उपटोनी । वासना वाढविली चौगुणी । श्रीकृष्ण देखिलिया नयनीं विटाळ मानी तो निजांधु ॥ ३१ ॥**

रुक्मिणी० स्व० १५

आहा ! ! हा संवाद किती लक्षांत ठेविण्यासारिखा आहे. वरील वेश्येच्या उपदेशाप्रमाणें कामक्रोधादि षड्रिपूंचा न्यास केलेले संन्याशी कितीकसे सांपडतील !

खरें तप कोणतें व तें कशास ह्मणावें ह्याविषयीं चतुःश्लोकीभागगवत टीकेंत एकनाथानें चांगलें विवेचन केलें आहे. त्या ग्रंथांत तो एके ठिकाणीं ह्मणतोः—

**तप ह्मणजे नव्हे स्नान । तप ह्मणजे नव्हे दान । तप नव्हे शास्त्राख्यान । वेदाध्ययन नव्हे तप**

**॥ १०८ ॥ तप ह्मणजे नव्हे योग । तप ह्मणजे नव्हे याग । तप ह्मणजे वासना त्याग । जेणें तुटती लाग कामक्रोधाचे ॥ १०९ ॥ जेणें दंभ लोभ निःशेष आटे । अहंममता समूळ तुटे । याच नांव तप गोमटें । मानी नेटपाटें विधाता ॥ ११० ॥**

एकनाथाच्या ह्या वर सांगितलेल्या तप शब्दाच्या मीमांसेप्रमाणें प्रत्येक मनुष्यमात्राला तपस्वी होण्याचा अधिकार येतो आहे, परंतु वासनेचा त्याग करून विषयोपभोगावर पाणी सोडण्याचा कोणाचा तरी धीर होतो आहे काय ? 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत' (Eat, drink and be merry) हेंच महावाक्य उराशीं बाळगून त्याप्रमाणें सदा सर्वकाळ वर्तन ठेवण्याविषयींच मनाची धांव ! !

एकनाथाच्या नीतिपर ग्रंथांप्रमाणेंच त्याचे कित्येक अभंगही रसाळ असून बोधपर आहेत. हे अभंग भजनाच्या ऐन रंगांत तेथल्या तेथें रचून भजनाचा व कीर्तनाचा बहार उडवून देण्याची अजब करामत एकनाथामध्यें होती हें आह्मीं मागें सांगितलेंच आहे. याकरितां आह्मीं आपल्या वाचकांस या स्थलीं नाथाच्या कीर्तनाचा थोडासा देखावा दाखवून त्याच्या नीतिपर अभंगांचाही थोडासा मासला दाखवितों:—

कृष्णजयंतीमध्यें सायंकालच्या सुमाराला पैठणामध्यें मंदिरांत नाथांची स्वारी कीर्तन करीत उभी आहे, श्रोते लोक कीर्तनाच्या रंगांत दंग होऊन तटस्थ बसले आहेत, पांडुरंगाच्या मूर्तीकडे एकनाथाचा लय लागून गेला आहे, कीर्तन ऐकण्याकरितां लोकांच्या झुंडीच्या झुंडी नाथमंदिराकडे लोटताहेत, मंदिरामध्यें ही थोरली गर्दी होऊन एकच खेंच उडाली आहे, कांहीं लोक झाडांवर चढले आहेत, कांहीं घरांवर बसले आहेत, दीपोत्साहानें मंदिर लखाखून गेलें आहे, एकनाथाच्या मागें उद्धवकेशवाची जोडी उभी असून तालाच्या ठेक्यावर मृदंग दंगदंग करीत आहे, कीर्तनांत मधून म-

धून हरिनामाचा गजर होत आहे! अभंगांची तात्कालिक स्फूर्तीनें रचना होत असून दृष्टांतानें अर्थाची फोड चालली आहे! भजनाचाही जयघोष मध्यंतरीं घुमघुमत आहे! अशा रीतीनें कीर्तन व भजन हीं रंगांत येऊन एकनाथ लोकस्थितीला उद्देशून नीतिपर उपदेश करितातः—

### अभंग.

**मना सांडी विषयगोडी। लावीं विठ्ठलाची गोडी ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल सांवळा। पाहे उघडाची डोळा ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल निधान। एक मन करी उन्मन ॥ ३ ॥ एका जनार्दना शरण। मन झालें विठ्ठलपूर्ण ॥ ४ ॥**

(नंतर सर्वजण गर्जून भजन करतात!!!)

विठ्ठलरखुमाई, विठोबारखुमाई, विठ्ठलरखुमाई, विठोबारखुमाई, विठ्ठल, विठ्ठल.

### अभंग[1].

**धन, मान, बळें, नाठवीसी देवा।**
**मरणकाळीं बा, कोण आहे ॥ १ ॥**

---

१. ह्या भागांत एकनाथाचे दिलेले अभंग अद्याप कोठेंच छापले नाहींत. खुद्द एकनाथाच्या वंशजांनीं व त्याच्या शिष्यांनीं फार काळजीनें जें नाथाचें कृत्य जपून ठेविलें आहे त्या कृत्यांतील हे अभंग असून ते सर्वथैव विश्वसनीय आहेत. कारण ज्या सत्पुरुषापासून आह्माला हे अभंग मिळाले, तो पुरुष नाथाच्या कवित्वाविषयीं कसोटी आहे असें मानितात. एकनाथाच्या नांवावर कित्येक कृत्रिम कवनें विकत असून खुद्द नाथाचें कवन ओळखण्याकरितां पुष्कळ लोक ह्या पुरुषाकडे येऊन आपली खात्री करून घेतात. यावरून ह्या भागांत दिलेल्या अभंगांच्या सत्यतेबद्दल मुळींच शंका नाहीं. म्हणून ह्या वरील अभंगांपैकीं ज्या अभंगांचे खालीं ग्रंथाचा उल्लेख न करितां जागा रिकामीच टाकिलेली आहे किंवा (एक-बाड) अशीं अक्षरें लिहिलीं आहेत, ते अभंग पूर्वीं सांगितलेल्या एकनाथाच्या कृत्यांतून घेतले आहेत असें समजावें, व त्या कृत्यालाच 'एकनाथाचें बाड' अशी संज्ञा जाणावी.

**यमाचे यमदंड, बैसतील लाथा ।**
**तेव्हां तुज रक्षीता, होईल कोण ॥ २ ॥**
**सर्वस्व कामीनी, ह्मणवीती कांता ।**
**तेही केश देतां, रडतसे ॥ ३ ॥**
**मायबाप बंधु, सोयरे तोंवरी ।**
**इंद्रियें जोंवरी, वाहतातीं ॥ ४ ॥**
**एका जनार्दनीं, संतासि शरण ।**
**तुज जन्ममरण, नाहीं नाहीं ॥ ५ ॥**

जय कृष्ण कृष्ण!! जय कृष्ण कृष्ण!! बापा! या ऐहिक सुखाला व्यर्थ कां भुललास? संपत्तीच्या आणि तारुण्याच्या भरामध्यें जगन्नियंत्याचें विस्मरण तुला पडलें आहे, परंतु ज्या वेळेस अंतकाळच्या वेदना तुझे पंचप्राण कासावीस करितील त्या वेळेस तुझी मुक्तता करण्याला तुझें ऐश्वर्य व तुझी संपत्ति येईल काय? प्राण्या!! जोंपर्यंत तुझे हातपाय शाबूत आहेत, व तूं दोन पैसे घरांत आणितो आहेस, तोंपर्यंतच तुझी प्रतिष्ठा, व तुझ्या घरांत सोयऱ्याधायऱ्यांची गर्दी! परंतु एकदां तुझे हातपाय थकले, ह्मणजे प्रत्यक्ष तुझ्या आईबापांसही तूं नकोसा होशील! फार काय! पण तुझ्या जिवाचा कलिदा जी तुझी प्रियपत्नी, तीही तुझ्यामागें तुझ्या मरणाबद्दल इतका शोक न करितां, (सर्वस्व कामीनी ह्मणवीती कांता । तेही केश देतां रडतसे ॥) 'माझें सौभाग्यसौंदर्य आज जाणार' ह्मणूनच हंबरडा फोडीत असते. ह्याकरितां जन्ममरणाची परंपरा चुकविणाऱ्या साधुपुरुषाचीच कांस धर. ह्या नश्वर-सुखाला कां भुललास? (भजन करतात!) जयजयगुरु महाराजगुरु । जयजयजनार्दन सद्गुरू ॥

**गांठिं बांधोनि धन, मिरवितो भक्ति ।**
**मनीं ते आसक्ति, अधिक व्हावें ॥ १ ॥**
**चित्त वित्तावरी, भक्ति लोकाचारी ।**
**देवो अभ्यंतरीं केविं भेटे ॥ २ ॥**

आशेतें वीत, लावी काळांतरीं ।
अनुष्ठान करी, दिवस गणीत ॥ ३ ॥
धनालागीं मन, घेत असे धांवा ।
भक्तीच्या त्या हावा, वाउगीया ॥ ४ ॥
धन सांडुनि मन, घेई जनार्दन ।
एकाएकीं जाण, भक्ति फळे ॥ ५ ॥

काय चमत्कार ! ! जो तो रात्रंदिवस कवडी कवडी जोडण्यांत जिवापाड दगदग करीत आहे. पैसा ! पैसा ! हा निदिध्यास लागलेला असून इकडे भक्तीचें व अनुष्ठानाचेंही वंड माजविलें आहे ! हर-हर ! वित्तावर चित्त ठेवणाऱ्या ह्या दांभिक भक्तांस परमेश्वरप्राप्ति कधींही होण्याचा संभव नाहीं. अरे ! परस्परांशीं अत्यंत विपरीत अशा ज्या दोन वस्तु 'ईश आणि आशा' त्यांचें एकसमयावच्छेदें-करून एकाच स्थलीं ऐक्य कसें होईल ? तर धनावरील मन काढून, ईशप्राप्तीकडे लाव, ह्मणजेच सफलता होईल.

पद.

एडका मदन । तो केवळ पंचानन ॥ ध्रु० ॥
धडक मारिली शंकरा । केला ब्रह्मयाचा मातेरा ।
इंद्रचंद्रासी दरारा । लाविला जेणें ॥ तो० ॥ १ ॥
धडक मारिली नारदा । केला रावणाचा चेंदा ।
दुर्योधना मारिली गदा । घेतला प्राण ॥ तो० ॥ २ ॥
भस्मासुर मुकला प्राणासी । तेचि गती झाली वाळिसी ।
तिसरा विश्वामित्र ऋषी । नाडिला जेणें ॥ तो० ॥ ३ ॥
शुकदेवानें तप करूनी । एडका आणिला आकळुनि ।
एका जनार्दनाचे चरणीं । बांधिला जेणें ॥ तो० ॥ ४ ॥

जयदत्त ! जयदत्त ! जयदत्त ! श्रोतेहो जागे व्हा, जागे व्हा ! अहो त्या मदनरूप सिंहानें मोठमोठ्यांच्या बरगड्या फोडून मोकळ्या केल्या ! ! ह्या अनंग-एडक्याच्या टकरीपुढें शंकरासारखे देवाधि-

देवही टिकले नाहींत ! ब्रह्मदेवासारख्यांची तर दुर्दशाच उडाली ! व दुर्योधन, भस्मासुर आणि रावण ह्यांच्यासारख्या महत्पराक्रमी पुरुषांच्या तर चिंधड्याच झाल्या ! मग तुह्मांआह्मांसारख्यांची कथा काय ! ह्याकरितां मित्रहो, सावध व्हा ! आणि शुकासारखी वेसण घालून ह्या मदोन्मत्त पशूची नरडी दाबा, तरच बरी गत आहे !

## अभंग.

डोळां न दिसे न्याहारी । दृष्टी झाली पाठमोरी ॥१॥
अजून कायसारे मोह । मिथ्या विषयाचा संदेह ॥२॥
कानीं बैसलें तें टाळें । आलें प्रेमाचें उटाळें ॥ ३ ॥
आंग वाळलें कांचरी । चंद्रबिंब ढळलें शिरीं ॥ ४ ॥
नाना विषय करी न सुखी । प्रणता स्त्री प्रत्यक्ष थकी ॥५॥
वेश्या धन घेउनि मोला । स्त्री वार्धक्यीं देत टोला ॥६॥
अग्नि अवचटल्या पोळी । पुत्र नाना स्नेहें जाळी ॥७॥
मान कापुनी विषय वारी । मरण चढलेंसें शिरीं ॥८॥
बळ प्रौढी स्त्रीनें धन । क्षीण झाल्या उदासीन ॥९॥
पाठि बैसविली आवडी । शेखी नागउनी सोडी ॥१०॥
पुरुष वार्धक्यीं नावडे । मेल्या, कानकेस रडे ॥११॥
दांत पडोनी सांगे गोष्टी । नाकां लागते हनुवटी ॥१२॥
मोह ममता सांडी काम । सदा जपे रामनाम ॥१३॥
रामनामीं होईल हित । येऱ्हवीं बुडालें जीवित ॥१४॥
एका जनार्दन पुरा । बाळतारुण्य न निघे जरा ॥१५॥

प्रभो जनार्दना ! ! काय आमची विषयासक्ति ! किती आमची फटफजीती ! ! फार दूर कशाला ! ह्या प्रतिष्ठान नगरीकडेच दृष्टि फेंका ! एकजण तरी परमार्थ साधण्याकरितां यत्न करीत आहे काय ? लहानापासून मोठ्यापर्यंत सर्वजण प्रपंचांत गुंतलेले दिसतात ! परंतु बापहो ! हे तारुण्याचे दिवस आणि हा पंचविशीचा भर निरंतरचा नव्हे ! अहो, बाल्यदशा गेली, तारुण्याची भरज्वा-

नीही जाणारच! पुढें काय वाढून ठेविलें आहे याचा विचार कधीं केलात काय? भयंकर आ पसरून बसलेल्या विश्वभक्षक काळाच्या जबड्यांत जाऊन पडण्याकरितां जरेचीं पूर्व चिन्हें लवकरच दिसूं लागतील! पहा! पहा! वयातीत पुरुषांचे कसे द्रोण वळून गेले आहेत ते! डोळ्यांची भिंत झाली! कानांनीं तर कधींच सोडून दिलें! सर्वांग सुरकतून गेलें! मान लट् लट् हालूं लागली! अस्थि-पंजर नुस्ता उभा राहिला! प्राण्या! आतां तरी ही विषयसुखाची व्यर्थ आशा सोड! अरे यौवनावस्थेंत पुढचा मागचा विचार न क-रितां बहार मारलास! गरीबगुरिबांच्या मुंड्या मुरगळून वेश्यांचीं घरें भरलींस! मदांध होत्साता अनन्वित कृत्यें केलींस! आणि आतां जरापीडित झाला असतांही 'मी कोण माझें कर्तव्य काय' याचा विचार करीत नाहींस! तर आतां ऐहिक आशा सोड, आणि तुला टोले मारणाऱ्या रामा (स्त्री)विषयीं विचार न करितां, रा-मनामाचा जप कर, व रामाचे ठिकाणीं रामरूप हो.

### अभंग.

**माझें माझें ह्मणुनी, करितोसि कष्ट ।**
**उडाला हंस राहिलें फलकट ॥ १ ॥**
**तृणाचें बुजवण, तैसी देहस्थिति ।**
**चिताग्नी जळोनी मीळे मातीसी माती ॥ २ ॥**
**देहाचीं जनकें माता आणि पिता ।**
**गेला गेला ह्मणती तो हे असता ॥ ३ ॥**
**अष्टौप्रहर भोगी देहें गेहीं वित्त ।**
**सेजेची भार्या पळाली ह्मणे भूत भूत ॥ ४ ॥**
**यापरी जाणोनी सांडी देहप्रीती ।**
**एका जनार्दनीं राहे विदेहस्थिति ॥ ५ ॥**

अहो, या साडेतीन हातांच्या देहाची कोण प्रतिष्ठा! काय मि-जास! किती जपणूक! ह्या देहाला सुशोभित करण्याकरितां नाना-प्रकारच्या वस्त्रभूषणांनीं त्याला सजवावें! माझा चेहरा, माझे

डोळे, माझे सुंदर अवयव ह्मणून प्रतिष्ठा मिरवावी! परंतु खरो-
खर असा प्रकार नाहींरे! बाबारे ह्या हाडामांसाच्या पिंज-
ऱ्यांतून जीवरूप हंस उडून गेला, ह्मणजे ह्या पिंजऱ्याची कवडी
इतकी देखीलरे किंमत नाहीं! अरे हा देह केवळ तृणाप्रमाणें
आहे! त्यांतील तेजांश नष्ट झाल्याबरोबर तोच देह त्याज्य, अस्पर्श्य,
आणि भेसूर दिसावयास लागतो! रावसाहेब, तात्यासाहेब, अशीं
ज्या पदार्थाला संबोधनें मिळतात, तोच पदार्थ निर्जीव झाल्याबरोबर
स्थित्यंतर पावतो! ज्यांना प्राणांपेक्षांही प्रिय, व जे त्या देहाचे ज-
नितें, असे मातापितरही ह्मणतात कीं, चला! न्या आतां! घाण
सुटूं लागेल! तोंडावर पदर घाला, मुलें भितील! इतकेंच नव्हे,
पण देहसौंदर्यावर आपलें तन, मन, धन, अर्पण करणारी व संतति
आणि संपत्ति ह्यांचें वैभव व ऐश्वर्य मिरवणारी अशी प्रत्यक्ष स्त्रीही,
'स्वप्नांत आले' ह्मणून दचकून उठते व भलत्याच कल्पना मनांत
आणिते! ( अष्टौप्रहर भोगी देहें गेहीं वित्त॥ शेजेची भार्या पळाली
ह्मणे भूत भूत ) ॥ इतकी ज्या देहाची विटंबना! इतका जो क्षणभं-
गुर, किं ज्याचें स्थित्यंतर पांच पन्नास किंवा दोन तीन वर्षांत, व
कधीं कधीं तर एकदोन पळांतही होत असतें, तर अशा देहाची
प्रतिष्ठा व अशा देहाचा मीपणा व्यर्थ कशाला बाळगतोस? जर तो
देह तुझाच असता, तर त्यानें तुझ्या इच्छेविरुद्ध व तुला नकळत,
असें जबरदस्त स्थित्यंतर पावावें काय? ह्याकरितां देहबुद्धि धारण
करणाऱ्या प्राण्या! ही गोष्ट लक्षांत ठेव कीं, अहंभाव धरून अन्या-
यानें ह्या शरीराचें सुख वाढविण्याकरितां मुळींच हें तुला दिलेलें
नसून, ह्या देहाची तीन चिमट्या राख होण्याच्या पूर्वींच तूं सत्कृत्यें
करावींस व देह आणि दीप्ति ह्यांचें ऐक्य करावेंस एवढ्याचकरितां हें
शरीरसाधन तुला दिलें आहे."

( याप्रमाणें उपदेशपर कीर्तनाचा गजर चालला आहे, एकना
थाच्या हृदयंगम वाणीनें श्रोत्यांच्या मनावर आपला पूर्ण अम्मल
बसविला आहे, प्रत्येकाच्या अंतःकरणांत कृतकर्माच्या प्रतिमा मू
र्तिमंत उभ्या राहिल्या आहेत, व त्यामुळें पुढें आतां आपली का

दशा होणार याचा विचार करीत अनुताप पावून सर्वजण अश्रु ढाळीत आहेत, एकनाथाचेही अंतःकरणांत अनुतापाचा उद्वेग आणि उकळ्या फुटून, ऊर भरून आला, कंठ दाटला, नेत्र अश्रुपूरित झाले, मग सद्गदित होत्साता पांडुरंगमूर्तीकडे दोन्ही हात करून मोठ्यानें सकरुण धांवा करितो ):—

## धांवा.

**धांवरे धांव आतां । दीनवत्सला रामा ।**
**संसारसंग दोष । मी गुंतलों कामा ॥ धांवरे० ॥ध्रु०॥**
**तारुण्य अभिमान । देहें भरला ताठा ।**
**वैभव संपत्तीचा । मज फुटला फांटा ॥ धांव० ॥ १ ॥**
**विषय सेवितां हें । वय वेंचलें माझें ।**
**स्वहित आठवेना । ध्यान चुकलों तूझें ॥ धांव० ॥ २ ॥**
**विषय मोकलीता । शरण मी तुज आलों ।**
**एका जनार्दनीं । दास मी लीन झालों ॥ धांव० ॥३॥**

—नंतर सर्वजण गजर करून ह्मणतात ( पुंडलीकवरदे हरिविठ्ठल. जनार्दनस्वामीकी जय! )

एकनाथाच्या पदांत व अभंगांत औत्सुक्य, प्रेम आणि शांतिरस किती भरलेला आहे, ह्याची खात्री तीं पदें आणि ते अभंगच करीत आहेत. एकनाथाच्या कवनांत वैराग्य उत्पन्न करण्याची करामत किती अजब आहे, आणि तीं कवनें ऐकणाराच्या चित्तवृत्तींत कसा त्वरित फेरबदल करितात, ह्यांविषयींची निराळी मीमांसा करण्याचें मुदलींच कारण नाहीं. ज्या लोकांनीं उत्तम भजनकारांच्या व कथेकऱ्यांच्या तोंडून एकनाथाचीं कवनें ऐकिलीं असतील, त्या लोकांच्या प्रचितीस त्या कवनांचा अद्भुत प्रभाव आल्याशिवाय कधींच रहावयाचा नाहीं.

मूर्तिपूजेविषयीं एकनाथाचे विचार शुद्ध आणि नीतीला अनुसरून आहेत. कोंबड्या किंवा बकरीं मारून त्यांचा नैवेद्य देवास अ-

र्पण करण्याची जी घातुक आणि घाणेरी चाल कित्येक जातींत आहे, ती अत्यंत निंद्य आहे असें एकनाथाचें मत आहे.

**अभंग.**

**ह्मणती देव मोठे मोठे । पूजिताती दगड गोटे ॥ १ ॥**
**कष्ट नेणती भोगिती । वह्या, वह्या, दगडासी ह्मणती ॥२॥**
**जीत जिवा करुनि वध । दगडा दाविती नैवेद्य ॥३॥**
**रांडा पोरें मेळ झाला । एक ह्मणती देव आला ॥४॥**
**नाक घांसुनी गव्हार । देवा, ह्मणती गुन्हेगार ॥ ५ ॥**
**एका जनार्दन ह्मणे । जन भुलले मूर्खपणें ॥ ६ ॥**

यावरून पशुघात करून ईश्वरास प्रसन्न करणें अति निंद्य कर्म होय असें त्याचें मत होतें; आणि 'जीत जिवा करुनि वध' यावरून शाक्तमत एकनाथास पसंत नव्हतें असें सिद्ध होतें. कारण शाक्तमतानुयायी असणाऱ्या लोकांना पशुहिंसा करणें अवश्य पडतें. साधुवर्य तुकारामही शाक्तमताला शिव्या देत असे. 'अहिंसा परमो धर्मः' हाच त्याचा सिद्धांत आहे.

कित्येक जातींत अमावास्येला किंवा मंगळवारीं 'खंडोबा अंगांत येतो' असें ह्मणून जें मोठेंच बंड माजत असतें व त्या वेळीं भोळ्याभावड्या लोकांची जी गर्दी जमते, तो सर्व प्रकार केवळ मूर्खपणाचा आहे, असें 'रांडा पोरें मेळ झाला । एक ह्मणती देव आला' या वाक्यावरून एकनाथाचें मत स्पष्ट दिसतें. आणि हें उघड आहे कीं, ज्यांचीं आचरणें अत्यंत निंद्य, ज्यांची कृति सर्वदा स्वहिताची, व ज्यांच्या मनांत निरंतर द्वैतभाव, अशा प्राण्यांच्या ठिकाणीं आत्मस्वरूपाचा प्रकार कधींच घडणें नाहीं.

त्याप्रमाणेंच 'आह्मीं कितीही दुराचरण केलें, शेंकडों लोकांच्या जरी माना कापिल्या, आणि आमरणांत विषयोपभोग भोगिले, तथापि देवापुढें नाकदुऱ्या काढिल्या ह्मणजे आमचें पाप नाहींसें होईल,' असें मानणारे जे लोक असतील व वैदिकधर्मांत पापविमोचनाचा मार्ग हाच सांगितला आहे, अशी ज्यांची भ्रामक समजूत

झाली असेल, त्यांनीं 'नाक घांसुनी गव्हार । देवा, ह्मणती गुन्हेगार ॥ एका जनार्दन ह्मणे । जन भुलले मूर्खपणें ॥' ह्या नीतिपर अभंगद्वयाकडे लक्ष द्यावें. सदाचरण ठेवण्याकडे निरंतर प्रवृत्ति, आणि प्रसंगवशात् पाप घडलेंच तर त्याविषयीं अंतःकरणपूर्वक चिरकालिक पश्चात्ताप, हीं जर असतील, तर पापविमोचनाचा संभव. नाहींतर प्रसूतिवैराग्य किंवा स्मशानवैराग्य प्राप्त होणाऱ्या कोडग्या पाप्यास, केवळ एकदां वरवर नामस्मरण केल्यानें, किंवा देवापुढें नाक घांसल्यानें, जर पवित्रपणाचा पुतळा बनतां येतें, तर या जगतांत कोट्यावधि तुकाराम आणि लक्षावधि एकनाथ निपजले असते. परंतु कोणत्याच ज्ञात्याचा असा हेतु दिसत नाहीं. बाह्य पवित्रता कांहींएक कामाची नाहीं, अंतःकरण शुद्ध पाहिजे हेंच खरें प्रमेय होय.

ईश्वराचें नांव कसें घ्यावें, आणि तें कोणत्या उद्देशानें घ्यावें, ह्याविषयीं एकनाथानें जागोजाग उपदेश केला आहे. बाह्यात्कारीं नामस्मरणाचा आव घालून आंत जर शुचिर्भूतता नसेल, तर तो नामस्मरणाचा प्रयत्न व्यर्थ होय.

**नाम स्मरतों ह्मणुनी आचराल दोष ।**
**तरी श्रवण, मनन, भक्ति पडियली वोस ॥ १ ॥**
**रामनामाचेनि बळें नका करूं अधर्म ।**
**देवाविषयीं तुमचें शुद्ध नोहे कर्म ॥ २ ॥**
**दुर्वासाचें पाप अंबऋषी दिल्हा शाप ।**
**देवाचेनि चक्रें तया दीधला संताप ॥ ३ ॥**
**निःशाप मांडव्य शूळावरी वाहिला ।**
**इत्क्यासाठीं यमदास पुत्र झाला ॥ ४ ॥**
**सत्य वचनीं धर्म सदा असे एकनिष्ठ ।**
**असत्यमात्रें तयाचा झडला अंगुष्ठ ॥ ५ ॥**
**एका जनार्दनीं संत सोईनें चाले ।**
**सद्गुरूचेनि कृपें सबाह्य शुद्ध झालें ॥ ६ ॥**

तोंडानें मात्र रामनाम घेतलें आणि कृति करितांना खुशाल 'मनःपूतं समाचरेत्' असें आचरण ठेविलें, तर त्या नामाचें कांहींच महत्व आह्मी मानीत नाहीं असें होतें. एकनाथाची नामस्मरणाची व्याख्या ही आहे कीं, 'ज्या नामस्मरणांत श्रवण, मनन आणि भक्ति ह्यांचें ऐक्य होत नाहीं, तें नामस्मरणच नव्हे.'

**नाम वदतां हे वैखरी । चित्त धांवे विषयावरी ॥ १ ॥**
**कैसें होताहे स्मरण । स्मरणामाजी विस्मरण ॥ २ ॥**
**नामरूपा नाहीं मेळ । नुस्ता वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥**
**एका जनार्दनीं नाम । नामीं प्रगटे आत्माराम ॥ ४ ॥**

हरिनाम उच्चारणाऱ्या सर्व स्त्रीपुरुषांनीं एकनाथाचा हा अभंग आपल्या हृत्पट्टिकेवर लिहून त्याप्रमाणें जर त्यांनीं नामघोष चालविला, तर किती फायदे होतील? हल्लींचा नामघोष पाहिला तर 'नुस्ता वाचेचा गोंधळ' असाच प्रकार पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतो.

एकनाथाचा उपदेश नेहमीं असा असे कीं, प्रत्येक मनुष्यानें अनृत भाषण कधींही करूं नये. त्याप्रमाणेंच आपल्याकडून अनन्वित कृत्यें करविणारीं दोन आमिषें जीं परधन, परकांता, ह्या आमिषांपासून आपलें चित्त निरंतर अलिप्त ठेवावें. अशा निग्रही पुरुषाची योग्यता एकनाथानें मोठी मानिली आहे—

**कनक कांता नये चित्ता । तोचि परमार्थी पूरता ॥१॥**
**हेंचि एक सत्य सार । वाउगा व्युत्पत्तीचा भार ॥२॥**
**वाचा सत्यत्वें सोंवळी । येर कविता ते ओंवळी ॥३॥**
**जम तेचि जनार्दन । एका जनार्दनीं भजन ॥ ४ ॥**

प्रत्येक प्राणिमात्रानें जन्ममरणाची परंपरा चुकविण्याविषयीं प्रयत्न करावा. कारण जन्मांतर ज्याचें संपलें नाहीं, त्या पुरुषाला गुरुबोध मुदलींच ठसणार नाहीं. जन्ममरणाच्या चक्रांत गुंतलेल्या पुरुषास ब्रह्मज्ञान प्राप्त न होतां, तीर्थें, क्षेत्रें, पुराणश्रवण, हीं देखील त्याची सुटका करूं शकत नाहींत. आपण 'शुकनलिका' न्यायानें वेदांताच्या मोठमोठ्या गोष्टी मात्र बोलतों, 'अहं ब्रह्म' याची लांब-

लचक व्याख्या देत बसतों, परंतु त्याप्रमाणें अहंभाव विसरून देहबुद्धि सोडीत नाहीं; यामुळें जन्ममरणाच्या फेऱ्यांत पुनःपुनः पडतों. ‘सुख पहातां जवापाडें । दुःख पर्वताएवढें’ हा प्रापंचिक सुखाचा अनुभव असतांही, विषयभोगाची आशा सुटत नाहीं, आणि आशाबद्ध[1] झाल्यामुळें, ‘पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनं’ ही परंपरा चालवावी लागते. एकनाथाचा हाच सिद्धांत आहे कीं जन्मांतर जोंपर्यंत संपलें नाहीं, तोंपर्यंत आत्मबोध ठसलाच नाहीं:—

ब्रह्मज्ञानासाठीं वेदशास्त्रपुराण ।
करीतां श्रवण ना तुटेची ॥ १ ॥
ना तुटेची कदा गीता भागवती ।
वाचितां हे पोथी जन्मांतर ॥ २ ॥
द्वारका पट्टन क्षेत्र वाराणशी ।
करितां तीर्थाटणासी प्राप्त नोहे ॥ ३ ॥
प्राप्त नव्हे गुरु मंत्र तंत्र घेतां ।
शब्दज्ञान लभितां प्राप्त नोहे ॥ ४ ॥
ज्यासी पुनरावृत्ति स्थीर नोहे बोध ।
अखंडित भेद मनामाजी ॥ ५ ॥
ज्याचें जन्मांतर सरूनियां जाय ।
तेथें स्थीर होय गुरुबोध ॥ ६ ॥
एकाजनार्दनीं ऐसा जो का पुरुष ।
कोटीमाजी एक ब्रह्मज्ञानी ॥ ७ ॥

वरील पांचव्या अभंगावरून असें स्पष्ट दिसतें कीं, जोंपर्यंत जन्ममरणाची रहाटी संपली नाहीं व द्वैतभाव (ईश्वर निराळा आणि मी निराळा हा भाव) जोंपर्यंत नाहींसा झाला नाहीं, तोंपर्यंत आ-

---

१ एकनाथ एके ठिकाणीं ह्मणतो:—“जन्म घेणें लागे वासनेच्या संगें ॥” एक० हरिपाठ अभंग १ पा० १ आणि “न सुटे कल्पना अभिमानाची गांठी । घेतां जन्म कोटी हरी कैंचा ॥ ४ ॥” एक० हरि० पाठ ८.

मच्या मागें जन्मांतराचें शुष्ककाष्ठ आहेच. एकनाथाचें हें मत त्याच्या अवांतर धर्मविषयक मतांला अनुसरूनच आहे. अहंभाव धरल्यामुळेंच जर आम्हांला विषयवासना उत्पन्न होते, आणि आमच्या हातून कर्माचरण घडून पुनः जन्म घ्यावा लागतो, तर अहंभाव सोडला ह्मणजे अर्थातच आमच्या हातून पापपुण्याचीं कर्में न होतां जन्मांतरही लवकरच सरून जाईल. मग अर्थातच द्वैतभाव नष्ट होऊन तत्स्वरूप होण्याची पात्रता उत्पन्न होईल. आतां असें जन्मांतर चुकविणारे प्राणी पायलीचे पन्नास न निपजतां, कोट्यावधि पुरुषांत एखादाच भाग्यशाली हिरा भूमंडळावर चमकतो, ह्मणून जें एकनाथानें लिहिलें, तेंही यथार्थ आहे; कारण जगांतील अनुभवही असाच आहे.

ब्रह्मप्राप्तीसाठीं निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळ्या मार्गांचें जरी अवलंबन केलें, तथापि त्यांनीं घेतलेल्या दीक्षेचें ते जर यथार्थ आचरण आचरताहेत, व पूज्य पदार्थांत आपलें तन, मन, धन अर्पून अगदीं तद्रूप व तल्लीन होण्याजोगा जर त्यांना छंद लागला आहे, तर असे लोक भिन्न मार्गानें येणारे कां असेनात, ते ब्रह्माच्या मुक्कामाला निःसंशय येऊन थडकणार, असें एकनाथाचें मत आहेः—

**रुक्मांगदाकारणें एकादशीचा छंद ।**
**तेणें परमानंद प्रगटला ॥ १ ॥**
**अंबऋषीकारणें द्वादशीचा छंद ।**
**तेणें परमानंद प्रगटला ॥ २ ॥**
**प्रल्हादाकारणें हरिनामाचा छंद ।**
**तेणें परमानंद प्रगटला ॥ ३ ॥**
**एकाजनार्दनीं एकविध छंद ।**
**तेणें परमानंद प्रगटला ॥ ४ ॥**

घरच्या कुटुंबाच्या माणसांना उपासतापास घालून व द्रव्याचा फन्ना उडवून केवळ लौकिकासाठींच जे पुरुष यज्ञयाग करितात ते सुज्ञ नव्हेत असा नाथाचा अभिप्राय आहे. ऋण काढून सण

करण्याचा उपदेश त्यानें कोठेंच केलेला नाहीं. तो एके ठिकाणीं ह्मणतोः—

**ओंव्या.**

**पाडोनि कुटुंबासी लंघन । सर्व द्रव्य वेंचूनि जाण ।**
**करूं नये यज्ञाचरण । अधर्मपण तें पाहीं ॥ ७६ ॥**
**कां जीविका जीवनवृत्ति । त्याग करूं नये निश्चितीं ।**
**लौकिकीं मिरवावयास्फूर्ति । त्याग करिती तो दंभ ८६**

एक० भा० अ० १७.

' सगळ्याच भाताचा वैश्वदेव ' या ह्मणीप्रमाणें जे कित्येक धर्मभोळे दानधर्माचा प्रकार करतात, त्याप्रमाणेंच जे केवळ दातृत्वाची स्फीति मिरविण्यासाठींच दंभ माजवितात, असे लोक जर एकनाथाच्या उपदेशाप्रमाणें धर्माचरण करितील, तर ते स्वतःचा नफा करून राष्ट्राचीही उन्नति करितील.

प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयभूमीवर, मोठमोठे रथी, महारथी शस्त्रास्त्रांनीं ताडन करून, ती भूमि पादाक्रांत करीत आहेत. ह्याकरितां हृदयांगणावर निरंतर चाललेल्या द्वंद्वयुद्धांत, जो कोणी तलवार गाजवील, तोच शूर, असा एकनाथाचा अभिप्राय आहेः—

**जिंतला शत्रूचा संभार । ऐक शौर्याचा विचार ।**
**रणीं मर्दुनी अरि वीर । तो शूर येथें मानेना ॥ ४४६॥**
**प्रवाहरूपें अनिवार । जीवभाव लागला थोर ।**
**त्यातें जिंकी तो महावीर । परमशूर बोलिजे ॥४४७॥**
**जिंकोनी जीवाचे स्वभाव । चिदानंदाची राणीव ।**
**भोगिजे स्वराज्य वैभव । हें परम गौरव शौर्याचें॥४४८॥**

एक० भा० अ० १९.

निरनिराळीं राष्ट्रें काबीज करण्याकरितां समर करणें, आणि इंद्रियदमन करण्याकरितां युद्धसंग्राम करणें, ह्या दोन्ही समरप्रसंगांचे परिणाम अगदीं भिन्न भिन्न आहेत. पहिल्या प्रकारचा

समर करण्याचा प्रसंग फारच थोड्यांना येतो. परंतु दुसऱ्या तऱ्हेचा घनघोर युद्धसंग्राम अनुभवण्याचा प्रसंग, प्रत्येक प्राण्यास प्रत्येक क्षणीं आहे. पहिल्या संग्रामांत नेहमीं घे, मार, पकड, लूट हा प्रकार एकसारखा असून, कोट्यावधि प्राण्यांचे बळी पडून रक्तस्राव माजतो. परंतु दुसऱ्या संग्रामांत, लोभ, राग, काम इत्यादिकांचा उच्छेद होऊन, शांतीचें आणि आनंदाचें राज्य सुरू होतें. सारांश, पहिल्यामध्यें ऐहिक, परंतु नश्वर उन्नति, आणि दुसऱ्यांत पारमार्थिक, चिरकालिक, व अलौकिक अभ्युदय!

ब्रह्मप्राप्तीकरितां घरदार सोडण्याची आवश्यकता नाहीं. ईश्वराचे ठिकाणीं चित्तवृत्ति रंगून गेली ह्मणजे मग तो प्राणी गृहस्थाश्रमी असो किंवा वानप्रस्थाश्रमी असो, मोठा मुत्सद्दी असो, किंवा कंगाल असो, वर्णश्रेष्ठ असो, किंवा वर्णहीन असो, संसारांत असो, किंवा अन्य ठिकाणीं असो, कोठें कसाही असला तरी तो ब्रह्मरूप होणारच:—

**माझा भावार्थ जेथें होय । तेथें मी जाती कुळी न पाहें । मी भावाचेनी लवलाहें । वश्य होय निजभक्ता ॥ ११७ ॥ मजमध्यें रंगली चित्तवृत्ति । यालागीं विसरला गृहासक्ती । त्याशीं गृहस्थाश्रमींच माझी प्राप्ती । निश्चयें जाण उद्धवा ॥ १२९ ॥**

एक० भा० अ० १७.

अतिथि किंवा अभ्यागत यांचा सत्कार करण्यापुरतें जर आपल्याजवळ साधन नसेल, तर गोड आणि नम्र शब्दांनींच त्यांस संतोषित करावें:—

**नसतांही अन्न धन । आतिथ्यादि समाधान । मस्तकीं वंदूनिया दीन । निववी वचनें सुखरूप ॥ ३९६ ॥**

एक० भा० अ० १९.

आदरातिथ्य करण्याकरितां इतकें स्वल्प साधन जवळ असतांही

सर्व लोक मनोवृत्तीचे बंदे गुलाम बनल्यामुळें बिचाऱ्या अतिथी-
वर अर्धचंद्र प्रयोग होतांनाच पुष्कळ ठिकाणीं दृष्टीस पडतो.

'षड्रिपु ज्यानें जिंकिले नाहींत, व सर्व विषयांचा ज्यानें त्याग केला नाहीं, त्याचा संन्यास व्यर्थ होय, असें एकनाथाचें मत आहे:—

**ज्ञानेंद्रियें पांच सहावें मन । हेचि अरि षड्-
वर्ग जाण । यांचें न करितां निर्दळण । सं-
न्यास घेणें तो विटंबू ॥ ८९ ॥ त्याचा व्यर्थ
संन्यास जाण । व्यर्थ त्याचें दंडण मुंडण । व्यर्थ
काषायवस्त्रें ग्रहण । वेष धारण नटाचा॥९२॥**

ए० भा० अ० १८.

'एका ईश्वराशिवाय यमयातना चुकविणारा व जन्ममरणा-पासून सुटका करणारा दुसरा कोणी समर्थ नाहीं. करितां ईश्वराचें नामस्मरण करून आपली सायुज्यता संपादन करा' असा एकना-थाचा जागोजाग उपदेश आहे. पूर्वजन्म, पुनर्जन्म, आणि यम-यातना, हीं सर्व खरीं आहेत, असें एकनाथाचें मत पदोपदीं व्यक्त होतें. एकनाथाच्या उपदेशपर अभंगावरून, तो पहिल्या प्रतीचा निर्भीड, स्पष्टवक्ता आणि एकनिष्ठ होता, असें तेव्हांच दिसतें. ह्या त्याच्या स्पष्ट वक्तृत्वामुळें त्याच्या 'भांडा' सारख्या कित्येक गाण्यांत अत्यंत ग्राम्य शब्दांचाही उपयोग केलेला कोठें कोठें दृष्टीस पडतो. परंतु एकनाथाचें सद्वर्तन, त्याचा लोकरीति सुधारण्याविषयीं खरा खरा अंतःकरणापासून कळवळा, आणि त्याची एकनिष्ठता व निरिच्छता, ह्यांचा विचार केला ह्मणजे क्वचित् ठिकाणीं ग्राम्य शब्दांचा उपयोग केल्यामुळें तो फारसा दोषी ठरत नाहीं.

## अभंग.

**भक्तिवीण पशू कशासि वाढला ।
सटवीनें नेला कैसा नाहीं ॥ १ ॥**

काय माय-गेली होती भूतापाशीं ।
हरी नये मुखासी अरे मूढा ॥ २ ॥
पातकें करितां पुढें आहे पुसता ।
काय उत्तर देता होशील तूं ॥ ३ ॥
अनेक यातना यम करवील ।
कोण सोडवील तेथें तुजला ॥ ४ ॥
एका जनार्दनीं सांगताहे तोंडें ।
आहा वाचा रडे बोलतांची ॥ ५ ॥

एक० हरिपाठ पा० ५.

ह्या वरील अभंगांवरून एकनाथ किती स्पष्टवक्ता आणि निर्भीड होता, ह्याची बरीच कल्पना आमच्या वाचकांस करितां येईल. तुकारामाचाही असाच खडखडीत उपदेश असे. असा निस्पृहतेचा उपदेश एकनाथाच्या शेंकडों अभंगांत व त्याच्या गाथांत जागोजाग आढळतो. ह्या सर्व गोष्टींवरून 'एकनाथाच्या निर्भीड उपदेशानें श्रोतृसमुदाय अनुतापयुक्त होऊन ढळढळा रडे,' इत्यादि गोष्टींचें जें महिपतीनें पुष्कळ ठिकाणीं नाथांच्या चरित्रांत लिहिलें आहे, तें बऱ्याच अंशानें खरें असावें, असें सहज दिसतें.

वरील उपदेश करीत असतां, आवेशभरांत जरी एकनाथ सदहू अभंगवाणी बोललेला आहे, तथापि पहिल्या दोन चरणांवरून 'भूतपिशाचादिकांची[1] योनि, आणि सटवीची बाधा' ह्या दोन्ही

---

१ पिशाचादि योनी व अमानुष जीवांनीं व्याप्त अशा उच्चनीच योनी व लोकालोक समूह ह्यांच्या अस्तित्वाविषयींचा भरंवसा हल्लीं युरोपांत व अमेरिकेंत पुष्कळ तत्ववेत्त्यांचा बसत चालला आहे हें तिकडील 'Spiritualism' मताविषयीं व थिआसोफींतील Devakhān स्थितीविषयीं ज्यांनीं वाचलें असेल त्यांस निराळें सांगणें नकोच. बाकी, ज्या नास्तिकांची विद्वत्ता केवळ स्थूल देहापुरतीच, त्या बिचाऱ्यांना '**सूक्ष्म, कारण, महाकारण, हिरण्यगर्भ,**' इत्यादि पिंडब्रह्मांडांच्या आवरणाविषयीं काय समजणार? व **शिवाच्या रुंडमाळा** कोणत्या व '**अनंतब्रह्मांड कलेवरें ॥ ल्यालासी एकसरें ॥**' असें जें **विराटपुरुषाचें** स्तवन, तत्ववेत्त्यांनीं जागोजाग आजपर्यंत केलें आहे व

गोष्टींवर एकनाथाची श्रद्धा होती, असें स्पष्ट दिसतें. कारण ह्या गोष्टी असत्य आहेत असें जर त्याचें मत असतें तर त्यांचा उल्लेखही त्यानें आपल्या अभंगांत केला नसता.

शिवाय 'जोंपर्यंत देहबुद्धि सुटली नाहीं तोंपर्यंत निरनिराळ्या योनींत पुनर्जन्म घ्यावा लागतो' हें एकनाथाचें ठरींव मत मागें सांगितलेंच आहे. तेव्हां पिशाचयोनीविषयींचेंही मत, त्याच्या अवांतर मतांस अनुसरूनच आहे.

भुतें, खेतें, शकून, अपशकून, इत्यादि गोष्टींचा बरावाईट परिणाम देहबुद्धि धारण करणाराला आहे. परंतु नाथासारख्या ज्ञानी पुरुषाचा उपदेश 'देहबुद्धि टाका' 'द्वैतभाव विसरा' असाच असल्यामुळें, देहाभिमानाच्या योगानें घडणाऱ्या गोष्टींविषयींची चर्चा फारशी न करितां, त्यानें एकाच अभंगांत ह्मटलें आहे:—

---

करीत आहेत त्याचें तरी रहस्य नुस्ती 'matter' कुटीत बसणाऱ्या पदार्थवाद्याल काय कळणार ? तो जर *consciousness* ही काय वस्तु आहे, म्हणजे ती '**वेद्य**' आहे कीं '**वेदक**' आहे, '*subject*' आहे कीं '*object*' आहे, याचा जर कांहीं शोध करील तर त्याला **अध्यात्म** ( *Metaphysics* ) थोडें बहुत कळेल. कारण एक शोधक तत्ववेत्ता म्हणतो कीं "*Absolute Consciousness* or *The Ocean of Life* is improperly and illogically called 'Space or Vacuum or a *property* of matter' by some Atheists and the Materialists. These Materialists are not aware that this *Absolute Consciousness* or *the Great Knower* is *Eternity* itself, that puts forth, periodically, all the *appearances* of the *Manifested* and the *Unmanifested Universes*, on itself and not beyond itself. These macrocosmic and microcosmic *appearances* are technically termed 'Planes of perception ( Spiritual, Astral, and Physical )' by the Philosophers, and are popularly called the '*Heavens*' and '*Hells*' by the Theists. These *planes* or *appearances*, periodically upheaving on the bosom of *Eternity*, are necessarily innumerable, variegated and unlimited, though fluctuating and enchanting."

एकासी शकून एका अपशकून ।
आह्मासी परिपूर्ण दोन्ही माजी ॥ १ ॥
डावलुते कांहीं न डावलुते कांहीं ।
वेगडी पडते मनाचे पायीं ॥ २ ॥
एका जनार्दनीं देहबुद्धि डावली ।
परतोनी पाहे तो निघाला राउळी ॥ ३ ॥

गुरु करण्याची काय आवश्यकता आहे, तें त्यानें एके ठिकाणीं सांगितलें आहे:—

(वस्तु (ब्रह्म) दाखविणें किती दुरापस्त आहे तें पहा):-

ओव्या.

जें काळासी ना कळे । जें देखों न सकती बुद्ध्यादि सकळें । जेथें विवेकाचे मंद डोळे । गुरु आज्ञेविण ॥ १०१ ॥ जें न प्रकाशे तरणी। जें न बोलवे वेदवचनीं । येवढीये वस्तुचा गुरुदानीं । दयाळुत्वें ॥ १०२ ॥ आत्मा सच्चिदानंदु । हाही अविद्यैकबोधु । आत्मानात्माचा अनुवादु । करितां वेदु थोटावला ॥ ११८ ॥ ह्मणोनि वस्तुचिया पाटा । न चलती वेदवचन वाटा । यालागीं नेति नेति या निष्ठा । परतला तों ॥ १२० ॥

( इतकी गहन वस्तु गुरुशिवाय साध्य होणेंच नाहीं. )

ऐसें वेदा न बोलवेचि शब्दें । तें सद्गुरुपादप्रसादें । निःशब्दचि वाचा वदे । मौनेविण ॥ १२१ ॥

स्वात्मसुख.

एकनाथाची गुरुभक्ति कांहीं अलौकिक होती. स्वात्मसुख ग्रंथांत त्यानें गुरुसंबंधानें सुमारें १०० ओंव्यांमध्यें विवेचन केलें आहे.

आणि ही गोष्ट खरी आहे कीं, ज्या ब्रह्माची स्थिति, जागृति, स्वप्न, सुषुप्ति, इत्यादि अवस्थांच्याही पलीकडची, अशा ब्रह्माविषयीं, साधारण मनुष्यानें भवतिनभवति करणें, ह्मणजे वांझेनें प्रसूतिवेदनेविषयीं आपला अभिप्राय देणें होय. कारण ज्या मनुष्याला दोन अवस्थांपेक्षां अधिक अवस्थांचें यत्किंचितही ज्ञान नाहीं, असा पुरुष अवस्थातीत ब्रह्माविषयीं काय सांगणार ?

ह्यावरून ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे कीं, वाचेचेंही वाच्य न होणारें ब्रह्म दाखवून देण्याचें काम लहानसान नसून, ज्याला सर्व अवस्थांचा अनुभव आहे, असाच पुरुष गुरु करणें जरूर आहे. ह्मणूनच गुरुशिवाय गत्यंतर नाहीं, असा एकनाथाचा सिद्धांत होऊन स्वानुभवानें त्यानें आपला गुरु जो स्वामीजनार्दन, त्या महान् पुरुषश्रेष्ठाचा स्तुतिपाठ जागोजाग गाइला. गुरुमुखाशिवाय कांहींएक उमज पडावयाचा नाहीं, असें प्रतिपादन करून तो गुरु कोणत्या प्रकारचा असावा ह्याची एका ओंवींत त्यानें परिस्फुटता केली आहे.—

**गुरु करावा अति शांत । शास्त्रार्थ परमार्थ पारंगत ७४**

एक० भा० अ० १८.

ह्या तीन विशेषणांनीं युक्त गुरु असावा, हें जें एकनाथानें लिहिलें, तें खरें आहे. ह्या तिहींपैकीं एका गुणाची जरी कमतरता असली, तरी तो गुरु होण्यास अपात्र होईल, हें ह्मणणें बरोबर आहे. पहिल्या दोन गुणांनीं युक्त असे पुरुष थोडे तरी सांपडतील, परंतु परमार्थाच्या पैलतीरास जाऊन थडकलेले हरीचे लाल क्वचित् ठिकाणींच आढळतात.

वर सांगितलेल्या गुणांनीं मंडित असा गुरु, ज्याप्रमाणें अध्यात्मज्ञानभांडार खुलें करून देण्याला अवश्य पाहिजे, त्याप्रमाणेंच भांडाररहस्य दृष्टिगोचर होऊन तें पदरांत पडण्याला भक्तिदीपिकेचें साधनही अवश्य पाहिजे. ज्याचे जवळ ही भक्तिरूप दीपिका नसेल, त्याला त्या ज्ञानभांडारांत मिट्ट काळोख आहे, असें एकनाथाचें मत आहे.—

( भक्तिमुक्तीचा कसा निकट संबंध आहे पहा. )—

अभंग.

भक्तीच्या पोटा मुक्ति पैं आली ।
भक्तीनें मुक्तीतें वाढवीलें ॥ १ ॥
भक्ति ते माता, मुक्ति ते दुहिता ।
जाणोनि तत्वता भजन करी ॥ २ ॥
भक्ति सोडोनी मुक्ति वांछिती वेडी ।
गूळ सोडोनी कैसी जे गोडी ॥ ३ ॥
संतोषोनी भक्ति ज्यासी दे मुक्ति ।
तोचि लाभे, येर व्यर्थ कां शिणती ॥ ४ ॥
एकाजनार्दना एक भाव खरा ।
भक्तिमुक्ति दाटूनी आलिया घरा ॥ ५ ॥
भाव तोची देव, भाव तोची देव ।
ये अर्थी संदेह धरूं नका ॥ ६ ॥
भावें भक्ति फळे, भावें देव मीळे ।
निजभावें सोहळे स्वानंदाचे ॥ ७ ॥
एकाजनार्दनीं भावाच्या आवडी ।
मनोरथ कोडीं पुरतीं तेणें ॥ ८ ॥
भावची कारण, भावची कारण ।
या परतें साधन नाहीं नाहीं ॥ ९ ॥
एकाजनार्दनीं भावची कारण ।
सच्चिदानंदावरील दावी खूण ॥ १० ॥

या वरील अभंगांवरून भक्ति आणि भाव ह्या दोन गोष्टींवर एकनाथाचा किती कटाक्ष आहे हें स्पष्ट दिसतें । श्रद्धा जर नसेल, भाव जर अंतःकरणांत नाहीं, पूज्यबुद्धीची जर कमतरता असेल,

तर अशा पुरुषाला ब्रह्मज्ञानाचें कांहींएक कळणार नाहीं. अशा भक्तिहीन, भावहीन, व श्रद्धाहीन पुरुषाची, अध्यात्मविषय समजून घेण्याविषयींची माथाफोड, व्यर्थ आहे, असें एकनाथाचें ह्मणणें आहे:—

**हरिभक्ति सूख जे नर नेणती ।**
**त्यांसी भक्तपती कैंवी भेटे ॥ १ ॥**
**भक्तिच कारण, भक्तिच कारण ।**
**या परतें साधन नाहीं नाहीं ॥ २ ॥**
**एकाजनार्दनीं कीर्तन गजर ।**
**भावें हरीहर संतोषती ॥ ३ ॥**

स्वानुभवाचे किती निश्चयात्मक हृदयोद्गार हे ! खरा रस्ता चुकलेल्या अविश्वासी लोकांविषयीं किती कळकळ ! !

भक्तिहीन पुरुषाचा जन्म व्यर्थ आहे. अशा प्राण्याला मनुष्यदेह प्राप्त झाल्याचें सार्थक तो करीत नाहीं, असें नाथाचें मत आहे:—

**बहुता सुकृतें नरदेह लाधला ।**
**भक्तिवीण गेला अधोगती ॥ १ ॥**
**बाप भाग्य कैसें न सरेची कर्म ।**
**न कळेची वर्म अरे मूढा ॥ २ ॥**
**अनेका जन्मांचें सुकृत पदरीं ।**
**त्याचे मूखीं हरी बैठा होय ॥ ३ ॥**
**रावरंक होका, उंचनीच याती ।**
**भक्तिवीण माती मुखीं त्याच्या ॥ ४ ॥**
**एकाजनार्दनीं हरीहरी ह्मणतां ।**
**मुक्ति सायुज्यता पाठी लागे ॥ ५ ॥**

एक० हरि० पा० ४.

जर कोणी ह्मणेल कीं, ईश्वराकडे लय लागलें असतां आपला चरितार्थ कसा चालेल? तर अशा पुरुषानें योगक्षेमाची यत्किंचितही काळजी बाळगूं नये. संपूर्ण ब्रह्मांडाच्या चालकाला, अशा ईश्वरोपासकाची सर्वप्रकारें काळजी वाहणें जरूर आहे. त्याचा तो पाहिजे तर काळजी घेईल, आपण बेफिकीर रहावें, असें एकनाथाचें मत आहेः—

**आवडीनें भावें हरिनाम घेसी ।**<br>
**तुझी चिंता त्यासी सर्व आहे ॥ १ ॥**<br>
**नको खेद धरूं कोणत्या गोष्टीचा ।**<br>
**पती लक्षुमीचा जाणतसे ॥ २ ॥**<br>
**सकळ जीवांचा करितो संभाळ ।**<br>
**तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ ३ ॥**<br>
**जैशी स्थिति आहे तैशापरी राहें ।**<br>
**कौतूक तूं पाहें संचीताचें ॥ ४ ॥**<br>
**एकाजनार्दनीं भोग प्रारब्धाचा ।**<br>
**हरीकृपे त्याचा नाश झाला ॥ ५ ॥**

एक० हरि० पा० १२.

भगवद्गीतेंतही असेंच आहे.—

**श्लोक.**

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**<br>
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ १ ॥**

भगवद्गीता.

जें ब्रह्मरहस्य वर्णन करितां करितां वेदवाणी सुद्धां थकून कुंठित झाली, तें ब्रह्मज्ञान प्राप्त करण्याला भाव आणि गुरुमुख इतकींच साधनें पुरेशीं नसून, त्यावर निरंतर परिश्रमही केले पाहिजेत. ज्याचें पूर्वसुकृत जबरदस्त असून, ज्याचा ब्रह्मज्ञानविषयक अभ्या-

सही परिपूर्ण झाला आहे, अशाच भाग्यशाली पुरुषास तें तत्व कळतें. इतरांस कळत नाहीं.

अभंग.

वेद जाणूं गेला पुढें मौनावला ।
तें गुह्य तुजला प्राप्त कैचें ॥ १ ॥
पूर्व सुकृताचा पूर्ण अभ्यासाचा ।
दास सद्गुरूचा तोची जाणे ॥ २ ॥
जाणणें नेणणें हरीचे ठिकाणीं ।
एकाजनार्दनीं हरी बोला ॥ ३ ॥

एक० हरि० पा० ११.

केवळ दांभिकपणानें नामस्मरण करणाऱ्यांचा एकनाथास तिटकारा असे. वरकरणी रामनाम घेण्याचें जर कांहीं माहात्म्य असतें, तर आज संपूर्ण जगत्, गणिकेप्रमाणें कां स्वर्गास न जातें ? ह्यावरून, नामस्मरणाला आवश्यक अशी अंतर्बाह्य पवित्रता राखून, नामरूपाला एकवटून टाकण्यासारखें, कोणाचेंच रामनाम नाहीं:—

जगही राम राम ह्मणे । तयासी कां न येती विमानें ॥ १ ॥
नवल स्मरणाची ठेव । ज्या स्मरणीं भेटे देव ॥ २ ॥
नष्ट गणिका राम ह्मणे । तिसीं वैकुंठीचें येणें ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं ध्यातु । राव पाहे त्या नाम मातु ॥४॥

सर्वव्यापक परमेश्वर, अखिल ब्रह्मांडांत ओतप्रोत भरलेला असून, अंतर्बाह्य व्यापणाऱ्या जगदुत्पादकास शोधण्याकरितां लोक दूर जातात ! आणि तो अत्यंत जवळ आहे, हें न जाणून व्रतें आणि तपें आचरतात व तीर्थें, क्षेत्रें, पालथीं पाडून व्यर्थ देह शिणवितात; ही केवढी चूक ? परमेश्वराशिवाय एक तरी पदार्थ संभवतो काय ?

राम जवळी चूकले । व्रतें तपें भांबावले ॥ १ ॥
तीर्थि नाहीं क्षेत्रीं नाहीं । जवळी असतां भ्रांती पाही॥

श्रीना० च० १३

अयालागीं सैरा हिंडे । तोचि तया मागें पुढें ॥ ३ ॥
असतां सबाह्य अंतरीं । नाहीं ह्मणोनी दैन्य करी॥४॥
एकाजनार्दनयोगें । राम होय जगचि अंगें ॥ ५ ॥
पाहुं गेलों तुळसीबन । वृंदावनीं जनार्दन ॥ ६ ॥
मुळ डाळ पहातां पान । तुळसी वास जनार्दन ॥७॥
तुळसी वावें कोठें जावों । तुळसीमाजी दीसे देवो ८
एकाजनार्दनीं भावो । तुळसी झाला कृष्णरावो ॥ ९॥

ह्या वरील अभंगांत 'सर्वं विष्णुमयं जगत्' ( दृश्यमान जगत्, ब्रह्म आहे ) हा सिद्धांत किती सयुक्तिक रीतीनें प्रतिपादन केला आहे ! !

त्याप्रमाणेंच पुढील तत्वबोधक अभंग पहा—

स्वजन जनार्दन, विजन जनार्दन ।
जन तो जनार्दन, होऊनी ठेलें ॥ १ ॥
जनक जनार्दन, जननी जनार्दन ।
जीव तो जनार्दन, जीवनकळा ॥ २ ॥
भाव जनार्दन, स्वभाव जनार्दन ।
देव जनार्दन, जेथें तेथें ॥ ३ ॥
एक जनार्दन, अनेक जनार्दन ।
एका जनार्दन, निखळरूप ॥ ४ ॥
जप जनार्दन, तप जनार्दन
ब्रह्म जनार्दन, जेणेंसहित ॥ ५ ॥
कर्म जनार्दन, धर्म जनार्दन ।
भोग जनार्दन, अहर्नीशी ॥ ६ ॥
योग जनार्दन, याग जनार्दन ।
स्वरूप जनार्दन, जनीं वनीं ॥ ७ ॥

**ध्याय जनार्दन, ध्यान जनार्दन ।**
**एकाजनार्दन, ज्ञानसहित ॥ ८ ॥**

एकनाथाच्या एकंदर अभंगवाणीवरून, त्याची गुरुभक्ति किती अप्रतिम होती हें तर दिसतेंच. शिवाय आपल्यास कळलेलें अद्वैताचें तत्व, जितक्या प्रकारानें लोकांच्या मनांत बिंबेल, तितक्या प्रकारानें तें भरवून देण्याला, त्याच्यानें जितका यत्न करवला, तितका त्यानें केला आहे.

त्याच्या लौकिक आचरणावरून व त्याच्या निश्चयात्मक आणि हडसून खडसून निघालेल्या उपदेशाच्या उद्गारावरून, ह्या पुरुषाला तत्वबोध पहिल्या प्रतीचा झाला होता, व त्याला काडीमात्र संशय उरला नव्हता, असें स्पष्ट दिसतें.

हें पुढील, खुद्द परब्रह्माशीं, धिटाईचें व एकेरीवर येऊन केलेलें एकनाथाचें भाषण वाचून, त्याला त्याच्या मताची किती खात्री होती, व खऱ्या देवभक्ताची किती सलगी असते, ह्या गोष्टी वाचकांस चांगल्या कळणार आहेत.

( परात्पर प्रभो जगदीश, तूं संतुष्ट होत्साता मला वर माग ह्मणून ह्मणतोस, तर ऐक आतां मला काय पाहिजे तें:– )

**देव तुष्टला माग, वेगें । तुजवांचूनी आन नेघें ॥१॥**
**देवा इतुकी कृपा करीं । जे मी तूझा घोट भरीं ॥२॥**
**आणीक कांहीं मागें जरी । तरि मज दंडावें दातारीं ३**

( देवा, तूं ह्मणशील कीं, मी चाळवण्या दाखवून वैकुंठाच्या मधाच्या बोटानें, ह्या भावड्या एक्याला फसवीन ! परंतु फेंकून दे तुझ्या त्या वैकुंठाला नि कैलासाला ! ! हा फसणारा एक्या नव्हे ! अरे त्या कुटकन् मोडणाऱ्या ( चिरकालिक नव्हे अशा ) वैकुंठाला विचारतो कोण ! )

**वैकुंठ देईन रे एका । तो तंव फोडीव कुटका ॥ ४ ॥**
**क्षीरसागर शेषशयनी । काय चाळवीशी इतुकेनी ५**

( ह्याकरितां पुनः सांगतों ऐक मला काय पाहिजे तें. )–

**सोहं पद विसावनें । देतां घेतां लाजिरवाणें ॥ ६ ॥**
**एकाजनार्दनीं तुष्टला । देव सर्वांगीं घोटला ॥ ७ ॥**

आहा ! देवभक्ताचें किती प्रेम ! किती सलगी ! भाषण किती निर्भीड ! उघडच आहे ! ज्या अद्वैताच्या गोंधळांत, थेट परब्रह्माशीं जाऊन भक्त धडकणार, त्या ठिकाणीं भीड धरणार कोण ? आणि भीड धरतो तरी कोणाची ? एकनाथासारखा तत्वज्ञानी, वैकुंठाला कशाला भीक घालतो ! जें देतां येत नाहीं व घेतांही येत नाहीं, असें सोहंपद मिळवून सर्वांगीं घोटून जाण्याविषयींचा ( तद्रूप होण्याचा ) जो एकनाथानें वर मागितला, तो यथार्थच प्रकार झाला ! !

पुढील अभंगही देवभक्तांच्या हातघाईचा प्रसंगदर्शक आहे.–

**सर्वांभूतिं तूझें रूप । हृदयीं सिद्धचि स्वरूप ॥ १ ॥**

( देवा, तूं मला इतकेंच दे ):–

**इतुकें देई अधोक्षजा ।** ( परंतु हें न देशील तर )—
**नाहीं तरी घोट भरिन तुझा ॥ २ ॥**
**अखंड कीर्तनीं अनुरागु । सदा द्यावा संतसंगु ॥३॥**
**सकळांहूनी करी सहान । सकळीं माझें समाधान ४**

( ह्या वर मागितलेल्या गोष्टी देण्याला कां कूं, करशील तर मग पहा काय करीन तें ):—

**एकाजनार्दनीं मागें । नाहितर घाला घालिन आंगें ५**

प्रेमरसानें आणि भक्तिरसानें ज्यांचीं अंत:करणें थबथबून जातात, ज्यांच्या चित्तवृत्ति ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं रंगून जाऊन, मनाची भरारी नेहमीं तत्वावर झडप घालते, जे लौकिकदृष्टीनें मात्र या भासमान् जगांत आहेत असें लोकांस वाटतें, परंतु ज्यांच्या शरीरपंजरांतील राम, रामरहस्यांत रमून गेलेला असतो असे एकनाथासारखे व तुकारामासारखे निस्सीम भक्त, परमात्म्याचें मनगट धरून त्याला उभा करतील यांत नवल काय !!! आणि तद्रूप होण्याकरितां व ' अहंब्रह्म ' बनण्याकरितां, एकेरीवर येऊन झटापट करतील यांत संशय आहे काय ? इतकेंच कीं,

" जावें त्याच्या वंशा, तेव्हां कळे " असा ह्या प्रकार आहे ! इतकें सद्भाग्य आमचें कोठें आहे !!!

अहो ! पापपुण्याची भीति कोणाला ? ज्याला ह्या देहाचा अभिमान असेल त्याला त्या गोष्टी लागू. ज्या ज्ञानी पुरुषाला दोन पदार्थ भासतच नाहींत, जो विश्वरूपच बनून गेला, ज्याला सर्वच चैतन्याकार झालें, अशा ज्ञात्याला कसचें पाप नि कसचें पुण्य ! ! त्याला बरें वाईट असा प्रकार मुळींच नाहीं:—

**पाहतां कंदर्पाच्या[1] बापा । आह्मी नेणों पुण्य पापा॥ १॥**
**कैचें पाप कैचें पुण्य । देह नामीं पडलें शून्य ॥ २ ॥**
**शून्य पहातांची बिंदुलें । तेंचि विश्वाकार रचिलें ३**
**एका शून्याचा विस्तार । जनार्दनीं जगदाकार ॥ ४ ॥**

प्रत्येक जणाची ह्या प्रपंचाविषयीं आणि ह्या अवाढव्य विश्वविस्ताराविषयीं कोणत्या प्रकारची कल्पना पाहिजे, तें एकनाथानें सांगितलें आहे.–

**ऐसें असावें संसारीं । जोंवरी प्राचीनाची दोरी ॥१॥**
**पक्षी आंगणासी आले । आपला चारा चरोनी गेले२**
**मुलीं घरचार मांडिला । खेळ मोडोनी टाकिला॥३॥**
**वाटसरू वाटा आले । प्रातःकाळीं उठोनि गेले ॥४॥**
**मार्गीं बहुसाळ भेटले । नाहीं मन तेथें गुंतलें ॥ ५ ॥**
**एका विनवी जनार्दना । ऐसें असतां भय कोणा॥६॥**

एकना० बाड०

भागवतांतही असेंच आहे.–

**ओंव्या.**

**जैसे वृक्षातळीं पांथिक । एकत्र मिनले लक्ष एक ॥ तैसे पुत्र दारा आप्त लोक । सर्वेही क्षणिक संगमू ॥ ९५ ॥ उभय नदी प्रवाहेंशी । काष्ठें मिनलीं**

---

१. मदनाचा अवतार प्रद्युम्न त्या प्रद्युम्नाचा पिता श्रीकृष्णभगवान्.

**संगती जैशीं । सोयरीं सर्व जाण तैशीं । हेलाव्यास-रशीं फांकती ॥ ९६ ॥**

एक० भाग० अ० १८.

बापहो ! माझी बायको, माझा मुलगा, माझे बंधुजन, इत्यादि गोष्टींकडे व्यर्थ संबंध जोडून कां भुललांत ? अरे कोणाची बायको नि कोणाचा मुलगा ? ' का ते कांता, कस्ते पुत्रः ' ? ह्या बादरायण वंशमालिका कां जोडितां ! जोंपर्यंत ह्या संसाराच्या धर्मशाळेंत प्रारब्धामुळें मुक्काम करणें भाग आहे, तोंपर्यंत चोहोंकडून चार जमलेल्या मित्रमंडळीविषयीं, उदासीन आणि अलिप्त असा. हा सर्व पसारा असाच भ्रामक आहे. जसें, पक्षी आपला चारा खाण्यापुरतें मात्र एकत्र जमून लागलीच भुर्रकन् उडून जातात, किंवा लहान मुली भातुकली मांडून बाव्हलाबाव्हलीचें लग्न लावितात, व बोळकीं उधळून देतात, तद्वत् हा मायेचा पसारा आहे !

**पक्षी आंगणासी आले । आपला चारा चरोनि गेले ॥**
**मुलीं घरचार मांडिला । खेळ मोडोनी टाकिला ॥**

ह्या क्षणभंगुर, दुःखपर्यवसानी आणि भासमान् संसाराविषयीं, कां काळजी वहातोस ? पुत्रशोकानें, किंवा पत्नीवियोगानें कां ऊर बडवून घेतोस? मार्गांत किंवा धर्मशाळेंत, अथवा नावेमध्यें, जसे बारा घरचे बाराजण मिळतात, परंतु एकमेकांबद्दल वाजवीपेक्षां मोहममतेचें कांहींएक सुखदुःख न होतां सर्वजण परस्परांविषयीं उदासीन आणि बेफिकीर असतात, त्याप्रमाणेंच आपल्याला ह्या भासमान् संसारांत, बारशाच्या वेळीं व बाराव्याच्या वेळीं चित्तवृत्ति सारखीच ठेविली पाहिजे. मोहपाशांत आणि मायाजालांत फुका गुंतूं नये. वाटेचे जमलेले वाटसरू, ज्याप्रमाणें प्रवासाच्या अंतीं फुटाफुट होऊन, आपआपल्या मुक्कामाला जातात, किंवा नदीप्रवाहांत एकत्र जमलेला काष्ठसमूह, हेलाव्यासरसा निरनिराळा होऊन वाहत जातो, त्याप्रमाणेंच प्रपंचपांथस्थ लोकहो ! तुमचाही संसार हा अखेरचा मुक्काम नसून, ही मार्गावरील धर्मशाळा आहे ! ह्या

धर्मशाळेंत मी, मी, ह्मणून छातीला हात लावणारे कैक येऊन गेले ! कैकांनीं आज मुक्काम केला आहे ! व कैक पुढेंही येणारच !! या करितां, ह्या धर्मशाळेंत जमणारे जे कित्येक वाटसरू-पुत्र, कांता, सुहृद्, मातापिता, भगिनी, ह्यांविषयीं मन गुंतूं देऊं नका, आणि अखेरचा मुक्काम गांठण्याकरितां दिलेलीं साधनें जीं नरतनु आणि प्रपंच ह्यांचा अपव्यय न करितां, तीं योग्य उपयोगास लावा. ह्मणजे तुह्मांला कसलीच भीति बाळगण्याची जरूरी नाहीं !! व ह्या धर्मशाळेचें पुन्हा तोंड पहाण्यास नको !!

**मार्गीं बहुसाळ भेटले । नाहीं मन तेथें गुंतलें ।**
**एका विनवी जनार्दना । ऐसें असतां भय कोणा?॥**

'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' हा एकनाथाचा सिद्धांत असल्यामुळें त्याची कोणत्याच देवाच्या ठिकाणीं तिरस्कारबुद्धि नव्हती. भिन्नभाव मानून पूजा करणाऱ्या लोकांविषयीं मात्र त्याला पराकाष्ठेचा तिटकारा असे. ब्रह्माशिवाय दुसरी कोणतीच गोष्ट नसल्यामुळें, द्वैतभाव मानणें संभवत नाहीं, असा त्याचा सिद्धांत होता, व त्याप्रमाणेंच त्याचा निरंतर उपदेश असे.

एकनाथाच्या एकंदर अभंगांत पंढरीच्या विठोबाचा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केलेला आहे. पंढरीस वारी करण्याचा पाठ भानुदासापासून पडला होता. एकनाथाची भक्ति विठोबाविषयीं पूर्ण असे.

**पंढरीसी जाऊं चला । भेटूं रखुमाई विठ्ठला ॥ १ ॥**
**विठ्ठलु रोकडा रोकडा । डोळां पहारे ऊघडा ॥ २ ॥**
**विठ्ठलें लावियलें पिसें । जिकडे पाहों तिकडे दीसे ३**
**सम चरणाची शोभा । अवघा जगीं विठ्ठल उभा॥४॥**
**पहाणें पहातां या माझारी । पातें गेलें पहाण्यापरी ५**

साधुसंताचे ठिकाणीं एकनाथाची पूज्यबुद्धि होती:-

**संत जाती हरिकीर्तना । त्यांचे वाहीन मोचे वहाणा १**
**भवसिंधुचें तारूं । तेणें उतरूं पैल पारु ॥ २ ॥**

जन्मोजन्मीचें भूषण । संत चरणीचें रजन ॥ ३ ॥
संतचरणींच्या पादुका । जाला जनार्दनीं एका ॥ ४॥

एक० वाड.

मूर्तिपूजा, जप, तप इत्यादि गोष्टी करण्याविषयीं शास्त्र कां सांगतें ? व कर्ममार्गाचें अवलंबन करावें याचें खरें प्रमेय काय ? ह्या गोष्टींचा एकनाथानें चांगला खुलासा केला आहे:—

( कृष्ण उद्धवास सांगतात )—

सर्व कर्म मदर्पण । करितां शुद्ध होय मन । जेंवि लोह कमविला जाण । दर्पण होय सोज्वळ ॥ २६० ॥ पुटीं घालितां सुवर्ण । अधिक तेज चढे जाण । करितां वस्त्राचें क्षालन । स्वच्छपण धोवटी ॥ २६१ ॥ तैशीं सर्व कर्मे मदर्पण । करितां निर्मळ होय मन । तेकाळीं मनाचें अर्पण । मद्रूपीं जाण होतसे ॥ २६२ ॥

एक० भाग० अ० १९.

निष्काम जे का कर्मस्थिति । ते मूर्ख सर्वथा न करिती । त्याशीं दावोनी फलश्रुति । स्वकर्मप्रवृत्ति लाविलें ॥ २२३ ॥ जेंवि कां स्वातीचें फळ । शिंपीमाजी होय मुक्ताफळ । तेंचि सेवितां महाव्याळ । तें हळाहळ होवोनि ठाके ॥२२५॥ तेंवि आपुली जे कां कल्पना । निष्कामें आणि मुक्तपणा । तेंचि सकामत्वें जाणा । दृढ बंधना उपजवी ॥ २२६ ॥ वेदु बोलिला जें स्वर्गफळ । तें मुख्यत्वें नव्हे केवळ । जेंवि भेषज घ्यावया बाळ । देवोनि गूळ चाळवीजे ॥ २२७ ॥ वोखद घेतलीया पोटीं । क्षयरोगा होय तुटी । परि बाळ

**हातींचा गूळ चाटी । ते नव्हे दृष्टी भेषजीं ॥ २२८ ॥**

एक० भाग० अ० २१.

ह्या वर दिलेल्या स्थलांत २६०, २२७ ह्या ओव्या विशेष महत्वाच्या आहेत.

कर्माचरण निरंतर निष्काम असावें हेंच खरें. सकाम भक्ति व कर्में केलीं ह्मणजे फलप्राप्तीची आशा राहून दृढबंधन उत्पन्न होतें:—

**तेंवि आपुली जे का कल्पना । निष्कामें आणि मुक्तपणा । तेंचि सकामत्वें[1] जाणा । दृढबंधना उपजवी ॥ २२६ ॥**

एक० भाग० अ० १९.

'अमुक कर्म कर, ह्मणजे स्वर्गप्राप्ति होईल,' हीं जीं वचनें जागोजाग वेदानें दिलीं आहेत, त्यांत 'स्वर्गासाठीं इतके कष्ट व श्रम करावेत,' असा वेदाचा उद्देश नाहीं. स्वर्गप्राप्ति, ही ज्ञानाची इतिकर्तव्यता नाहीं. त्याप्रमाणें कर्माचेंही फळ स्वर्गप्राप्ति नव्हे. यावरून कोणीं असें समजूं नये कीं वेदांतशास्त्र व योगशास्त्र व धर्मशास्त्र यांचा परस्पर विरोध आहे. या तिन्ही शास्त्रांचा विरोध मुळींच नाहीं. जीवाला जागृतींतील प्रपंच जितका खरा खरा भासतो, तितक्या प्रमाणानेंच तो वासना धरून जर स्वर्गरूप अवस्थेचा अभिलाषी होईल व तदनुसार प्रयत्न ऊर्फ कर्माचरण करील, तर 'ज्या जैशी मति ॥ त्या तैशी गति ॥' या न्यायानें त्या जीवाला ती अवस्था व तेथील बरे वाईट भोग हेही तितक्या प्रमाणानें खरे खरे भासतीलच, हें—**अनादिसिद्धचैतन्या** ( Eternity or Positive Reality ) वर मायेच्या छायारूप रंगी बेरंगी लहरी ऊर्फ विवर्त, चतुर्दश भुवनाकार उमटतात—या मतावरून खरें म्ह-

---

[1] एका इंग्लिश विद्वानाचें असेंच म्हणणें आहे कीं, 'World is a *Condensed Thought*'. 'We build up our worlds of our own hankerings, desires, actions and omissions'.

णणें रास्त आहे. आणि त्या त्या मानानें युगपरत्वें तितक्यापुरतीं पुराणांतरींचीं वर्णनें व धर्मशास्त्रांतील आज्ञा खऱ्या मानण्यांत जीवाचें हित आहे. असें आहे तरी हें स्वर्गसुख व लोकालोक देखावे हे केवळ अवस्थागत असून ते आद्यंतवन्त व दुःखपर्यवसायी असल्यामुळें ते किती काळ टिकले तरी ते नश्वर व भासमान् आहे-तच. ह्मणून धर्मशास्त्र, मंत्रशास्त्र, व सृष्टपदार्थ ह्यांशीं विरोधी न होतां, वेदांतशास्त्रानें **'इहामुत्र विषयवैराग्य'** पाहिजे ह्मणून मुमुक्षु जीवाला इशारा दिला. तसेंच सात्विक कर्माचरणानें चित्तशुद्धि हो-ऊन पारमेश्वरी सत्तेचा अचिंत्य विलास लक्षांत यावा, व तेणेंकरुन जीवानें आपलें सच्चिदानंदस्वरूप व मायेचा आणि चैतन्याचा 'रज्जुसर्प' न्यायानें विवर्तसंबंध आहे हें खात्रीनें अनुभवण्याकरितां योगशास्त्रानें अधिकारीजीवांसाठीं ध्यानयोग, भक्तियोग, समाधियोग यांच्या प्रक्रिया सांगितल्या; व तेणेंकरून **जीव** ऊर्फ **साक्षी** हा **अवस्थातीत, देहद्वय-विलक्षण सच्चिदानंदरूप** कसा आहे ह्याचें माप अनुभवानें रोखठोक पदरांत घालण्याचा प्रयत्न योगशास्त्रानें केला आहे. यावरून वरील तिन्ही शास्त्रांचा विरोध नसून त्यांची एकवाक्यताच आहे.

( **ओवी** चरण. )

**वेदु बोलिला जें स्वर्गफळ । तें मुख्यत्वें नव्हे केवळ ॥**

( **अभंग** चरण. )

**वैकुंठ देईन रे एका । तो तंव फोडीव कुटका ॥**

कर्माचरणाचें खरें प्रमेय हेंच कीं, प्रापंचिक व्यावृत्तीनें जर्जर झालेलें मन, विशेष फांकून न जातां, त्याचें एकीकरण व्हावें, ह्मणून तें कर्माचरणांत गुंतविलें, व अज्ञानी लोकांची श्रद्धा परमार्थावर बसावी, ह्मणून त्यांला स्वर्गप्राप्तीचें रहस्य दाखविलें आहे.—

* । *

**जेंवि भेषज घ्यावया बाळा। देवोनि गूळ चाळवीजे २२७**

* । *

**तेंवि दावोनि फलश्रुति । स्वकर्मप्रवृत्ति लाविलें २२३**

**वोखद घेतलिया पोटीं । क्षयरोगा होय तुटी ।**
**परि बाळ हातींचा गूळ चाटी । ते नव्हे दृष्टी भेषजीं २२८**

एक० भाग० अ० २१.

येथपर्यंत नीतिसंबंधीं आणि धर्मसंबंधीं एकनाथाचे विचार कोणते होते ते सांगितले. त्यांत खरें बोलण्याविषयींचा उपदेश, हिंसा करण्याविषयींचा निषेध, मनोनिग्रहाची आवश्यकता, षड्रिपुदमनापासून होणारे लाभ आदिकरून नीतिपर उपदेशाचा भाग सांगून नंतर त्याच्या अद्वैत सिद्ध करण्याच्या कोट्या, जन्मांतराविषयींचा अभिप्राय, भक्ति आणि गुरुमुख यांची आवश्यकता, मूर्तिपूजा, भजन व नामस्मरण ह्यांची खरी योग्यता व त्यांचें प्रमेय हीं सर्व स्पष्ट रीतींनें प्रतिपादन केलीं आणि अवस्थातीत ब्रह्माविषयींही एकनाथाचे व्यापक विचार सांगितले.

असो; याप्रमाणें आपल्या साधुत्वाच्या योगानें व कवित्वाच्या संबंधानें, हा पुरुष हिमालयापासून तों तहत दक्षिण टोंकापर्यंत सोळाव्या शतकांत गाजत असतां, व तत्वज्ञान आणि नीतिपर उपदेश ह्यांचें खाद्य चारून, नीतिभ्रष्ट व अज्ञान जनसमूहाची पारमार्थिक उन्नति करण्याविषयीं, सतत चाळीस वर्षें एकसारखी जिवापाड दगदग करीत असतां, इ० स० १६०९ ह्मणजे शके १५३१ त फाल्गुन कृष्ण ५ चे दिवशीं त्याची प्रकृति बिघडून त्याला थोडी मूर्च्छा आली.

मूर्च्छा जाऊन सावध झाल्यावर एकनाथानें उद्धव व इतर शिष्यवर्गास सांगितलें कीं, उदयीक माझें प्रयाण आहे, ह्याकरितां प्रातःकालीं गोदातीरच्या वाळवंटावर उद्यांचें कीर्तन करून नंतर दोनप्रहरचे सुमारास या देहाचें सृष्टिनियमाला अनुसरून विसर्जन करूं.

एकनाथ समाधिस्त होणार ही वार्ता हां हां ह्मणतां आसपास १०।२० कोसांत पसरली; आणि लांबलांबचे लोक या पुण्यपुरुषाचें शेवटचें दर्शन घ्यावें ह्मणून धांवून आले.

दुसरे दिवशीं सर्व पैठण शहर माणसांनीं गजबजून गेलें. एकनाथानें स्नान करून धूतवस्त्रें परिधान केलीं. संध्या, ब्रह्मयज्ञ, पूजा

अर्चादि नित्यकृत्यें यथाविधि करून नंतर शिष्यवर्गासहवर्तमान सर्व लोक मिळून हरिनामाचा गजर करीत नाथाची स्वारी मिरवत मिरवत वाळवंटावर गेली. नंतर कीर्तनास सुरवात झाली.

त्या वेळच्या कीर्तनाचा प्रसंग आणि लोकांच्या मनाची उद्विग्नता काय सांगावी! या पुण्यपुरुषाचें कीर्तन ऐकण्याचा प्रसंग पुनः येणें नाहीं, ह्मणून, कित्येक जण गर्दीतून घुसून कान देऊन एकचित्तानें अभंगवाणी आणि नीतिपर उपदेश श्रवण करीत आहेत; कित्येक जण, ह्या साधुश्रेष्ठाचें दर्शन पुनश्च होणें नाहीं ह्मणून पाय वर करून उंच होऊन पुनः पुनः नमस्कार करीत आहेत. ह्या महापुरुषाच्या उपदेशानें जे कित्येक दुराचारी लोक सदाचारी झाले होते, त्यांस त्यांचे स्थित्यंतराचें स्मरण होऊन ह्मणतातः–'आज आपला त्राता जाणारना!! या पैठणशहरचें सौंदर्य आज नष्ट होणार ना!! नाथमंदिरांतील उपदेशपर कीर्तनाची आज अखेर होणार आँ!!' याप्रमाणें दुःखोद्गार निघूं लागून कित्येक जण खळखळां रडूं लागले. कित्येक भाविक स्त्रिया व अंध, पंगु, दुबळे, अनाथ, निराधार, असे लोक, आणि दीनहीन महारमांगांचा समुदाय, त्यांना दुःखावेग असह्य होऊन हंबरडा फोडून करुणा भाकतातः–"नाथमहाराज! तुह्मी आह्मांला टाकून कोठेंहो चाललांत!!! वाड्यांतील पुराण आतां कोण सांगणार!! वा अनाथांच्या नाथा! तू गेल्यावर आह्मां दुबळ्या लोकांस गोळाभर अन्न कोण चारणार!! अनाथांचा नाथ आज जाणार ना!! गरीबांचा कनवाळू, दुबळ्यांचा वाली, आणि महारमांगांचा पोशिंदा, आज चालला ना!! हर, हर!!" याप्रमाणें आक्रोशानें आणि आक्रंदनानें दशदिशा दुमदुमून गेल्या आहेत; दुःखाश्रूंनीं सर्व वाळवंट भिजून गेला आहे; भोंवतालीं सर्व लोकांचा दुःखावेग धडधडीत दृष्टिगोचर होत आहे, तथापि एकनाथाच्या मनावर त्या प्रसंगाचा व त्या करुणारवाचा वालाग्रही मायामोहित परिणाम न होतां, त्याची अभंगवाणी व नामस्मरणाचा गजर, गरजतोच आहे; अद्वैत बिंबवून देण्याचा प्रयत्न सुरूच आहे; व चाळीस वर्षे एकनाथाचा निवृत्तिमार्गोपदेश श्रवण करून, ज्या कित्येक

अनुयायांच्या व शिष्यश्रेष्ठांच्या मनावर अद्वैताचा खरा खरा ठसा उमटलेला होता, त्या ज्ञानी पुरुषांच्या अंतःकरणामध्यें, एकनाथाप्रमाणेंच त्या दारुण प्रसंगाचा मायामोहित कांहीं विकार न घडतां, ही संतलीला ते खुशालपणें अवलोकन करीत आहेत; याप्रमाणें एकाच स्थळीं, एकाच कालीं भिन्न भिन्न लोकांच्या मनाची, निरनिराळी स्थिति होऊन नानाप्रकार घडत असतां, एकनाथाचें कीर्तन समाप्त होऊन आरती झाली, व खिरापती वांटल्या; मग सर्व लोकांचें शांतवन करून त्यांस अभंगवाणीनें उपदेश करीत व सर्वांचा निरोप घेत घेत, एकनाथ गोदावरींत गेले. आणि छातीइतक्या पाण्यांत उभे राहून मोठ्यानें आत्मस्वरूपाचा बोध व्हावा ह्मणून ह्मणतातः—

ओव्या.[1]

आह्मीं संसारा अगत्य येणें । करोनि हरिभक्ति जडजीव उद्धरणें । साच असते जरी, तरी धाक धरितों चित्तीं । भवभयप्राप्ति समूळ मिथ्या ॥१॥ जें धर्माची वाढी मोडे । अधर्माची शीग चढे ॥ तें आह्मा येणें घडे । संसारस्थिति ॥ २ ॥ नानामतें पाखांडें । कर्मठता अति वांडे । त्यांचीं ठेंचावीं तोंडें । हरिभजनें ॥ ३ ॥ जें जें हरीचें लीलाचरित । तें तें माझेंचि स्वतंत्र । देव भक्त एकत्र । भेद नाहीं ॥४॥ जो जो अवतार हरी धरी । तो तो मीच अवधारीं । हरिनाम गजरीं । जगदोद्धारी ॥ ५ ॥ सर्वांभूतीं भगवद्भावो । हा भक्तीचा निजनिर्वाहो । धर्माचा आग्रहो । वाढणें ॥ ६ ॥ सर्वांभूतीं दयाशांती । प्रतिपाळावी वेदोक्ति । हेंचि एक निश्चिति । करणें आह्मा ॥७॥ लीलाविग्रही भगवंत । तया ह्मणती नित्यमुक्त ।

[1] भक्तलीलामृत अ० २४ ओ० १२४–१२५.

**आह्मा काय तेथें । वेगळे असों ? ॥ ८ ॥ विश्वरूपी सृष्टि । अर्जुना दावी दिठी । भिन्न भेदाची गोष्टी । बोलूं नये ॥ ९ ॥ एका जनार्दनी । विश्वरूप गोविंद । भेद धरी तो चित्तीं । निंद्याहूनी अति निंद्य ॥ १० ॥** तद्रूप झालेल्या अहंब्रह्माची वाणी याप्रमाणें वेदांतसार वदत आहे, सर्व प्रेक्षकजन त्याच्या मुखाकडे टकमक पहात, "गेला ! गेला ! चालला !! चालला !!" असे दुःखाचे उद्गार काढीत आहेत इतक्यांत त्या भाग्यशाली एकनाथाच्या मुखांतून **"जयजनार्दन"** असा गंभीर ध्वनि निघून, सर्व जगास चटका लावणारा, हा अजब तारा फाल्गुन कृष्ण षष्ठीचे दिवशीं दोनप्रहरीं गोदानदींत अस्तंगत[१] झाला ! ! !

## उत्तरार्ध समाप्त.

---

१ एकनाथाच्या समाधीची हकीकत. भक्तलीलामृत अ० २४ ओ० ९७–१४५.

२ एकनाथानें गोदावरींत जळसमाध घेतल्यावर मग चालीप्रमाणें और्ध्वदेहिक संस्कार केले. पुढें चिताशोधनाचे (राख सावडणें) दिवशीं पाहतात तों त्या ठिकाणीं एक तुळशीचें व एक पिंपळाचें अशीं दोन सुंदर रोपें दृष्टीस पडलीं. तेव्हां ही नाथांचीच साक्ष असें भाविकभक्तांनीं मानून त्याभोंवतीं वृंदावन बांधिलें आणि वर नाथांच्या पादुका स्थापन केल्या. त्याच पादुकांची, प्रस्तुत, पैठणामध्ये नदीचे कांठीं समाध असून, फाल्गुन कृष्ण षष्ठीस (नाथषष्ठी) मोठा उत्साह होतो. ह्या संस्थानास मोठें उत्पन्न असून, एकनाथाच्या पाटीमागें त्याचे वंशज गादीवर बसतात व नाथाची गादी चालवितात. पैठण (प्रतिष्ठान) शहर हें "नाथाचें पैठण" या नांवानें प्रसिद्ध आहे. ज्याप्रमाणें देहू, आळंदीहून पंढरपुरास पालख्या जातात त्याप्रमाणेंच प्रतिवर्षी पैठणाहूनही पालखी पंढरपुरास जाते.

# श्रीएकनाथ साधु व कवि यांची वंशावळी.

( पैठण संस्थानांतील मूळवंशवृक्षावरून. )

१ भास्करपंत × सावित्रीबाई

१ भानुदास

१ चक्रपाणी × सरस्वतीबाई

१ सूर्यनारायण × रुक्मिणीबाई व गोदावरीबाई

\+ १ एकनाथ × गिरजाबाई   १ श्रीनिवास ट × वैजयंतीबाई

* १ हरि पंडित × कमळाबाई   २ गोदूबाई (लीलाबाई) × चितोपंत (विश्वंभर)   ३ गंगाबाई

† १ मुक्तेश्वर   १ पुंडाजी

१ प्रल्हाद   २ मेघःश्याम   ३ राघोबा

१ दादाबोवा ट   १ नारायण   २ कृष्णा   १ त्रिंबक

१ रावबोवा   १ जगन्नाथ   १ माधव   २ यादव   ३ विश्वनाथ

‡ १ सयाबोवा   २ मयाबोवा ट   १ काशिनाथ   १ राघोबा   १ परशराम   १ केशव

१ कृष्णाबा   २ बाळाजी   ३ नारायण   १ विठ्ठल   १ वासुदेव   १ दिनानाथ   २ प्राणनाथ   ३ बाळाजी   १ रघुनाथ

१ रामचंद्र   १ गोविंद   १ एकनाथ   १ एकनाथ   १ बाळाजी   १ त्रिंबक   २ मनोहर   १ भागवतबोवा   २ गोपाळबोवा

१ बाळकृष्ण   १ हरिहर   २ विठ्ठल ट   ३ माधव   १ रामबोवा   २ आबाबोवा   १ रामकृष्ण ट   २ वासुदेव   ३ जनार्दन   १ एकनाथ १   सूर्यकांत   १ रामचंद्र   १ त्रिंबकबोवा   १ हरिबोवा

१ रंगनाथ   १ तुकारामबोवा   १ शामबोवा   १ पांडुरंग   १ केशव   १ वामन   २ पंढरीनाथ   १ कृष्णाजीबोवा   १ नारायणबोवा   २ कृष्णाबोवा

१ नारायणबोवा ( हेच हल्लीं संस्थानाच्या गादीवर आहेत. )

× ही खूण ज्या दोन नांवांमध्यें आहे, त्यांचा स्त्रीपुरुषांचा परस्पर संबंध आहे असें समजावें.
\+ हाच पुरुष अलौकिक साधुत्वसंबंधानें भरतखंडांत गाजला.
ट ही खूण वरील वंशावळींत नर्वश दाखविण्याकरितां घातली आहे.
* गोदूबाई व गंगाबाई ह्या एकनाथाच्या दोन कन्या होत.
† प्रसिद्ध मुक्तेश्वर कवि तो हाच. हा पैठणचा असून 'एकनाथ माझा आजा' असें तो आपल्या ग्रंथांत म्हणतो. ह्यावरून व एकनाथाची हीच मुलगी (गोदूबाई) पैठणांत दिली होती ह्यावरून मुक्तेश्वर एकनाथाचा नातु (मुलीचा मुलगा) हें स्पष्ट दिसतें. शिवाय पैठणांतील लोकांचें असेंच मत आहे.

‡ ह्या दोघां पुरुषांची गायनकलेंतील प्रवीणता जगप्रसिद्ध आहे. दीपराग असा यांनींच गावा! पैठणसंस्थानाला उत्साहाकरितां राजाराम छत्रपति यांजकडून जहागिरी, इनामें वगैरे जीं मिळालीं, तीं याच दोघां सत्पुरुषांच्या कारकीर्दींत. हेही महान् साधु होते.

## पैठणसंस्थानाच्या उत्पन्नाची हकीकत.

---

निझाम सरकाराकडून उत्साहाकरितां एकनाथाचे वेळीं सातशें रुपयांची तूप व कणीक येत असे. पुढें अन्नशांतीची व परोपकाराची कीर्ति जसजशी वृद्धिंगत होत गेली तसतसें संस्थानचें उत्पन्न वाढत जाऊन हल्लीं एकट्या निझामाकडून दहा हजारांचें उत्पन्न आहे. त्याशिवाय अवांतर संस्थानिकांकडून बारा हजारांचें उत्पन्न आहे. एकनाथाच्या वेळेप्रमाणें अद्यापपर्यंत अन्नशांति व फाल्गुन कृष्ण षष्ठीचा उत्साह मोठा टोलेजंग होत असून रा० रा० रामराव भगवंत, संस्थानचे कारभारी, ह्यांच्या दक्षतेमुळें संस्थानची व्यवस्था चांगल्या प्रकारची आहे. प्रस्तुत नाथाचे गादीवर असलेले नारायणबोवा हेही फार सज्जन व योग्य पुरुष आहेत.

ज्यांच्याकडून पैठणसंस्थानाला जहागिरी, इनामें, मोकासे वगैरेचें उत्पन्न आहे व ज्यांच्याकडून वर्षासनें चालू आहेत त्यांचीं नांवें.

| संस्थानांचीं नांवें. | उत्पन्न रुपये. |
|---|---|
| १ निझामसरकार. ... ... ... ... | १०००० |
| २ इंग्रजसरकार.<br>३ शिंदेसरकार.<br>४ गाइकवाडसरकार.<br>५ धारदेवास.<br>६ होळकरसरकार.<br>७ भोसलेसरकार. ... ... ... | १२००० |
| एकंदर संस्थानाचें उत्पन्न. | २२००० |

## पुरवणा.

# एकनाथांचे व जनार्दनस्वामींचे अभंग.



( १ )

नव्हति वेदशास्त्र जाण । नव्हति अठरा पुराण ॥१॥
नव्हति सप्तहि समुद्र । नव्हते पाहा सूर्यचंद्र ॥ २ ॥
नव्हति सप्तहि पाताळ । नव्हति अष्ट कुळाचळ॥३॥
तेव्हां होता रे गोपाळ । परब्रह्म तो केवळ ॥ ४ ॥
एका ह्मणे ऐसे ठाईं । सोहंस्फूर्तीं झाली पाहीं ॥५॥

( २ )

जाले पंचभूत त्रिगुण । ब्रह्मा विष्णु रुद्र जाण ॥ १ ॥
चार देह जाले पूर्ण । स्थूल सूक्ष्म ही कारण ॥ २ ॥
चौथा देह महाकारण । गुरूमुखें खूण जाण ॥ ३ ॥
एका ह्मणे गुरूवीण । अनुभव न कळत जाण ॥ ४ ॥

( ३ )

स्थूळ देह औटहात । रक्तवर्ण ब्रह्मा तेथ ॥ १ ॥
श्वेतवर्ण सूक्ष्म देहे । अंगुष्टपर्व दीसताहे ॥ २ ॥
अर्धपर्व कारणदेहे । श्यामरूप प्रभा आहे ॥ ३ ॥
महाकारण ते तुर्या । निरूपम सुरकाया ॥ ४ ॥
एका ह्मणे ऐसें आहे । गुरुशिं शरण जाउनि पाहें ॥५॥

( ४ )

परब्रह्म अविनाश । जैसें निश्चळ आकाश ॥ १ ॥
आरुते ते तेजाकार । भरला पाहा चराचर ॥ २ ॥
ऐसें स्वरूप वेल्हाळे । मन बुद्धि मावळले ॥ ३ ॥

नाहीं मायबाप त्यासीं । पहा पहा स्वरूपासीं ॥ ४ ॥
नाहीं मायबाप त्याला । एका ह्मणे स्वरूपाला ॥५॥

( ५ )

हेंही नव्हे रे देखणें । ऐसें बोले जनार्दन ॥ १ ॥
आतां एकनाथा ऐक । तुज खूण सांगतों एक ॥ २ ॥
तेथें पीतवर्ण असे । स्वरूपीं वर्णा ठाव कैसे ॥ ३ ॥
वर्णातीत स्वरूप आहे । एका डोळयांतुनि पाहे ॥४॥
जनार्दन कृपाकरे । एका पाहे डोळाभरे ॥ ५ ॥

( ६ )

त्यासीं नाहीं स्थान मान । चहूंकडे निरंजन ॥ १ ॥
नाहीं आकाश धरणी । जेवी मत्स्य लोळे ज़िवनीं २
तैसा स्वरूपाचा पूर । आला असे नेत्रावर ॥ ३ ॥
ऐसा जळाकार आहे । एका डोळाभर पाहे ॥ ४ ॥

( ७ )

झाळीयेच्या अभ्र अनु । तैसा दिसे निरंजनु ॥ १ ॥
पीत प्रभा असे तेथें । त्यांत पाहा रघुनाथ ॥ २ ॥
अनुहात वाद्यघोष । एका पाही सावकाश ॥ ३ ॥

( ८ )

उदयाची समाधी लागे तीनवेळां । अवघा ब्रह्मगोळा उजळतो ॥ १ ॥ चक्रामध्यें चक्र येती व्योमाकार । झगमग हेर ज्योती त्याची ॥ २ ॥ द्वितीय समाधी लागे कैशापरी । गुरुपुत्रा हेरी येणेंरूपें ॥ ३ ॥ प्रथम समाधी दिसे सर्पाकार । त्यामध्यें आकार सर्पाचा पैं ॥४ ॥ झळकति मणी दिव्य रत्नखाणी । अविनाश देखणी चिन्मयाची ॥ ५ ॥ उदईची ज्योतद्वितीय-

# पैठणसंस्थानाच्या उत्पन्नाची हकीकत.

निझाम सरकाराकडून उत्साहाकरितां एकनाथाचे वेळीं सातशें रुपयांची तूप व कणीक येत असे. पुढें अन्नशांतीची व परोपकाराची कीर्ति जसजशी वृद्धिंगत होत गेली तसतसें संस्थानचें उत्पन्न वाढत जाऊन हल्लीं एकट्या निझामाकडून दहा हजारांचें उत्पन्न आहे. त्याशिवाय अवांतर संस्थानिकांकडून बारा हजारांचें उत्पन्न आहे. एकनाथाच्या वेळेप्रमाणें अद्यापपर्यंत अन्नशांति व फाल्गुन कृष्ण षष्ठीचा उत्साह मोठा टोलेजंग होत असून रा० रा० रामराव भगवंत, संस्थानचे कारभारी, ह्यांच्या दक्षतेमुळें संस्थानची व्यवस्था चांगल्या प्रकारची आहे. प्रस्तुत नाथाचे गादीवर असलेले नारायणबोवा हेही फार सज्जन व योग्य पुरुष आहेत.

ज्यांच्याकडून पैठणसंस्थानाला जहागिरी, इनामें, मोकासे वगैरेचें उत्पन्न आहे व ज्यांच्याकडून वर्षासनें चालू आहेत त्यांचीं नांवें.

| संस्थानांचीं नांवें. | उत्पन्न रुपये. |
|---|---|
| १ निझामसरकार. ... ... ... | ... १०००० |
| २ इंग्रजसरकार. | |
| ३ शिंदेसरकार. | |
| ४ गाइकवाडसरकार. | |
| ५ धारदेवास. | ... ... ... १२००० |
| ६ होळकरसरकार. | |
| ७ भोसलेसरकार. | |
| एकंदर संस्थानाचें उत्पन्न. | २२००० |

## पुरवणी.

# एकनाथांचे व जनार्दनस्वामींचे अभंग.



( १ )

नव्हति वेदशास्त्र जाण । नव्हति अठरा पुराण ॥१॥
नव्हति सप्तहि समुद्र । नव्हते पाहा सूर्यचंद्र ॥ २ ॥
नव्हति सप्तहि पाताळ । नव्हति अष्ट कुळाचळ॥३॥
तेव्हां होता रे गोपाळ । परब्रह्म तो केवळ ॥ ४ ॥
एका ह्मणे ऐसे ठाईं । सोहंस्फूर्ती झाली पाहीं ॥५॥

( २ )

जाले पंचभूत त्रिगुण । ब्रह्मा विष्णु रुद्र जाण ॥ १ ॥
चार देह जाले पूर्ण । स्थूल सूक्ष्म ही कारण ॥ २ ॥
चौथा देह महाकारण । गुरूमुखें खूण जाण ॥ ३ ॥
एका ह्मणे गुरूवीण । अनुभव न कळत जाण ॥ ४ ॥

( ३ )

स्थूळ देह औटहात । रक्तवर्ण ब्रह्मा तेथ ॥ १ ॥
श्वेतवर्ण सूक्ष्म देहे । अंगुष्ठपर्व दीसताहे ॥ २ ॥
अर्धपर्व कारणदेहे । श्यामरूप प्रभा आहे ॥ ३ ॥
महाकारण ते तुर्या । निरूपम सुरकाया ॥ ४ ॥
एका ह्मणे ऐसें आहे । गुरुशिं शरण जाउनि पाहें ॥५॥

( ४ )

परब्रह्म अविनाश । जैसें निश्चळ आकाश ॥ १ ॥
आरुते ते तेजाकार । भरला पाहा चराचर ॥ २ ॥
ऐसें स्वरूप वेल्हाळे । मन बुद्धि मावळले ॥ ३ ॥

नाहीं मायबाप त्यासीं । पहा पहा स्वरूपासीं ॥ ४ ॥
नाहीं मायबाप त्याला । एका ह्मणे स्वरूपाला ॥५॥

( ५ )

हेंही नव्हे रे देखणें । ऐसें बोले जनार्दन ॥ १ ॥
आतां एकनाथा ऐक । तुज खूण सांगतों एक ॥ २ ॥
तेथें पीतवर्ण असे । स्वरूपीं वर्णा ठाव कैसे ॥ ३ ॥
वर्णातीत स्वरूप आहे । एका डोळयांतुनि पाहे ॥४॥
जनार्दन कृपाकरे । एका पाहे डोळाभरे ॥ ५ ॥

( ६ )

त्यासीं नाहीं स्थान मान । चहूंकडे निरंजन ॥ १ ॥
नाहीं आकाश धरणी । जेवी मत्स्य लोळे ज़िवनीं २
तैसा स्वरूपाचा पूर । आला असे नेत्रावर ॥ ३ ॥
ऐसा जळाकार आहे । एका डोळाभर पाहे ॥ ४ ॥

( ७ )

झाळीयेच्या अभ्र अनु । तैसा दिसे निरंजनु ॥ १ ॥
पीत प्रभा असे तेथें । त्यांत पाहा रघुनाथ ॥ २ ॥
अनुहात वाद्यघोष । एका पाही सावकाश ॥ ३ ॥

( ८ )

उदयाची समाधी लागे तीनवेळां । अवघा ब्रह्मगोळा उजळतो ॥ १ ॥ चक्रामध्यें चक्र येती व्योमाकार । झगमग हेर ज्योती त्याची ॥ २ ॥ द्वितीय समाधी लागे कैशापरी । गुरुपुत्रा हेरी येणेंरूपें ॥ ३ ॥ प्रथम समाधी दिसे सर्पाकार । त्यामध्यें आकार सर्पाचा पैं ॥४ ॥ झळकति मणी दिव्य रत्नखाणी । अविनाश देखणी चिन्मयाची ॥ ५ ॥ उदईची ज्योतद्वितीय-

यामिनी । हे दोनी देखणी झाली बापा ॥ ६ ॥ उद्‍-ईचे तीन द्वितीयेचे तीन । विनाशे देखन संध्या-काळीं ॥ ७ ॥ संदेह भावना टाकून ही द्यावी । त्यानेंच ही घ्यावी समाधी पैं ॥ ८ ॥ एक एक चक्र आकाशाएवढी । त्यामध्यें चौकडी मोतीयांची ॥ ९ ॥ दिव्यमणि ज्योती संध्याकाळीं वाती । तेलावणी दीप्ती पाजळल्या ॥ १० ॥ जनार्दन ह्मणे एकनाथा घेई । शोधावी या देहीं समाधी हे ॥ ११ ॥

( ९ )

देहाची समाधी घ्यावी तीनवेळां । आपापली कळा शोधावी पैं ॥ १ ॥ कानीं घाला बोट अंगोळया नय-नांत । तेणें विकासत शुभ्रवर्ण ॥ २ ॥ त्याचें हेंचि नांव जीवशीवदशा । तेणें दश दिशा भरुनी येती ॥ ३ ॥ तींत मध्यें भावें न सोडी समाधी । त्याचे पुढें शोधी गुरुपुत्रा ॥ ४ ॥ स्वामीनें पुसीलें कैसें काय झालें । कैसें तुज भासलें आत्मरूप ॥ ५ ॥ शिष्य ह्मणे स्वामी धरितां कानडोळा । एकाएकिं उमाळा आदित्याचा ॥ ६ ॥ विकासलें निर्मळ जैसा पूर्ण शशी । अनन्यप्रकाशी आत्माराम ॥ ७ ॥ जनार्दन ह्मणे ऐक एकनाथा । समाधी पाहातां आळस केला ॥ ८ ॥

( १० )

शिष्य ह्मणे स्वामी पुढें कैसें पाहावें । रीघतच जावें आभासे तें ॥ १ ॥ स्वामी ह्मणे पुन्हा समाधी तूं घेई । कल्पनातें पाही निववी ते ॥ २ ॥ जे कां तुज झाली असेल आशंका । भावना ठेवी कां तेची दृढ

( ४ )

॥ ३ ॥ आह्मीं नाहीं तूज चोरिली समाधी । शिव-मुखें सिद्धी पार्वतीसीं ॥ ४ ॥ तेची कृष्णनाथें अ-र्जुना दिधली । मग प्रगटली सर्वजगीं ॥ ५ ॥ प्रथम विकाशे पाहे शुभ्रवर्ण । त्या पुढें चांदणें चकच-काट ॥ ६ ॥ खद्योतासमान सूर्या तारांगण । प्रकाशे देखणें पुढें त्याचे ॥ ७ ॥ बैसावें निश्चळ त्याचे अग्रीं डोळा । पाहावे केवळ हंस जैसे ॥ ८ ॥ त्यामध्यें रा-हावें सोहं शिवध्यास। परि समाधीस सोडूं नये ॥९॥ जीवाचा जिव्हाळा देहाचा कुळदेव । अविनाश भाव प्रगटतो ॥ १० ॥ ह्मणे जनार्दन त्यापोटीं रीघावें । एकनाथा पाहावें आत्मरूप ॥ ११ ॥

( ११ )

मन स्वस्थ चित्त निश्चळ मध्यरात्रीं । गुरुगुह्यें ए-कांतीं रिघावें पैं ॥ १ ॥ हंसांगींची डोळा विकासूनी कमळा । त्याचे मध्यें स्थळा हेरित जावें ॥ २ ॥ चि-न्मय अविनाश प्रगटतो तेथें । तोची प्राणनाथ दे-हाचा पैं ॥ ३ ॥ तयाचा तो भास दिसे नीळवर्ण । तें स्वरूप जाण विराटाचें ॥ ४ ॥ ब्रह्मांडीं जें असे तें तें पिंडीं दीसे । बोलणें न भासे पुढें कांहीं ॥ ५ ॥ प्रथम समाधी बाहेर ते घ्यावी । आधी तेची पाहावी स्वरूपता ॥ ६ ॥ वेदीं समरस मग ते होऊनी । भि-डावें जाऊनी सायुज्यता ॥ ७ ॥ यापुढें समाधी दुजी सांगे कोण । त्या होय पतन निश्चयेंसीं ॥ ८ ॥ ह्मणे जनार्दन एकनाथा तूंची । भरूनीयां हेंची अहं सोहं ॥९॥

( १२ )

चहूं समाधींच्या मुद्रा जे कां चारी । दिसे चक्राकारी स्वरुप हेंची ॥१॥ चहुं समाधींचें पाहिलें देखणें। विकल्पित नयन सहजीं होय ॥ २ ॥ जिकडे तिकडे स्वरूपची दिसे । तयामाजी ठसे बिंबानेक ॥ ३ ॥ मसुरेप्रमाण तें महाकारण । स्वरूपाची पूर्ण सीमा झाली ॥४॥ सारे स्वरूपाची मेळणीहो झाली । परात्पर ठेली देहीं ज्योती ॥ ५ ॥ याच वस्तुसाठीं भांडती पुराण । वेदशास्त्र जाण मौनावलीं ॥ ६ ॥ गिरिधरनाथें मज दिली ताटी। वटवृक्षातळवटा समाधी हे ॥ ७ ॥ आतां या स्वरूपीं एकजनार्दन । गेलें द्वैतभान गुरुपायीं ॥ ८ ॥ गुह्यपंचक हें समाधी बोलण । वेदीं निश्चय जाण केला हेची ॥ ९ ॥

---